# अधिकमास

धर्मशास्त्रीय माहिती , पोथी , आरती

## मलमासविचार

या मलमासाचे अधिक महिना आणि क्षय महिना असे दोन प्रकार आहेत. ज्या महिन्यात सूर्यसंक्रांति नसते तो अधिक महिना आणि ज्यात दोन संक्रांति असतात तो क्षयमास होय. एक अधिक महिना झाल्यानंतर दुसरा अधिक महिना तीन महिने होऊन गेल्यावर, आठ किंवा नऊ महिने होण्याच्या आत केव्हा तरी होति. एक क्षयमास झाल्यानंतर दुसरा क्षयमास १४१ वर्षांनी अथवा १९ वर्षांनी येतो. हा अधिक महिन्याप्रमाणे तोड्या अवकाशाने येत नाही. कार्तिक, मार्गशीर्ष अथवा पौष यापैकीच कोणता तरी एक क्षयमास होतो. या (तीन महिन्यावाचून) दुसरा कोणचाही महिना क्षयमास होत नाही. ज्या वर्षी

क्षयमास होतो, त्या वर्षी त्या क्षयमासाच्या आधी एक आणि मागून एक असे दोन अधिक महिने येतात.

--------------------

## अधिक महिन्याचे उदाहरण

चैत्री अमावास्येला मेष संक्रांति झाली असे समजा त्यानंतर शुद्ध प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत एक महिनाभर संक्रांति नाही आणि पुढच्या शुद्ध प्रतिपदेला वृषभसंक्रांति आहे. अशा वेळी चैत्री अमावास्येनंतरचा संक्रांतिरहित जो महिना, तो अधिक (मलमास) महिना होय. त्याला अधिक वैशाख असे म्हणावयाचे. त्याच्या पुढचा जो वृषभसंक्रांतीने युक्त महिना, तो शुद्ध वैशाख समजावा.

------------------------

## क्षयमासाचे उदाहरण

भाद्रपद कृष्ण अमावास्येला कन्यासंक्रांति आली आहे

असे समजा; नंतर अधिक आश्विन महिना आला. त्यानंतर शुद्ध आश्विनातल्या शुद्ध प्रतिपदेस तूळसंक्रांत, कार्तिक शुद्ध प्रतिपदेला वृश्चिकसंक्रांत, त्यानंतर मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेला धनु आणि त्याच महिन्यात अमावायेला मकरसंक्रांती आल्या असता, धनु व मकर अशा दोन्ही संक्रांतींनी युक्त जो एक महिना, त्याला क्षयमास असे म्हणतात. हा मार्गशीर्ष व पौष या दोन महिन्यांचा मिळून एक महिना होतो. या क्षयमासात ज्या प्रतिपदादिक तिथि येतात, त्यांचे पूर्वार्ध मार्गशीर्ष महिन्यातले व उत्तरार्ध पौष महिन्यातले समजावे. याप्रमाणे प्रत्येक तिथि दोन महिन्यातली असते. या महिन्यातल्या तिथीच्या पूर्वार्धात मेलेल्यांचे श्राद्ध पौष महिन्यात करीत जावे. कोणी जन्म पावले असल्यास त्याच्या वाढदिवसाचा विधिदेखील याच प्रकाराने करावा. क्षयमासानंतर माघातल्या अमावास्येला कुंभसंक्रांत, नंतर अधिक फाल्गुन मास आणि शुद्ध फाल्गुनातल्या शुद्ध प्रतिपदेला मीन संक्रान्त येईल. याप्रमाणे आधी एक व मागून एक अशा दोन अधिक महिन्यांच्या मध्ये

क्षयमास येतो. अशा क्षयमासयुक्त वर्षाचे तेरा महिने असून, त्या वर्षाचे दिवस दोनशे नव्वदाहून काही कमी असतात. क्षयमासाच्या आधीच्या अधिक महिन्याला संसर्प असे नाव आहे. तो सर्व कर्मांना योग्य असल्याने शुभकार्याकरिता त्याज्य नाही. क्षयमासाला अंहस्पति अशी संज्ञा आहे. क्षयमास व त्याच्यानंतर येणारा अधिक मास हे सर्व कर्मांना वर्ज्य आहेत. याचप्रमाणे प्रत्येक तीन वर्षांनी येणारा अधिक महिनाही वर्ज्य होय.

------------------------

## वर्ज्यावर्ज्यकर्मनिर्णय

जी केल्यावाचून सोयच नाही अशी जी - अनन्यगतिक, नित्य, नैमित्तिक आणि काम्य कर्मे, ती अधिकमास अथवा क्षयमांस यात करावीत. पुढे करता येतिल अशी जी -सगतिक-नित्य, नैमित्तिक आणि काम्य कर्मे, ती (अधिक अथवा क्षय) या महिन्यात करू नयेत. उदाहरणार्थ - संध्या, अग्निहोत्र वगैरे नित्यकर्मे. ग्रहण-

स्नानादि नैमित्तिक कर्मे आणि पर्जन्यसंबंधी करीर्यादि व ब्रह्मराक्षसादिकांबद्दलची पीडाशमनार्थ रक्षोघ्नेष्ट्यादि काम्यकर्मे, ही सर्व अधिक महिन्यात देखील करावीत. ज्योतिष्टोमादि नित्य, जातेष्ट्यादि नैमित्तिक, पुत्रकामेष्ट्यादि काम्य वगैरे कर्मै मलमासानंतर शुद्ध महिन्यातच करावीत. आधी आरंभिलेले काम्यकर्म अधिक महिन्यातहि करावे. नवीन कर्माचा आरंभ व पूर्वी सुरू केले असलेल्याची समाप्ति- या गोष्टी या मलमासात करू नयेत. त्याचप्रमाणे पूजेचा लोप झाल्याकारणाने करावी लागणारी मूर्तीची पुन्हा प्रतिष्ठा, अनन्यगतिक व ज्यांचा कालच येऊन ठेपला आहे अशी जी गर्भाधानापासून अन्न प्राशनापर्यंतची संस्कारकर्मै ती, ज्वरादिक रोगनिमित्त शान्ति, अलभ्य योगावर करावे लागणारे श्राद्धव्रतादिक नैमित्तिक प्रायश्चित्त, नित्यश्राद्ध, ऊनमासादि श्राद्धे दर्शश्राद्ध ही मलमासातसुद्धा करावीत. चैत्रादिकांपैकी एखाद्या अधिक महिन्यात मेलेल्याचे प्रतिसांवत्सरिक श्राद्ध, पुन्हा तोच चैत्रादिकांपैकी मलमास आला तरी त्यातच

करावे. शुद्ध महिन्यात मेलेल्याचे सांवत्सरिक श्राद्ध (पहिले वर्ष जर अधिक महिन्यात पुरे होत असेल तर) मलमासातच करावे, शुद्धमासात करू नये. दुसरे अगर पुढील सांवत्सरिक श्राद्धे मात्र शुद्ध महिन्यातच करावीत. पहिल्या दिवसापासून अकराव्या दिवसापर्यंत करावयाची कर्मे व त्याचप्रमाणे सपिंडीकर्म- ही मलमासात देखील करावीत. द्वितीय मासिकादि श्राद्ध, मलमासात व शुद्ध मासात अशी दोनदा करावीत. याचप्रमाणे बारावे मासिक श्राद्ध जर अधिक महिन्यात करणे प्राप्त होईल, तर तेहि मलमासांत व शुद्ध मासात असे दोनदा करून, ऊनाब्दकली ऊनाब्दिक करावीत व चवदाव्या महिन्यात पहिले वार्षिक (सांवत्सरिक) श्राद्ध करावे. ज्या वर्षी अधिक महिन्याच्या पुढचाच महिना क्षयाचा येईल, त्यावर्षी कार्तिकांत करावयाचे प्रतिसांवत्सरिक श्राद्ध अधिक महिन्यात व क्षयमासात असे दोनदा करावे. उदाहरणार्थ - अधिक कार्तिक महिना येऊन, पुढच्या महिन्यात वृश्चिक व धनु अशा दोन संक्रांति आल्यामुळे तो जो क्षयमास होतो, त्याप्रसंगी वरील

निर्णय जाणावा. अधिक महिन्याच्या पाठोपाठ जेव्हा क्षयमास नसेल, तेव्हा आश्विन महिन्यातले श्राद्ध, ते दोन्ही महिने कर्मार्ह असल्यामुळे अधिक व शुद्ध अशा दोन्ही आश्विनात करावे, असे मला वाटते. उदाहरणार्थ - आश्विन हा अधिक महिना येऊन मार्गशीर्ष महिना जेव्हा क्षयाचा येईल तेव्हा, वरील म्हणण्याचे तात्पर्य जाणावे. क्षय महिन्याच्या आधीचा महिना जर अधिकाचा नसेल तर क्षयमासांत जे प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करावयाचे, ते क्षयमासीच करावे! त्याचप्रमाणे वर जे मार्गशीर्षाचे क्षयमासाचे उदाहरण सांगितले आहे, त्यामध्ये मार्गशीर्ष व पौष या महिन्यात करावयाचे जे सांवत्सरिक श्राद्ध, ते तिथीचा पूर्वार्ध व उत्तरार्ध असा विभाग न करता एकदाच क्षयमासी करावे.

------------------------

## मलमासातली वर्ज्य कर्मे

उपाकर्म, उत्सर्जन आणि अष्टकाश्राद्धे ही अधिक

महिन्यात करू नयेत. चौल, मौजीबंधन, लग्न, तीर्थयात्रा, वास्तुकर्म, गृहप्रवेश, देवप्रतिष्ठा, विहीर, बाग इत्यादिकांचा उत्सर्ग, नवी वस्त्रे किंवा अलंकार ही धारण करणे, तुला-पुरुषादि महादाने, यज्ञकर्म, अग्निस्थापना, पूर्वी न पाहिलेल्या देवतीर्थादिकांचे दर्शन, संन्यास, काम्यवृषोत्सर्ग, राज्याभिषेक, व्रते पुढे केला असता अडचण नसणारा अन्नप्राशनसंस्कार, सोडमुंज, पुर्वी होणे राहिलेला नामकर्मादि संस्कार, पोवती वाहाणे, दवणा वहाणे, श्रवणाकर्म, सर्पबलि वगैरे; पाकसंस्था, देवाचे शयन, परिवर्तन (एका कुशीवरून दुसर्या कुशीवर वळण्याची क्रिया) वगैरे उत्सव, शपथविधि, दिव्य करण्याची वगैरे कामे- ही सर्व अधिक महिन्यात वर्ज्य करावीत.

रजोदर्शनानिमित्त शांति, विच्छिन्नाग्नीचे पुन्हा संधान, पुनः प्रतिष्ठा वगैरे जी नैमित्तिक कर्मे, त्यांच्या बाबतीत, ती निमित्त झाल्याबरोबर जर केली, तर त्यांना मलमासादिकांचा दोष नाही; परंतु निमित्त होऊन जर काळ लोटला, तर ती शुद्ध मासातच करावीत.

दुर्भिक्षादि जर संकट असेल, तर आग्रयण मलमासात

करण्यास हरकत नाही. संकट नसल्यास शुद्ध मासातच करावे. युगादि व मन्वादि श्राद्धे अधिक व शुद्ध अशा दोन्ही महिन्यात करावीत. क्षयमासाच्या आधी येणार्या अधिकमासाला संसर्प हे नाव असल्याचे मागे सांगितलेच आहे. या संसर्पमासात-चूडाकर्म, व्रतबंध, विवाह, अग्निस्थापना, यज्ञ, उत्सव, महालय, राज्याभिषेक ही कर्मे करू नयेत. यांहून इतर कर्मे करण्यास हरकत नाही. पूर्वी न केलेल्या व्रताचा आरंभ अथवा समाप्ति ही मलमासात वर्ज्य आहेत. पूर्वी केलेल्या माघस्नानादि कर्माचा आरंभ अथवा समाप्ति, क्षयमासात करण्यास हरकत नाही. मकरसंक्रातीने युक्त असलेल्या क्षयमासात पौर्णिमेला माघस्नानारंभ करून कुंभसंक्रांतियुक्त माघमासी पौर्णिमेला त्याची समाप्ति करावी.

कार्तिकमासासंबंधानेही हेच जाणावे. वैशाख महिना जेव्हा अधिक येतो तेव्हा वैशाखस्नानादि मासव्रताचा आरंभ चैत्री पौर्णिमेला करून, त्याची समाप्ति शुद्ध वैशाखातल्या पौर्णिमेला करावी; म्हणजे हे व्रत दोन महिन्यांचे झाले.

-------------------------

## अधिकमासाविषयी माहिती आणि महत्त्व

हिंदू पंचांगाप्रमाणे चांद्रमासाचे ३५५ दिवसांचे वर्ष असते.

परंतु इंग्रजी व भारतीय सौरवर्ष ३६५ दिवसांचे असते. म्हणजेच प्रतिवर्षी ११ दिवस चांद्रमास वर्षात सौरवर्षापेक्षा कमी असतात आणि हा ११ दिवसांचा फरक काढून दोन्ही वर्षात मेळ घालण्यासाठी प्राचीन शास्त्रकारांनी दर तीन वर्षांनी (अचूकपणे सांगावयाचे झाल्यास ३२ महिने १६ दिवसांनी) एक महिना अधिक धरावा असे सांगितले आहे. दर महिन्याला सूर्य एका राशीतून संक्रमण करतो परंतु या अधिक तेराव्या महिन्यात सूर्याचे संक्रमण नसते म्हणून याला 'मलमास' असे सुद्धा म्हणतात. व त्यास पुढील चांद्रमासाचे नाव देतात.

चैत्र पासून अश्विन पर्यंतच्या ७ मासांपैकीच एखादा

अधिक मास असतो. कारण या काळात सूर्याची गति मंद असते. म्हणून सूर्यास एका राशीतून दुसर्या राशीत जाण्यास ३० दिवसांपेक्षा कमी काळ लागतो. एकदा आलेला अधिकमास पुन्हा १९ वर्षांनी येतो.

या अधिकमासात वर्ज्य असलेली कृत्ये - देव प्रतिष्ठापना, गृहारंभ, वास्तुशांत, विवाह, उपनयन, तीर्थयात्रा, विशेष मंगलमय कार्ये.

या महिन्याचा स्वामी मुरलीधर श्रीकृष्ण, भगवान विष्णु, पुरुषोत्तम (या मासास पुरुषोत्तम मास असेही म्हणतात )

म्हणूनच या महिन्यात विशेषकरून श्रीकृष्णाची भक्ती, पूजा अर्चा करतात, तीर्थस्नान, उपवास, व्रत, नियम आदीमुळे सुखशांती, संसारसुख मिळते.

## अधिकमासात करावयाची व्रते व त्यासंबंधी नियम

१. या महिन्यात पहाटे लवकर उठून थंड पाण्याने

स्नान करावे. अंगाला सुगंधी उटी लावावी. नदीवर अथवा तीर्थाच्या ठिकाणी स्नानादी धार्मिक कृत्ये करावीत. मन निर्मळ ठेवावे. या महिन्यात आवळीच्या झाडाखालील स्नानाला विशेष महत्व आहे.

स्नानानंतर म्हणावयाचा मंत्र

गोवर्धनधरं वंदे गोपालं गोपरूपिणम् ।

गोकुलोत्सवमीशानं गोविंदं गोपिकाप्रियम् ॥

भक्तिर्भवति गोविंदे पुत्रपौत्रविवर्धिनी ।

अकीर्तिक्षयमाप्नोति सत्कीर्तिर्विधते चिरम् ॥

२. या मासात शक्यतो एक वेळेसच अन्नग्रहण करावे. जेवताना मौन पाळावे.

३. अधिक महिन्यात रोज देवाजवळ दिवा लावावा आणि महिन्याच्या शेवटी तो ब्राह्मणाला दान द्यावा.

४. या महिन्यात आपल्याला आवडणार्या वस्तूचा त्याग करावा.

( उदा. एखादे फळ अथवा एखाद्य रंगाचे वस्त्र वगैरे. )

५. या महिन्यातील दानाचे महत्व अनन्यसाधारण

आहे.

हिंदू धर्मात मुलगी - जावयाला लक्ष्मीनारायणाचा जोडा मानतात. म्हणून जावयाला तुपात तळलेले तेहतीसच्या पटीत अनारसे देतात. एका चांदीच्या अथवा तांब्याच्या ताम्हणात अनारसे ठेवून त्यावर तांब्याचा दिवा ठेवून तो लावून जावयाला देतात. (अनारशा ऐवजी बत्तासे, म्हैसूरपाक, वगैरे जाळीदार पदार्थ द्यावयाचे असतात.) या महिन्यात नारळ, सुपार्या, फळे यासारख्या वस्तू सुद्धा तेहतीसच्या पटीत घेऊन दान करतात.

या महिन्यात पुरणाचे दिंड करून इष्ट मित्रांना, नातेवाईकांना भोजन देतात (या दिंडांना धोंडे सुद्धा म्हणतात यावरुन या महिन्यास 'धोंडे महिना सुद्धा म्हणतात.)

* रोज गाईला पूरण पोळीचा घास द्यावा.

* महिनाभर सतत नामस्मरण करावे - यात कुलदैवताचे नामस्मरण सर्वश्रेष्ठ.

* नारायण - श्रीकृष्णाचे स्मरण करावे.

*अपूपदानाचा संकल्प -

ममत्रयस्त्रिंशद्देवतात्मकविष्णुरूपी सहस्त्रांशु श्रीपुरुषोत्तम प्रीतिद्वारा निखिलपापप्रशमपूर्वं पुत्रपौत्रयुत धनधान्यक्षेमसमृद्धि लोकद्वय सुख हेतु पृथ्वीदान फलप्राप्त्यापूपच्छिद्रसमसंख्यवर्षसहस्त्रवधी स्वर्लोकनिवासादिकल्पोक्तफलसिद्ध्यर्थं मलमासप्रयुक्तं अपूपदानं करिष्ये ।

याप्रमाणे संकल्प करून दानवस्तूचे पूजन करावे. नंतर ब्राह्मणाचे पूजन करून पुढील श्लोकांनी त्यांची प्रार्थना करावी,

विष्णुरुपी सहस्त्रांशु: सर्वपापप्रणाशन: ।

अपूपान्न प्रदानेन मम पापं व्यपोहतु ॥

नारायण जगद्बीज भास्कर प्रतिरूपक ।

व्रतेनानेन पुत्रांश्च संपदं चापि वर्धय ॥

यस्य हस्ते गदाचक्रे गरुडो यस्य वाहनं ।

शंख: करतले यस्य स मे विष्णु: प्रसीदतु ॥

कलाकाष्ठादिरूपेण निमेषघटिकादिना ।

यो वंचयति भूतानि तस्मै कालात्मने नम: ॥

कुरुक्षेत्रमयं देश: काल: पर्वद्विजो हरि: ।

पृथ्वीसममिमं दानं गृहाण पुरुषोत्तम ॥

मलानांच विशुद्ध्यर्त्थं तव दास्यामि भास्कर ।

इदं सोपस्करं त्रयस्त्रिंशदपूपदानं सदक्षिणाकं सतांबूलं

* पोथीवाचन/सत्संग - अधिक महिन्याची पोथी शुद्ध सात्विक मनाने रोज एक अध्याय याप्रमाणे महिनाभर वाचून शेवटी उद्यापनाच्या वेळी ब्राह्मणाला दान द्यावी. पोथी वाचन न जमल्यास निदान श्रवण तरी करावी. त्यामुळे भगवान पुरुषोत्तम श्रीनारायण प्रसन्न होतो आणि भक्तांचे कल्याण करतो.

* अधिक मासात केलेल्या पूजेचे तीर्थयात्रेचे फळ अनेक पटींनी मिळते. स्त्रीयांना अखंड सौभाग्याचा व पूत्रपौत्रांचा लाभ होतो,

* अधिकमासात उपोषणाला विशेष महत्व आहे. उपोषणाचे प्रकार एकभुक्त (दिवसातून एकवेळ

जेवावे व एकवेळ उपवास करावा.)

* अयाचित (अकस्मात दुसर्याकडे जेवायला जाणे.)

* उपोषण - पूर्ण उपवास.

* अशक्त मनुष्याने वरीलपैकी एखादा प्रकार तीन दिवस तरी करावा. न जमल्यास निदान एक दिवस तरी करावा.

* महिनाभर तांबूलदान दिल्यास स्त्रियांना अखंड सौभाग्यप्राप्ती होते.

* महिनाभर अखंड दीप लावल्यास लक्ष्मीप्राप्ती होते.

* महिन्यातून निदान एक दिवस तरी गंगास्नान केल्यास सर्वपापापासून मुक्ती मिळते.

* महिनाभर जेवताना मौन पाळल्यास पापांचे निरसन होते.

* अधिकमासात नित्य कर्मे करावीत त्यापासून दूर जाऊ नये. काम्य कर्मे करून नयेत. जे केल्यावाचून गत्यंतर नाही अशी कर्मे अवश्य करावीत,

हि पोथी श्री संत गोपीनाथ यांनी शके सतराशे बहात्तर

साधारण नाम संवत्सरे अधिकमासी वद्य एकादशी मंगळवारी मुमुक्षु नगरीत लिहून पूर्ण केली यात तीस अध्याय असून रोज एक याप्रमाणे वाचावा व शेवटी उद्यापन करून ब्राह्मणाला पोथी दान द्यावी.

---------------------------

## अधिकमास महात्म्य

## अध्याय पहिला

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः ॥ श्रीपांडुरंगाय नमः ॥

ॐ नमोजी गणराजा ॥ एकदंता चतुर्भुजा ॥
फरशपाणि अधोक्षजा ॥ उभवीं ध्वजा यशाची ॥ १ ॥

ऐसा तूं विघ्नहरुं ॥ ग्रंथारंभीं नमस्कारू ॥ देऊनियां अभयवरुं ॥ नेई परपारु ग्रंथ हा ॥ २ ॥

नमूं आदीजननी ॥ चराचर जियेपासुनी ॥ ते शारदा हंसवाहिनी ॥ ग्रंथारंभीं नमियेली ॥ ३ ॥

नमूं श्रीगुरुरामदास ॥ जो सर्वीसर्वस्व उदास ॥ तयाची धरूनियां कास ॥ ग्रंथ शेवटास जावो हा ॥ ४ ॥

प्रार्थनेचे एक कारण ॥ आयुष्य नसे आपुल्या आधीन ॥ ग्रंथारंभीं लोभ धरून ॥ वदेन म्हणे तो मूर्खहो ॥ ५ ॥

येथें कर्ता आणि करविता ॥ वक्ता अणि वदविता ॥ सर्वही रघुनाथसत्ता ॥ वृथा अहंता प्राणियाची ॥ ६ ॥

असो आतां हे वार्ता ॥ ग्रंथ तरि हा कोणता ॥ तरी अधिक माहात्म्य ग्रंथा ॥ वंदू आता निर्धारें ॥ ७ ॥

संस्कृत वाणी व्यासोक्त ॥ पद्मपुराणींचें संमत ॥ तयाचा असे हा मतितार्थ ॥ तो असो अवगता श्रोतिया ॥ ८ ॥

एकदा मुनय: सर्वे नैमिषारण्यमागता: ॥
परब्रह्मरतायेच हरिद्वारनिवासिनः ॥ १ ॥

कवण एक अवसराचे संधीं ॥ मिळोनियां ऋषींची मांदी ॥ नेमिषारण्याचिये अवधी ॥ येते झाले सत्वर ॥ ९ ॥

जे महा तपस्वी योगिराज ॥ महानुभाव तेज:पुंज ॥

हरिद्वार-कुरुक्षेत्रज ॥ समुदायेंसीं पातले ॥ १० ॥

शशीसमान शीतळता ॥ भानुसमान तेजाळता ॥ तयाचिया आशीर्वादे तत्वता ॥ रंक तो प्रभुत्वता पावे पै ॥ ११ ॥

ऐसे सर्वही ऋषीश्वर ॥ गालव आणि शुकेंद्र ॥ नामें सांगतां अपार ॥ होईल प्रसर ग्रंथातें ॥ १२ ॥

समग्र ऋषी मिळोन ॥ सूताप्रती करिती प्रश्न ॥ कलियुगीं अन्नगतप्राण ॥ परमार्थसाधन केवि घडे ॥ १३ ॥

त्याहीवरी दरिद्र व्यथा ॥ शरीरीं जडे रोग अवस्था ॥ नित्य नामस्मरण करितां ॥ अवकाश कदा नसे पै ॥१४ ॥

जरी कीजे तीर्थाटण ॥ व्याधिग्रस्त शरीर क्षीण ॥ संसार धंदा करितां जाण ॥ अवकाश कदां नसे पै ॥ १५ ॥

शक्तीविण सर्वथा ॥ न जाववे तीर्थपंथा ॥ द्रव्यें जावें जरि तत्वता ॥ तरि दरिद्रव्यथा अपार ॥ १६ ॥

स्वगृही करावें धर्मदान ॥ तरि द्रव्य पाहिजे तयालागुन

॥ अथवा भगवंतीं होता अनन्य ॥ तरि गतायुषी प्राणी हा ॥ १७ ॥

ऐसियासी कवण उपाय ॥ प्राणिया कैसा तरणोपाय ॥ अमोल्य हा नरदेह ॥ केवीं पावे परलोकातें ॥ १८ ॥

अनंत पापाचिया राशी ॥ दरिद्रें घडती प्राणियासी । मग पावे रवरव नरकासी ॥ यमयातनेसी अपार ॥ १९ ॥

नानाप्रकारें यमयातना ॥ शास्त्रीं बोलिले प्रकार नाना ॥ ते जाचणी भोगिता जना ॥ उसंत जाणा नसेची ॥ २० ॥

ऐसिया प्राणियासी ॥ कैसेनि करावें परमार्थासी ॥ तरि कृपा करून आम्हांसी ॥ कांहीं उपाय सांगावें ॥ २१ ॥

ऐसें समस्तांचें प्रश्नाक्षर ॥ ऐकुनियां सविस्तर ॥ बोलता झाला उत्तर ॥ व्यासशिष्य सूत पै ॥ २२ ॥

श्रृणुध्वमृषयः सर्वे कथा पौराणिकीं शुभां ॥ लक्ष्मीमाधवसंवादं श्रृण्वतां पापनाशनं ॥ २ ॥

सूत वदे तेव्हां वदनमौळी ॥ ऐकाहो सर्व ऋषीमंडळी ॥ एकदा श्री माधव जवळी ॥ प्रार्थिती जाली

कमळजा ॥ २३ ॥

तुम्हा ऐसाची प्रश्न ॥ लक्ष्मी करि आपण ॥ हे माधव जनार्दन ॥ ऐका वचन पै माझें ॥ २४ ॥

श्रीलक्ष्मी उवाच ॥ देवदेव जगन्नाथ भुक्तिमुक्तिप्रदायक ॥ कथयस्व प्रसादेन संशयोमे ह्रदिस्थितः ॥ ३ ॥

मुनीश्वराः प्रवदन्ति कृष्णद्वैपायनादयः ॥ अदत्तं नैवलभ्येत दत्तंचैवोपतिष्ठति ॥ ४ ॥

यथा वंध्या गृहस्यस्थ पतिवंशविनाशिनी ॥ तथा दानविहीनंतु जंतोर्जन्मनिरर्थकं ॥ ५ ॥

हे भगवान् देवदेवेश ॥ तुम्ही तो सर्व देवांचे ईश ॥ आणि प्राणिमात्रांचे पाळणाधीश ॥ सर्वत्रांचे स्वामीयां ॥२५॥

तरि कृपाळुत्वें करूनी ॥ निवेदावें मजलागुनी ॥ जे चराचर जीव प्राणी ॥ केवी तरती भवार्णवीं ॥ २६ ॥

जैसी पतिवीण रमणी ॥ न शोभे कदां दीन यामिनी ॥ तेवी अदत्त जालिया प्राणी ॥ न शोभे दानीं कदा तो ॥ २७ ॥

तैसे दानधर्माविण जे नर ॥ ते द्विपदाचे केवळ खर ॥

तरि अल्प वेंचुन पुण्य अपार ॥ कवण असे स्वामियां ॥ २८ ॥

कवण दान कवण तप ॥ हें कृपा करूनियां अल्प ॥ मज निवेदावें स्वल्पस्वल्प ॥ तरणोपाय जगातें ॥ २९ ॥

ऐसा प्रश्न समुद्रतरण्याचा ॥ आकर्णुनी बोलतसे वाचा ॥ स्वामी तो दीन जनाचा ॥ केशवराज सत्य पै ॥ ३० ॥

तथापि कथयंतीह दैवज्ञाः शास्त्रकोविदाः ॥ मलिम्लुचेतुसं प्राप्ते क्रियाः सर्वाः परित्यजेत् ॥ ६ ॥

युक्तायुक्तं यदा पूर्वाचार्येर्यथोदितं ॥ देवकार्यं पितृकार्य तीर्थयात्राव्रतादिकं ॥ ७ ॥

क्षौरंमौजीविवाहंच व्रतंकाम्योपवासिकं ॥ मलिम्लुचेसदात्याज्यं गृहस्थैश्च विशेषतः ॥ ८ ॥

ऐकेंहो क्षीराब्धितनये ॥ दुर्लभ तो नरदेह ॥ येथें सहजासहज घडती अपाय ॥ सायास नसतां अनायासें ॥ ३१ ॥

ते कवण म्हणसी तरि ऐकें ॥ युक्तायुक्त प्रकार देखें ॥

शास्त्रीं बोलिले अनेके ॥ ते अवश्यक घडतीकीं ॥ ३२ ॥

स्नानसंध्या देवतार्चन ॥ कुळधर्म वर्णाश्रम जाण ॥ पर्वकाळ न घडे दान ॥ मग तीर्थाभ्रमण कायसें ॥ ३३ ॥

शरीरीं भरतां व्याधी ॥ मग कैचे स्नान देवतार्चन विधी ॥ अथवा पर्वकाळ कुळधर्मसंधी ॥ द्रव्याविण सिद्धी केवि होय ॥ ३४ ॥

किंवा अकाळी घडे मौंजी लग्न ॥ द्रव्य नाहीं म्हणवून ॥ शास्त्रीं निर्धार केला जाण ॥ अष्ट वर्षांचा निर्धारें ॥ ३५ ॥

अष्ट वर्षी चौलोपनयन ॥ तैसेंच कन्येचें कन्यादान ॥ हे समयासीं न घडती जाण ॥ म्हणोनि अकाळ बोलिजे ॥ ३६ ॥

कां आलिया पितृदिवस ॥ कांता जालिया अस्पर्श ॥ म्हणोनि अकाळीं तो दिवस ॥ शास्त्राज्ञेनें ऐसें बोलती ॥ ३७ ॥

अथवा व्याधिग्रस्त जालें शरीर ॥ मग राहिला सहजची आचार ॥ तैसेंच प्राशन करणें लागे नीर ॥ अन्नही

परिकर शय्येवरी ॥ ३८ ॥

इतुकिया दोषांच्या मळासी ॥ संचय होतांचि समरसी ॥ तयाते म्हणती मलमासी ॥ घटका पळ दिवस गणितां ॥ ३९ ॥

नक्षत्र आणि मासतिथी ॥ हे कवणें अर्थे उणे होती ॥ तरि ऐसिया दोषाचि होतां भरती ॥ मग ते पावती क्षयाते ॥ ४० ॥

म्हणोनी तिसरे वरुषीं जाण ॥ येक मास अधिक तेणें गुण ॥ मग ते होय म्हणोनि नामाभिधान ॥ मलमास जाण बोलिजे ॥ ४१ ॥

तरि ऐसिया दोषांचें क्षाळण ॥ होईल तेचीं ऐके साधन ॥ मल मासाचें जें अधिष्ठान ॥ तें स्वयें मीच जाण वल्लभे ॥ ४२ ॥

जेवी त्रिगुण निरसीलियावरी ॥ वस्तु उरे साक्षात्कारीं ॥ हें खूण जाणावी चतुरीं ॥ संत सेवा धरिजे ॥ ४३ ॥

तैसें तीन संवत्सर गेलियां ॥ उरे मास ज्योतिर्मया ॥ नाम धरिती जाणती तया॥ केशवराया म्हणोनी ॥४४॥

केला सर्व कर्माचा नाश ॥ उरला नाहीं लवलेश ॥

म्हणोनि बोलिजे केश ॥ दोषग्रासक जो मी ॥ ४५ ॥

तया मासाचें महिमान ॥ ऐकें होउनी सावधान ॥ मलमास प्राप्त झालिया जाण ॥ मांगल्य विधान लोपती ॥ ४६ ॥

न होती विवाह कार्य ॥ न होती उपनयन आचार्य ॥ तीर्थाटण पर्याय ॥ तोही न घडे जाण पै ॥ ४७ ॥

तरी ऐसियासी काय कीजे ॥ कवण पुण्यें दोषक्षाळीजे ॥ तरि ऐकें कमळजे ॥ जें सुगम भूमंडळी ॥ ४८ ॥

असंक्रांतो यदा मासः प्राप्यतेमानवैः प्रिये ॥ महोत्सवस्तदा कार्य आत्मनोहितकांक्षिभिः ॥ ९ ॥

संक्रांतीहीन जो मास ॥ म्हणोनियां मलमास ॥ येथें जया वाटे हव्यास ॥ परलोकीचा पै ॥ ४९ ॥

तयानें काय आचरावें ॥ स्त्री अथवा पुरुष भावें ॥ पुण्यक्रिया स्वभावें ॥ आचरण पै कीजे ॥ ५० ॥

ऐकूनी ऐसें उत्तर ॥ लक्ष्मी बोले प्रत्युत्तर ॥ कवण विधी कवण प्रकार ॥ कृपा करूनि सांगिजे ॥ ५१ ॥

लक्ष्मी उवाच ॥ यदि नाथत्वया प्रोक्तामहमेव प्रदायकः ॥ उद्यापनंच विधिवदितिहाससमन्वितं ॥ १० ॥

हे नाथ कृपाळुवा ॥ यथानुक्रमें निवेदावा ॥ उद्यापन विधी बरवा ॥ जें पूर्वी केशवा पुसिलें ॥ ५२ ॥

मग बोलों आदरिलें ॥ देवें परम हास्य केलें ॥ म्हणे अद्यापी नाहीं गेलें ॥ अज्ञान पै तुझें ॥ ५३ ॥

ब्राह्मणोस्य मुखमासीत् ॥ ऐसी तो श्रुती गर्जत ॥ ते ब्राह्मण मुख माझें निश्चित ॥ हें तूं जाणत असती कीं ॥ ५४ ॥

तरी ते ब्राह्मण म्हणसी कैसे ॥ सांगतो तू तें जाण ऐसें ॥ वेदत्रयी ज्ञानप्रकाशे ॥ अनारिसें सर्वदां ॥ ५५ ॥

विद्याविनयसंपन्ने ब्राम्हणेगविहस्तिनी शुनिचैवश्वपाकेच पंडिताः समदर्शिनः ॥ ११ ॥

इहीं लक्षणीं जे मंडित ॥ स्नानसंध्याशीळ सदायुक्त ॥ विद्या असोनि अगर्वित ॥ ते प्रिय होत मजलागीं ॥ ५६ ॥

स्वगृहीं जें पचते अन्न ॥ अग्निहोत्र श्रौतस्मार्तजाण ॥ वेदांतरंगींचे ज्ञान ॥ तें प्रिय जाण मजलागीं ॥ ५७ ॥

वेदज्ञ आणि शास्त्रसंपन्न ॥ पंडित आणि विप्र जाण ॥ याज्ञीक अज्ञाईक जाण ॥ ते प्रिय मजलागीं ॥ ५८ ॥

इतुकें असूनि अगर्वित ॥ वोळंगता नाहीं किंचित ॥ समान दृष्टी सर्वातीत ॥ तो प्रिय निश्चित मजलागीं ॥ ५९ ॥

म्हणोनि माझें मुख हे निर्धार ॥ वेदेंचे केला असे साचार ॥ ऐकूनियां ऐसें उत्तर ॥ लक्ष्मी बोलती जाहली ॥ ६० ॥

ऐका विनंती स्वामिनाथा ॥ येवढी पदवी ब्राह्मणा देता ॥ तरी कां फिरती लोलंगता ॥ कवडीसाठी विदेशीं ॥ ६१ ॥

तरि ये विषयींचा संशयो ॥ निरसावा जी संदेहो ॥ तंव बोलेति ये तें माधवो ॥ ऐकें अभिप्रावे पैं याचा ॥ ६२ ॥

कृत त्रेत द्वापार आणि कली ॥ हे निर्माण जाले जिये काळीं ॥ सूर्यकर्णीं उद्भवे येकची वेळीं ॥ तया काळींचा वृत्तांत असे पै ॥ ६३ ॥

चारियुगें निर्माण होतां ॥ मूर्तिमंत उभी राहिलीं तत्वतां ॥ तै तेतीस कोटीसी विधाता ॥ तोही होता जवळीके ॥ ६४ ॥

ते वेळीं युगाचा युगधर्म ॥ चारी वर्णाचा वर्णाश्रम ॥

तयामाजी श्रेष्ठ ब्राह्मण धर्म ॥ तोची नेम अवधारी ॥ ६५ ॥

कृत युगामाझारी ॥ स्नानसंध्यादी कर्मे माध्यानवरी ॥ ब्राह्मणें संपादावी बरवी परी ॥ मग आश्रमा भीतरी पै यावें ॥ ६६ ॥

परी तयांची योगक्षेमचिंता ॥ रायानी करावी व्यवस्था ॥ न मागतां पुरविती पदार्था ॥ कार्य प्रसंगता संपादी ॥ ६७ ॥

ऐसा प्रथमयुगीं धर्म होता ॥ दुसरियाचा ऐक आतां ॥ त्रेता युग प्राप्त होतां ॥ धर्म कोणता अवधारीं ॥ ६८ ॥

एक याम परियंत वरी ॥ नित्य नेम सारावा भूसुरीं ॥ मग जाऊन राजद्वारीं ॥ जोडल्या करीं विनवावें ॥ ६९ ॥

तंव तया प्रभूनें जाणा ॥ पुरविजें ब्राह्मणाची वासना ॥ द्वितीय युगींचीही रचना ॥ कर्माचरण अंतरलें ॥ ७० ॥

आतां तिसरें द्वापार ॥ ऐकें तयाचा निर्धार ॥ यज्ञादी कर्मे करिती राजेश्वर ॥ तेथे जाती न पाचारितां ॥ ७१ ॥

धन आशेसाठीं बापुडीं ॥ हिंडताती देशोधडी ॥ तेथें स्वधर्मातें बापुडीं ॥ अंतरलीं अनायासें ॥ ७२ ॥

कैची संध्या कैचे स्नान ॥ अवघें द्रव्याचेंच ध्यान ॥ म्हणोन हिंडती रानोरान ॥ कर्मभोगें आपुलिया ॥ ७३ ॥

ऐसें चतुर्युगाचें विवरण ॥ तुज केले म्या कथन तरी ब्राम्हणांचा अन्याय कवण ॥ पाहे शोधुन अंतरी ॥ ७४ ॥

केला अवतार तो मीच जाण ॥ म्हणोन ब्राम्हणोस्यमुख म्हणोन ॥ या लागीं दोष न ठेवून ॥ निर्दोषी जाण भूसुर ॥ ७५ ॥

जैसें स्वर्गीं सुरवर ॥ तैसें पृथ्वीवरी भूसुर ॥ होतो माझाच अवतार ॥ म्हणोन अगोदर पूजावे ॥ ७६ ॥

म्हणोन जया वाटे पुनित व्हावे ॥ तेणें हे व्रत करावें बरवें ॥ देव ब्राम्हण पूजावे ॥ ऐक बरवें परी कैसी ॥ ७७ ॥

प्रात:काळीं उठोनियां ॥ नित्य नेमादिकाक्रिया ॥ सारूनियां स्नानविधी बरविया ॥ मूर्ती पूजाव्या देवतार्चनीं ॥ ७८ ॥

उपरी सपत्निक ब्राम्हणातें । पाचारिजे भावार्थे ॥ आसन देउनि तयातें ॥ पूजाविधानातें पैं कीजे ॥ ७९ ॥

अर्घ्यपाद्यादि पूजा बरवी ॥ चंदन सुगंधी पुष्पें आणावी ॥ तेणें विधी समर्पावी ॥ पूजा मजप्रीत्यर्थ ॥ ८० ॥

मग नाना प्रकारें मिष्टान्न ॥ अपूपलाडू पक्वान्न ॥ क्षीरखांड पायसान्न ॥ करावी निर्माण तयालागी ॥ ८१ ॥

नाना प्रकारें चित्रविचित्र ॥ शाखा निर्माव्या सुपवित्र ॥ कथिकवटकादी यंत्र ॥ दधी मिश्रित करावे ॥ ८२ ॥

अनेक प्रकारची रायतीं ॥ भावें करावी तयाप्रती ॥ दध्योदन भोजनांतीं ॥ तयाप्रति समर्पावे ॥ ८३ ॥

ऐसें षड्रस मिष्टान्न ॥ आकंठ घालावें भोजन ॥ येणें करितां मी जनार्दन ॥ संतुष्ट होय तयावरी ॥ ८४ ॥

अर्घ्यदद्यात्सपत्नीकः प्रहृष्टेनांतरात्मना ॥ मंत्रेणानेन देवेशि ब्राह्मणैः सहमांस्मरन् ॥ १२ ॥

अर्चयित्वार्ध्यदानेन ब्राह्मणा पूजयेत्ततः ॥ सपत्नीकान् शुचीन् शांतन्मधुचूर्णैः सभोजनैः ॥ १३ ॥

स्मर्तव्यो द्विजरूपेण तत्पत्नीत्वामनुस्मरन् ॥ परिधाय यथा शक्त्या वस्त्रालंकारचंदनैः ॥ १४ ॥

भोजनें झालियावरी ॥ यथाशक्त्या वस्त्रें अळंकार बरी ॥ मदर्पण बरवियापरी ॥ तया करीं अर्पावें ॥ ८५ ॥

मग घृतपक्व पांच पक्वान्नें करून ॥ फल तांबूल दक्षिणा दान ॥ येणें करूनी वायनदान ॥ द्यावें जाण तयासी ॥ ८६ ॥

एला लवंगा जायफळ ॥ पत्रीसहित त्रयोदशगुणी तांबूल ॥ अर्पुनी घालीजे माळ ॥ गळां सुगंध पुष्पाची ॥ ८७ ॥

ऐसें पूजन करून बरवें ॥ तयांचे आशीर्वाद घ्यावे ॥ लक्ष्मीनारायण जाणूनि नमस्कारावे ॥ मग बोळवावे स्वआश्रमा ॥ ८८ ॥

ऐसें व्रत एक मासवरी ॥ करावे सहपरिवारीं ॥ आपण नक्त करावें अस्तमानावरी ॥ मग भोजनपरीसारावी ॥ ८९ ॥

ऐसें करितां व्रताचरण ॥ होय दोष मळाचें क्षाळण ॥ मग शुचिस्मंत होऊन ॥ पावे सदन माझें तो ॥ ९० ॥

ऐसा इतिहास बरवा जाण ॥ लक्ष्मीप्रती श्रीनारायण ॥ स्वमुखें श्रुत करी आपण ॥ तेंची कथन कथिलेसे ॥ ९१ ॥

प्राकृत भाषा बरवी ॥ तुम्हांतें अर्पिली आवघी ॥ संशय न धरा जीवी ॥ पुराणीं पाहावी प्रचीत ॥ ९२ ॥

ऐसा प्रथमोध्याय बरवा ॥ तुजप्रती पावो माधवा ॥ येथुनी कथाभाग अवघा ॥ अवधरावा पुढें पै ॥ ९३ ॥

करितां ऐसे व्रत ॥ ना दरिद्र ना वैधव्य अपमृत्य ॥ यदर्थी श्लोकाचा गुह्यार्थ ॥ स्वयें भगवंत बोलिलासे ॥ ९४ ॥

मलमासव्रतं नारीया करोति समुद्रजे ॥ न वैधव्यं न दारिद्र्यं पुत्रशोकः कदाचन ॥ १५ ॥

इतिश्री अधिक माहात्म्य ॥ पद्म पुराणींचें संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ प्रथमोऽध्याय गोड हा ॥ ९५ ॥

॥ इति प्रथमोध्यायः ॥

-------------------------

## अध्याय दुसरा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ जय सद्‌गुरुनाथ समर्था । तुमचे चरणीं माझा माथा ॥ सदा सर्वदां राहो देई ताता ॥ ऐसा वर दाता देई कीं ॥ १ ॥

नमनीं नमन जरी करावें ॥ तरी नमनरूपी हें जग आघवें ॥ तेथें नमनाचिया नांवें ॥ शून्याकार ॥ २ ॥

शून्याकार जेथें जाला । तेथें भासची अवघा बुडाला ॥ तया भासापलीकडे ठाव स्वामिला ॥ म्हणोनि नमनाला मति नाहीं ॥ ३ ॥

तरी स्फूर्ती स्फुरे अंतरीं ॥ आणि मूर्ति ठसावी बरी ॥ जैसिया कृपेची लहरी ॥ मज दीनावरी असावी ॥ ४ ॥

चित्तीं धरिला जो नेम ॥ तो सिद्धि पावो सुगम ॥ अंतरीं वसूं दे प्रेम ॥ नेई नेम सिद्धी हा ॥ ५ ॥

असो आतां तो स्तुतिवाद ॥ वदू आतां कथानुवाद ॥ जेणें संतोषीय गोविंद ॥ स्तुतिवाद ऐकुनी ॥ ६ ॥

जैसे याचक भिकारी ॥ जाती श्रीमानाचिया द्वारीं ॥ त्याची स्तुती केलियावरी ॥ प्रसन्न अंतरीं तो होय ॥ ७ ॥

मग होऊनियां प्रसन्ना ॥ पुरवी तयाची मनकामना ॥ तेवी स्तुतिवाद्यें लक्ष्मीरमणा ॥ दासाप्रती पाळीत ॥ ८ ॥

मलमासेषु सर्वेषु स्वयंदेवो जनार्दनः ॥ तमुद्दिश्य कृतं यच्च स्वल्पं वा यदि वा बहु ॥ १ ॥

दानं होमं व्रतं स्नानं तपो ब्राह्मण भोजनं ॥ तेन लिप्तेन देहेन स याति नरकं चिरं ॥ २ ॥

मग म्हणे क्षीराब्धिशाई ॥ ऐकें हो कांचनदेही ॥ या मलमासाचे ठाई ॥ काय की जे हो लक्ष्मी ॥ ९ ॥

तरी अल्प अथवा स्वल्प ॥ कांहीं तरी कीजे दान तप ॥ होम अथवा ध्यान जप ॥ शक्तिनुसार पैं कीजे ॥ १० ॥

शक्ति असून जो न करी । तो रवरव भोगी अघोरीं ॥ यांत संदेह निर्धारी ॥ नसे सुंदरी जाण पां ॥ ११ ॥

ऐसें ऐकूनि उत्तर ॥ लक्ष्मी वदे प्रत्युत्तर ॥ हे नाथ दीनोद्धार ॥ प्रश्नाक्षर ऐकिजे ॥ १२ ॥

श्रीरुवाच ॥ निर्धनाश्चदुराचाराः परभाग्योपजीविनः ॥ नरा न किंचिज्जानंति पशुवद्विचरांतिहि ॥ ३ ॥

विवेको नास्ति येषांवै किंकार्यतैर्मलिम्लुचे ॥ तत्सर्वं ब्रूहि मे देव यद्यहं तववल्ल्भा ॥ ४ ॥

हे स्वामी जगन्निवासा ॥ निर्धनातें उपाव कैसा ॥ दुराचारी पुण्यलेशा ॥ स्वप्नी नेणें कैसा तो ॥ १३ ॥

अविवेकी असती जे प्राणी ॥ पशुवत विचरति जनीं ॥ तया प्राणियाते कैसेनी ॥ मुक्ती घडे स्वामिराजा ॥ १४ ॥

यासीं उपाय केउता ॥ तो सांगिजे कृपावंता ॥ म्हणोन चरणीं ठेविला माथा ॥ मग अनंत बोलत ॥ १५ ॥

विष्णुरु० ॥ व्रते दाने तथा नक्ते याचिते कायशोषणे ॥ सर्वथा नास्तिसामर्थ्यं तैः कार्य द्विजसेवनं ॥ ५ ॥

साधूनां दर्शनंस्पर्शः ॥ कीर्तनं श्रवणं तथा ॥ कर्तव्यं शक्तिहीनैस्तु लोकांतर सुखप्रदं ॥ ६ ॥

तरी ऐेक हो सुंदरी ॥ द्रव्य नसे जरी पदरी ॥ तरीं कष्टवावें शरीरीं ॥ साधुदर्शनें महालाभु ॥ १६ ॥

देवदर्शनपुराणी ॥ काया कष्टवी जे गोसेवनीं ॥ तयातें न लगे कपर्दिक दानी ॥ तपें करूनि मी तोषें ॥ १७ ॥

येच विषयीं इतिहास ॥ ऐके हो स्वस्थ मानस ॥

जयाचेनि मज संतोष ॥ तोचि प्रकार अवधारीं ॥ १८ ॥

गावः पवित्रमतुलं गावो मंगलमुच्यते ॥ गावोभूमिश्च भूतानि स्थावराणि चराणिच ॥ ७ ॥

या भुवनत्रयाचे ठायीं ॥ गौतमी ऐसै दैवत नाहीं ॥ जीणें कष्टऊनियां देहीं ॥ क्षीरवृष्टी करी जगातें ॥ १९ ॥

तरि प्रत्यही करावें पूजन ॥ न घडे तरि मळमासीं जाण ॥ मासवरी करावें पूजन ॥ तें निरुपण अवधारी ॥ २० ॥

एकमास परियंत जाण ॥ स्वयें नक्त करावें आपण ॥ प्रातःकाळीं करून स्नान ॥ देवतार्चन पैं कीं जें ॥ २१ ॥

मग करावें गौतमी पूजन ॥ तया येवढें नसे पुण्य ॥ घालूनि तृणधान्य ॥ भावें चरण वंदावें ॥ २२ ॥

गौपूजे लाविजे भाळीं ॥ तेणें स्नान केलें यमुनाजळीं ॥ उठोनियां प्रातःकाळीं ॥ आधी गौतमी नमावी ॥ २३ ॥

मग गौतमपुत्रा करून वंदन ॥ गोमय सडा संमार्जन ॥

तया योगें पवित्र सदन ॥ होय जाण तयाचे ॥ २४ ॥

तया घरीं लक्ष्मीनिवास ॥ ठाव नसे रोग अपमृत्यास ॥ निरंतर करी निवास ॥ सदैव यश तो लाहे ॥ २५ ॥

ऐसें गौतमीचें पूजन करून ॥ मग सुशीळ सपत्नीक द्विज बोलावून ॥ तयाची पूजा अर्घ्यपाद्यादी करून ॥ द्यावें दान तयाप्रती ॥ २६ ॥

सालंकारीं संयुक्त करून ॥ दोहनपात्र वस्त्र अलंकार जाण ॥ गळां पुष्पमाळा घालून ॥ घंटा बांधून दान द्यावें ॥ २७ ॥

तये घंटीचा होतां नाद ॥ स्वर्गी सुख पावे पितृवृंद ॥ उतरोनि वैतरणीचा कंद ॥ सुख संवाद तो करी ॥ २८ ॥

पुरुष अथवा हो का नारी ॥ उभयतां लाभाची समान परी ॥ गौतमी ऐसी पवित्र पृथ्वीवरी ॥ दैवत आन असे ना ॥ २९ ॥

गोभ्योयज्ञाः प्रवर्तते गोभ्योयज्ञाः समुत्थिताः ॥
गोभ्योवेदाः समुत्तीर्णाः स षडंगपदक्रमाः ॥ ८ ॥

तृणानिखादंतिवसंत्यरण्ये पिबंतितोयान्य परिगृहाणि ॥

दुह्यंतिवाह्यंतिपुनंति विश्वं गवांरसैर्जीवति जीवलोक: ॥ ९ ॥

स्पृष्टांश्चंगाव: शमयंति पापं दत्ताश्च गावास्त्रिदिवंनयंति संरक्षिताश्चोपनयंति वित्तं गोभिर्नितुल्यं धनमस्ति किंचित् ॥ १० ॥

गौतमीवीण न होय यज्ञ ॥ गोक्षीरेंवीण न घडे हवन ॥ पंचामृतावीण न घडे पूजन ॥ श्रीविष्णु महाविष्णूचें ॥ ३० ॥

जया घरीं गौतमीचें पूजन ॥ पवित्र तयाचें सदन ॥ जेथें नसे सडासंमार्जन ॥ जाणावें सदन स्मशान तें ॥ ३१ ॥

पहा ते गौतमी परोपकारी ॥ तृण भक्षून अरण्यामाझारी ॥ स्वइच्छा जळातें प्राशन करी ॥ भार कवणावरी घालीना ॥ ३२ ॥

स्वसदनीं येऊन जाण ॥ क्षीरवृष्टी अमृत समान ॥ तेणें तृप्त होती अबलाजन ॥ ऐसी कृपाघन धेनू ती ॥ ३३ ॥

गोमयें पावन सदन ॥ अंगस्पर्शे पापक्षाळण ॥ गोमूत्रें पंचगव्यातें पवित्रपण ॥ शास्त्रीं जाण बोलिलेंसे ॥ ३४

॥

प्रायश्चित्त घेतां जनाप्रती । देहाचे दोष दहन होती ॥ मग तें स्वसुखे नांदती ॥ प्रसादे धेनूचिया ॥ ३५ ॥

ऐसें धेनूचें करून पूजन ॥ मग ते ब्राह्मणा द्यावी दान ॥ तेणें पुनीत होती जन ॥ जगजीवन संतोषे ॥ ३६ ॥

कृपाकरून तयावरी ॥ प्राप्त करी निजपुरी ॥ न विसंबे क्षणभरी ॥ ऐसें मुरारी बोलिला ॥ ३७ ॥

ऐसें केलिया गोदान ॥ ते दिनी करावें ब्राह्मण भोजन ॥ षड्रस घृतासहित अन्न ॥ यथेष्ट भोजन पै द्यावें ॥ ३८ ॥

त्रयोदश गुणी तांबूल ॥ वेळा लवंगा सुपरिमळ ॥ चंदन अर्पिजे सुशीतळ ॥ द्विजकुळ तोषवावें ॥ ३९ ॥

मग वस्त्र अलंकार नाना ॥ शक्तिनुसार द्यावी दक्षिणा ॥ तुज प्रीत्यर्थ जनार्दना ॥ म्हणोन चरणां नमावें ॥ ४० ॥

परि येथें अवघड मोठें ॥ तात्काळ मनीं अहंकार उठे ॥ अहंकारें मी तव न भेटें ॥ नेटे पोटें पळे मी ॥ ४१ ॥

म्हणोनी यथासांग कर्म तें घडेना ॥ घडे कर्म तें

पुण्यगाठीं पडेना ॥ ऐसें बोलिले साधूवचना ॥ तें अमान्य करवेना माझेनी ॥ ४२ ॥

अहो या साधु वचनासाठीं ॥ मी अवतार धरी कोटी ॥ परी तयाचीं वचनें गोमटीं ॥ पाववी शेवटीं सिद्धीतें ॥ ४३ ॥

यालागीं निरहंकार जाण ॥ करावें जप तप दान पुण्य ॥ तयातें मी जनार्दन ॥ न विसंबे क्षणभरी ॥ ४४ ॥

माझा मज अहंकार जाहला ॥ हयग्रीव जाहलों तये वेळां ॥ म्हणोनि सकल जगाला ॥ करून गलबला सांगतों ॥ ४५ ॥

थोडें करा अथवा फार ॥ परि मनीं न धरा अहंकार ॥ तेणें मी तुष्टें सर्वेश्वर ॥ वाहें भार तयाचा ॥ ४६ ॥

यदर्थी श्लोक गीतार्थाचा ॥ पार्था प्रति निरोपिला साचा ॥ तोचि अभिप्राय येथीचा ॥ मनीं आणा निर्धार ॥ ४७ ॥

मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिमवाप्स्यसि ॥ ततः कर्मफलत्यागस्त्यागाच्छातिरनंतरं ॥ ११ ॥

ऐसें फलाशारहित दान ॥ जे करिती मदर्पण ॥ ते प्रिय

मज लागुन ॥ बहु बोलुन काय दाऊं ॥ ४८ ॥

जया आवडी मोक्षाची ॥ तेणें पूजा करावी नेमाची ॥ मलमास विशेषाची ॥ सामोग्री पुण्याची अपार ॥ ४९ ॥

यो गंतुं वांच्छति स्वर्ग गोपूजां सकरोति वै ॥ अधिमासे विशेषेण सुभक्त्या यवसादिना ॥ १२ ॥

ऐसें हें गो महिमान ॥ तुज म्यां केलें निवेदन ॥ म्हणोनि स्वये जनार्दन ॥ लक्ष्मीप्रति आपण सांगत ॥ ५० ॥

तोचि अभिप्राय आघवा ॥ तुम्हां श्रोतियां बरवा ॥ प्राकृत भाषेचिया गौरवा ॥ किंतु न धरावा मानसीं ॥ ५१ ॥

संमति साक्ष घ्यावी आदरें ॥ माझीं पद्मरचने होती अक्षरें ॥ स्फूर्तीदाता श्री रघुवीरें ॥ तया आधारें वदलों पैं ॥ ५२ ॥

ऐसिया गोपूजनाचें विधान ॥ भावें करिती पूजोनी दान ॥ तयाची यमयातना चुकोन ॥ पावे सदन मोक्षाचें ॥ ५३ ॥

यदर्थी संशय न धरावा ॥ साक्षेपें श्लोक परिसावा ॥

संमतेसीं प्रत्यय पाहावा ॥ पद्मपुराणीचा पै ॥ ५४ ॥

पूजनंसं प्रवक्ष्यामि गवामघनिवारणं ॥ दानं देयं विशेषेण स्वर्गदं सुखदं नृणां ॥ १३ ॥

मग लक्ष्मी म्हणेजी माधवा ॥ ऐसा महिमा सांगतां बरवा ॥ परी संदेह माझिया भावा ॥ तो निरसावा स्वामियां ॥ ५५ ॥

गौतमी देवी अवतारी ॥ आणि प्रचितीस परउपकारी ॥ देवी ती विष्ठाभक्षक निर्धारी ॥ काय म्हणोनिया ॥ ५६ ॥

मग बोले रमाधवो ॥ ऐक याचा अभिप्रावो ॥ शापास्तव पाहाहो ॥ विष्ठाभक्षक ते जाली ॥ ५७ ॥

तरी शाप तो कवणाचा ॥ परिसे भाव पैं येथींचा ॥ सदाशिवे दिधला साचा ॥ शाप साचा तियेतें ॥ ५८ ॥

एकदां आम्हीं आणि चतुरानन ॥ गेलों कैलासा लागुन ॥ परि चतुराननातें अभिमान ॥ सृष्टिकर्ता मी एक ॥ ५९ ॥

तें जाणोनि सदाशिवें ॥ ब्रह्मयातें निवेदिलें बरवें ॥ जे आमुचे मुगुटातें अवलोकावें ॥ आणि सत्त्वर यावें

माघारें ॥ ६० ॥

तया देखतां आम्हालागी ॥ निरोपिता झाला महायोगी ॥ आमुचें पदतळ पाहून वेगीं ॥ परतून यावें माघारें ॥ ६१ ॥

ऐसी आज्ञा कैलासनाथें ॥ दिधली आम्हां उभयतातें ॥ अभिमानी जाणोनी ब्रह्मयातें ॥ मुगुट शोधातें तो गेला ॥ ६२ ॥

मग आम्हीं जाऊन पाताळा ॥ शोधिता जालों रसातळा ॥ अतळ वितळ सुतळा ॥ सप्त पाताळा शोधिलें ॥ ६३ ॥

परी ठाव न लागे चरणाचा ॥ खेदखिन्न होऊन तेथें साचा ॥ परतोन आलों न बोलवें वाचा ॥ शिवाजवळी ॥ ६४ ॥

अधोदृष्टी अधोमुख ॥ हें देखून कैलासनायक ॥ मातें आश्वासोनि नावेक ॥ बैस क्षण एक पै आतां ॥ ६५ ॥

तो इकडे ब्रह्मदेवें काय केलें ॥ एकवीस स्वर्ग धुंडाळिले ॥ परी मुगुटाचा अंत न कळे ॥ म्हणे परतोनि जाता भेद न दिसे मजलागीं ॥ ६६ ॥

तंव कुडीबुद्धी उपजली अंतरी ॥ तो धेनु आणि केतकीतें पाचारी ॥ साक्ष द्यावया शिवाजवळी ॥ चला समागमे माझिया ॥ ६७ ॥

ऐसी समागमें घेऊनी ॥ कमळासन आला कैलास भुवनीं ॥ रुद्राक्षातें नमूनी ॥ बोलता जाला पै ॥ ६८ ॥

परम आवेशे बोले तेव्हां ॥ मुगुट पाहुनी सदाशिवा ॥ साक्षी घेऊनि येधवां ॥ दर्शनातें पै आलों ॥ ६९ ॥

साक्ष पुसता चंद्रमौळी ॥ असत्य वदले ते वेळीं ॥ म्हणोनि क्रोधें शापिलीं ॥ दोघातें नीलकंठे ॥ ७० ॥

तैं पासुनी विष्ठाभक्षक ॥ धेनू झाली असे देख ॥ अपूज्य झाला तो केतक ॥ ऐसा कथानक पूर्वीचा ॥ ७१ ॥

तुझिया संशयाची निवृत्ती ॥ जाली की नसे चित्तीं ॥ धेनू सर्वांगी पवित्र म्हणतीं ॥ मुख जाण तें अपवित्र ॥ ७२ ॥

मागुती संशयातें धरून ॥ म्हणे माधवा लागून ॥ तरी सरस्वतीतें निवासस्थान ॥ जिव्हाग्रीं असे कीं ॥ ७३ ॥

ऐसिया कुश्चळस्थानीं ॥ सरस्वतीते निवास काय

म्हणुनी ॥ मग बोले मोक्षदानी ॥ ऐक कथनीं तेंची पैं ॥ ७४ ॥

एके दिवशीं एकदां ॥ ब्रह्मदेव चेवला बुद्धिवादा ॥ कामबुद्धीनें पेटला मदा ॥ सरस्वतीसीं ॥ ७५ ॥

हें अंतरीं जाणविलें शिवातें ॥ मग शापिलें तियेतें ॥ अकुळीं घडे वास तूतें ॥ अपवित्र ते गर्वित ॥ ७६ ॥

ऐसा शाप सरस्वतीसी ॥ देता झाला कैलासवासी ॥ म्हणोनियां जिव्हाग्रेसी ॥ निवास तयेसीं पै जाला ॥ ७७ ॥

आतां कलियुगा माझारी ॥ कुपात्रीं ते निवास करी ॥ आणि कुळिवंताचे घरीं ॥ कुळीं उपजे मूर्खपुत्र ॥ ७८ ॥

तथापि विद्या असली किंचित ॥ तरीं गर्वे केला त्याचा नि:पात ॥ तया गर्वानें वाताहत ॥ अकुळीं जन करिताती ॥ ७९ ॥

कुश्चित मनुष्याचे देहीं ॥ विद्याप्राप्त होतां पाहीं ॥ मग बोलों नेदी कवणासही ॥ मदबळें विद्येचेनि ॥ ८० ॥

असो आतां हें प्रस्तुत ॥ पुढें होणारें तें कथिलें निश्चित

॥ परी जे जन शुचिष्मंत ॥ तयानें आपुलें हित साधावें ॥ ८१ ॥

अकिंचन असलिया जाण ॥ पर्वकाळीं न घडे दानपुण्य ॥ ग्रहण आलियाही जाण ॥ नेदी भिजवून अडकारु का ॥ ८२ ॥

म्हणोनिया मलमासीं ॥ भावे सेवावें देवासीं ॥ पूजावें अति आदरेंसी ॥ गोब्राह्मणासीं आदरें ॥ ८३ ॥

ऐसी एक मास करितां पूजा ॥ मज अभार होय अधोक्षजा ॥ कृपाळू होऊनियां पूजा ॥ घालून निवारी पापातें ॥ ८४ ॥

पापे होतां निर्मुक्त ॥ मग सहजची मोक्षप्राप्त ॥ म्हणोनियां हें व्रत ॥ मलगासीं सेवावें ॥ ८५ ॥

इतुका इतिहास बरवा ॥ लक्ष्मीतें निवेदी माधवा ॥ तोचि अभिप्रावो आघवा ॥ तुम्हां पुढें विस्तारिलासे ॥ ८६ ॥

इति श्रीमलमास माहात्म ॥ पद्मपुराणीचें संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ द्वितीयोध्याय संपूर्ण ॥ ८७ ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ओंव्या ॥ ८७ ॥

॥ इति द्वितीयोध्यायः ॥

-----------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय तिसरा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ जयजयाजी रघुराया ॥ नमन माझे तुमच्या पायां ॥ करुणा करावी सखया ॥ करा छाया कृपेची ॥ १ ॥

तुमचे कटाक्षें करून ॥ निरसो माझें भव अज्ञान ॥ स्वरूपीं लागो अनुसंधान ॥ हेंचि कृपादान मज द्यावें ॥ २ ॥

मी बुडतों या भवसागरीं ॥ येथूनि मातें काढीं सत्वरी ॥ पुढें जें होणें असेल परी ॥ ते सुखें श्रीहरी होऊ कां ॥ ३ ॥

तरणोपाय तें साधन ॥ मीं तव नेणें आणीक जाण ॥ परी तव चरणीं ठेवूनि मन ॥ आरंभिली हे काळक्रमणा ॥ ४ ॥

श्रोती होऊनि सादर ॥ श्रवण कीजे कथाप्रसर ॥ नूतन

कथा म्हणूनि अव्हेर ॥ न कीजे स्वामिया ॥ ५ ॥

नूतन हे पद्यरचना ॥ कथा भाग पूर्वील जाणा ॥ समंत घेतलें पद्मपुराणा ॥ श्लोक जाणा तेथीचे ॥ ६ ॥

नारायण उवाच ॥ न कृशांमृतवत्सां वा वंध्यां रोगान्वितां तथा ॥ न च व्यंगामतिश्रांतां गां दद्यान् ब्राह्मणाय वै ॥ १ ॥

ऐक लक्ष्मी सावधान ॥ मागे निरोपिलें गोदान ॥ परीं तें पाहिजे सुलक्षण ॥ अलक्षण नसावें ॥ ७ ॥

असावी सुंदर पौष्टिक ॥ आणि वरी सवत्सक ॥ दुग्धीं जेवीं बलाहक ॥ वर्षेतोय अपार ॥ ८ ॥

रोड अथवा रोगिष्ट ॥ मृत वत्स नसावें स्पष्ट ॥ किंवा वंध्या असोनि वरिष्ट ॥ कामा नये दानातें ॥ ९ ॥

अथवा रोगी व्याप्त शरीरीं ॥ दुग्ध न देती तिळभरी ॥ ऐसी धेनु दानातें निर्धारी ॥ योग्य सुंदरी नसे पै ॥ १० ॥

लातरी खैरींडी वरी ॥ एकश्रृंगी नसावी तरी ॥ आपुलें पय आपण प्राशन करी ॥ पान्हा चोरी दोहितां ॥ ११ ॥

ऐसियाचें न कीजे दान ॥ दान केलिया कवण पुण्य ॥ जैसे अजागळींचे स्तन ॥ दुग्ध ना शोणित कांहीं ॥ १२ ॥

लक्षणयुक्त धेनु बरवी ॥ सहकुटुंबी ब्राह्मणातें द्यावी ॥ अलंकारयुक्त असावी ॥ दोहनपात्रासहित ॥ १३ ॥

ऐसी दिधलिया दान ॥ तेणें संतोषे जनार्दन ॥ मग ते पावती मोक्षसदन ॥ यासीं संदेह जाण असेना ॥ १४ ॥

अपात्रीं केलिया दान ॥ तरी तें नरकासी कारण ॥ म्हणोनी सत्पात्री ब्राह्मण ॥ पाहोनि दान पैं द्यावें ॥ १५ ॥

बहुक्षीरां च यो गां वै ब्राह्मणायोपपादयेत् ॥ उत्तारयेत्सचात्मानं सप्तसप्त कुलानिच ॥ २ ॥

धेनू ते बहुत दुग्धाची ॥ सुलक्षणीक सवत्साची ॥ दान दिधलिया ऐशाची ॥ तरी पदवीं साची पावेतो ॥ १६ ॥

तयाचा जन्म सफळ झाला ॥ आणी सप्तकुळांचा उद्धार केला ॥ इतर दीन पुरुषाला ॥ दान तयाला घडेना ॥ १७ ॥

म्हणोनियां मलमासी जाण ॥ अगत्य कीजे गोदान ॥ नारी अथवा पुरुष जाण ॥ भाग समान उभयासीं ॥ १८ ॥

गावो यज्ञस्य नेत्रे वै गावोयज्ञस्य वै मुखं ॥ अमृतंह्य क्षयं दिव्यं क्षीरं गावोवहंतिच ॥ ३ ॥

अहो हे धेनू यज्ञाचे नेत्र ॥ आणि यज्ञमुख स्वतंत्र ॥ वरुषे अमृत क्षीरमात्र ॥ जें दुर्लभ सुरातें ॥ १९ ॥

इंद्रादी सुरवर पाहीं ॥ म्हणती अमृत असे पाहीं ॥ परी क्षीर आम्हांतें प्राप्त नाहीं ॥ जें भूलोकी अपार ॥ २० ॥

म्हणोनि समग्र सुरवर ॥ धेनुगात्री प्रवेशले साचार ॥ आणि सरिता अपार ॥ प्रवेशल्या धेनु आंगीं ॥ २१ ॥

यदर्थी श्लोक संमतीचा ॥ असे हो ग्रंथांतरीचा ॥ तोची निवेदितों साचा ॥ अर्थ तयाचा पाहावा ॥ २२ ॥

श्रृंगमूले गवां नित्यं ब्रह्माविष्णु समाश्रितौ ॥ श्रृंगाग्रे सर्वतीर्थानि स्थावराणि चराणिच ॥ ४ ॥

तव आशंका घेऊन सत्वर ॥ श्रोतीं बोलिलें उत्तर ॥ सर्वगात्री सुरवरा ॥ किंकारण प्रवेश ॥ २३ ॥

यदर्थी इतिहास बरवा ॥ श्रोतीं एकचित्तें परिसावा ॥ जो ऐकता सर्व जीवा ॥ संशय फिटे अनायासें ॥ २४ ॥

तरी पौलव्यनामें ऋषीश्वर ॥ तपोबळें मुनिवर ॥ कष्टविलें जें स्वशरीर ॥ तप अपार आचरला ॥ २५ ॥

तयाचि तपसामर्थ्ये ॥ भय उपजले वासवातें ॥ मग प्रेरिता झाला अप्सरातें ॥ तपक्षयातें ऋषीच्या ॥ २६ ॥

अप्सरा म्हणती अमरेशा ॥ तपातें क्षय कीजे कैसा ॥ परम कोपिष्ट ऋषी राजसा ॥ देखतां आम्हा शापील ॥ २७ ॥

तंव आज्ञा देतसे इंद्र ॥ आतां तुम्हीं जावें सत्वर ॥ पुढें असेल जें होणार ॥ तें तें सुखें होऊ कां ॥ २८ ॥

इंद्राचा हा स्वाभाविक गुण ॥ तपातें क्षय करावा जाण ॥ हें पूर्वापार लक्षण ॥ वासवा आंगीं असे पैं ॥ २९ ॥

असो आज्ञा घेऊन अप्सरा ॥ येत्या जाल्या त्या अवसरा ॥ निवास जेथें ऋषीवरा ॥ महाराज पौलव्यातें ॥ ३० ॥

येऊनियां आश्रमानिकटीं ॥ ऋषीतें अवलोकिलें दृष्टीं ॥ तंव तो तपस्वी महाहटी ॥ तपश्चर्ये बसला असे ॥ ३१ ॥

तंव त्या देवांगना जाणा ॥ अवलोकुनि ऋषीराणा ॥ चमकत चमकत सन्निधाना ॥ हास्यवदन अवलोकिलें ॥ ३२ ॥

ध्यान विसर्जुनि मुनी ॥ तयातें देखिले नयनीं ॥ मग पुसे तयालागुनी ॥ किमर्थ कहर मांडिला ॥ ३३ ॥

आम्हीं न मागों कवणातें कांहीं ॥ हा किमर्थ पेटला आमुचे डाई ॥ म्हणोन क्रोधयुक्त तें समई ॥ शाप द्यावया उदित ॥ ३४ ॥

शापोदक करी घेउनी ॥ आव्हानिलें वासवालागुनी ॥ तों येरीकडे काय झाली करणी ॥ इंद्रभुवनी पैं तेव्हां ॥ ३५ ॥

सिंहासनावरी वासवो ॥ तंव खळबळिला तयाचा देहो ॥ चंचळ होताची पहा हो ॥ सभोंवतें अवलोकित ॥ ३६ ॥

शापोदकाचे सामर्थ्य मोठें ॥ इंद्राचें आंगीं उठले कांटे ॥ मग पिशाचवत पळतसें नेटें ॥ जेथें असे कमळासन

॥ ३७ ॥

घाबरेपणीं ते समयीं ॥ ब्रह्मयाचे पदीं मस्तक ठेवी ॥ म्हणे आतां रक्षीये समयीं ॥ करुणा करा दातारा ॥ ३८ ॥

कमळासन म्हणे तेव्हां ॥ अपराध घडला वासवा ॥ तो साकल्प आम्हां निवेदावा ॥ म्हणजे उपाव सुचेल ॥ ३९ ॥

तंव बोले सुरेश्वर ॥ पौलव्य ऋषी तपें थोर ॥ तया छळणा सत्वर ॥ देवांगना प्रेरिल्या मी ॥ ४० ॥

इतका इकडे वृत्तांत झाला ॥ तिकडे ऋषीतें विलंब लागला ॥ म्हणे अजुन इंद्र का नाहीं आला ॥ किमर्थ लागला विलंब ॥ ४१ ॥

काय माझी झाली तपहानी ॥ मलीनता जाली तपालागुनी ॥ म्हणोन ध्यानी विचारुनी ॥ पाहातसे ॥ ४२ ॥

तंव इंद्रातें न देखे निजासनीं ॥ तो तंव गेलासे पळुनी ॥ कमळासनें आश्वासुनी ॥ निजासनीं बैसविला ॥ ४३ ॥

मग ऋषि आणिक उदक ॥ घेता जाला नि:शंक ॥ आव्हानिला कमळनायक ॥ इंद्रासहित ते काळीं ॥ ४४ ॥

तंव आसनी चंचल ब्रह्मदेव ॥ म्हणे फळला तुमचा प्रादुर्भाव ॥ आम्हांसहीत ऋषीराव आव्हानिता झाला शापातें ॥ ४५ ॥

आतां उपाव तरी कवण ॥ जवळी करावा जनार्दन ॥ मग उभयतां तेथून ॥ निघते झाले लगबगें ॥ ४६ ॥

घाबरेपणीं येऊन जाण ॥ नमिते जाले जनार्दन ॥ मग म्हणती तया लागून ॥ रक्षीं भयापासून महाराजा ॥ ४७ ॥

जयजयाजी जनार्दना ॥ जगपाळका विश्वरक्षणा ॥ हे दयानिधी करुणाघना ॥ शरणांगता वज्रपंजरु ॥ ४८ ॥

पतीतपावन हे ब्रीदावळी ॥ ती सत्य करीजे येकाळीं ॥ आम्हीं अपराधी कृपाबळी ॥ आम्हां रक्षी दातारा ॥ ४९ ॥

ऐकुनी ऐसें उत्तर ॥ बोलता जाला कमळावर ॥ कवणें केला तुम्हांतें जोजार ॥ तोचि प्रकार सांगिजे ॥ ५० ॥

तंव बोले कमळासन ॥ पौलव्यऋषी तो तपोधन ॥ तया छळावया लागुन ॥ अप्सरा वासवें पाठविल्या ॥ ५१ ॥

परमक्रोधी ऋषिसज्जन ॥ शापोदकें वासवातें पराभवून ॥ तेणें तो भयाभीत होऊनि जाण ॥ मजजवळी पातला ॥ ५२ ॥

आम्ही आश्वासिलें तत्वता ॥ तो शाप आला मज भोंवता ॥ म्हणोनिया उभयतां ॥ येतों जालों तव दर्शना ॥ ५३ ॥

आतां कळेल तैसें पाहीं ॥ आम्हा रक्षी नाना उपायीं ॥ मग बोलता जाला शेषशाई ॥ ते समयीं सुरेशातें ॥ ५४ ॥

येचविषयीं प्रथम शिकवण ॥ तुम्हांतें निवेदिलीसे जाण ॥ जे न छळावें ब्राह्मणालागून ॥ सहसा जाण सुरेशा ॥ ५५ ॥

ब्रह्मशापें करूनियां ॥ तंव संपत्ति गेली विलया ॥ मग ते सागरीं काढावया ॥ परम कष्ट मज झाले ॥ ५६ ॥

यालागीं कैसा असो ब्राह्मण ॥ परी ते माझेंची मुख जाण ॥ न कळे तयाचें विंदान ॥ कवणे घटी कैसा मी

॥ ५७ ॥

ऐसें बोलत बोलत ॥ क्षण एक अवकाश लागला तेथ ॥ तों येरीकडे पौलव्य काय करित ॥ विचारित निजमानसीं ॥ ५८ ॥

म्हणे अद्याप वरि पाही ॥ उभयतां तें न देखो येकेठायीं ॥ म्हणोन पेटलासे तोडाई ॥ उदक आणिक घेतलें ॥ ५९ ॥

विष्णुसहीत ब्रह्मदेवो ॥ आव्हानिता जाला वासवो ॥ तंव वैकुंठीं देवाधिदेवो ॥ घाबरा झाला निजांगीं ॥ ६० ॥

म्हणें ऋषीचिया भया ॥ आलेत तुम्हीं लपावया ॥ परि संग दोष पाहिया ॥ आम्हां भोंवला तात्काळ ॥ ६१ ॥

मजसहीत तुम्ही दोघे ॥ ऋषीनें उदक घेतले रागें ॥ म्हणोन उठला लागवेगें ॥ कैलासमार्गे पळाला ॥ ६२ ॥

पुढें पळतसे जनार्दन ॥ मागें धापें दाटलें दोघेजण ॥ बापशापाचें भय दारुण ॥ वाहे भगवान स्वआंगें ॥ ६३ ॥

ब्राह्मण शाप परम द्वाड ॥ राजा नहुष केला सरड ॥ नारदाची नारदी लज्जेआड ॥ लपत हिंडे चहूंकडे ॥ ६४ ॥

ऐसे सांगो आतां किती ॥ कथा परिसवू पुढती । ऐसें पळतां त्रिवर्गाप्रती ॥ कैलासपती आटोपिला ॥ ६५ ॥

जोडुनिया करपुटी ॥ नमिते जाले धूर्जटी ॥ वाचा जालीसे हिंपुटी ॥ बोलता ओठी शब्द न ये ॥ ६६ ॥

तव बोले शूळपाणी ॥ किमर्थ आगमन ये स्थानीं ॥ आकर्णूनी ऐसी वाणी ॥ हसुनी बोले माधव ॥ ६७ ॥

मग आद्यंत वर्तमान ॥ निवेदिता झाला जनार्दन ॥ वासवें केलें विघ्न दारुण ॥ आलो धावून या ठायां ॥ ६८ ॥

ऐसे लाघवी याचे शब्द ॥ ऐकूनी हासे वृषभध्वज ॥ उभयतांचें अंतर सहज ॥ एक म्हणोनी ॥ ६९ ॥

आसनें देऊन तिघांसीं ॥ बैसविलें आपणापाशीं ॥ तों येरिकडें काय करी तपोराशी ॥ पौलव्य तो ऋषीराणा ॥ ७० ॥

ध्यानीं विचारी जों मुनी ॥ तंव तिघे न दिसती

स्वस्थानीं ॥ शापभयें गेले पळुनीं ॥ लपाले लपनीं कैलासी ॥ ७१ ॥

मग शिवासहित ऋषेश्वरीं ॥ आणीक उदक घेतलें करीं ॥ आव्हानितांच त्रिपुरारी ॥ गेला चांचरी निजासनीं ॥ ७२ ॥

चंचळ देखुनी सदाशिवा ॥ गुंडाळिला भस्मबटवा ॥ हें देखुनी रमाधवा ॥ हास्य तेधवां नाटोपे ॥ ७३ ॥

मग म्हणेजी खट्वांगपाणी ॥ हे काय आरंभिली करणी ॥ गार्हाणें सांगावया या स्थानीं ॥ आलों धांवुनी महाराजा ॥ ७४ ॥

तुमची तों दिसे ऐसी गती ॥ आतां जावें कवणाप्रती ॥ कवण निवारील यातायाती ॥ म्हणोन चित्ती संदेहो ॥ ७५ ॥

तंव बोले सदाशिव ॥ तुमचा कळला भाव ॥ टाकूनी जावे हा ठाव ॥ ऐसें वाटे मजलागीं ॥ ७६ ॥

मग सखेद होऊन अंतरीं ॥ बोलता जाला मुरारी ॥ पुढें कैसी की जे परी ॥ हें अंतरीं विचारावें ॥ ७७ ॥

शिव म्हणे माधवासीं ॥ विचार न सुचे मानसीं ॥

कांकीं ते दोघेही एकमेकांसीं ॥ अंतरसाक्षी म्हणोनी ॥ ७८ ॥

वाढवावया ब्राह्मणांचे महिमान ॥ म्हणोनि मांडिलें हें निर्वाण ॥ पुढील जाणोनी कारण ॥ महिमान गौतमीचें ॥ ७९ ॥

मग विष्णु विचारून अंतरी ॥ म्हणे ऐकिजे हो त्रिपुरारी ॥ ब्राह्मणाचा उपाय निर्धारी ॥ धेनूवरी चालेना ॥ ८० ॥

तरी पाचारूनी धेनूलागीं ॥ आपण प्रवेशुं तिचे आंगीं ॥ पुढें होईल त्याप्रसंगीं ॥ विलोकुं आंगीं सादर ॥ ८१ ॥

विचार मानला सर्वांते ॥ मग पाचारिलें धेनूतें ॥ संकटी रक्षी आम्हांतें ॥ म्हणोनि बोलते पै जाले ॥ ८२ ॥

तथास्तु म्हणोन पाहीं ॥ धेनू वदली ते समयीं ॥ मग प्रवेश करिते जाले देहीं ॥ ऐका सर्वही श्लोकार्थ ॥ ८३ ॥

श्रृंगमूले गवानित्यं ब्रह्माविष्णुसमाश्रितौ ॥ श्रृंगाग्रे सर्वतीर्थानि स्थावराणि चराणिच ॥ ५ ॥

शिरोमध्ये महादेवः सर्वभूतमयस्थितः ॥ ललाटाग्रे स्थितादेवी नासावंशेच षण्मुखः ॥ ६ ॥

कर्णयोरश्विनौ चैव चक्षुषोःशशिभास्करौ ॥ दंतेषुवायवः सर्वे जिव्हायां वरुणस्थितः ॥ ७ ॥

सरस्वतीच हुंकारे यमयक्षौच गंडयोः ॥ संध्याद्वयंतथोष्ठाभ्यां ग्रीवायामिंद्रसंस्तितः ॥ ८ ॥

साक्षद्गंगाचगोमूत्रं गोमये यमुनास्थिता ॥ त्रयस्त्रिंशत्तु देवानां कोट्योरोम सुसंस्थिताः ॥ ९ ॥

ऐशिया परी सर्व देव ॥ तेतीस कोटीसहित वासव ॥ गंगायमुनादी सर्व ॥ वास सर्व करिते झाले ॥ ८४ ॥

तै पासुनी धेनू आंगीं ॥ वास असेहो नवांगीं ॥ पुढें वर्तलिया प्रसंगीं ॥ अवधान दीजे ॥ ८५ ॥

येरीकडे पौलव्यमुनी ॥ आव्हानितां न देखे कोणी ॥ पुढे अवलोकी जो नयनीं ॥ तो देखे नयनीं धेनूतें ॥ ८६ ॥

अवघें निरखून धेनूतें ॥ तंव धेनु आंगीं सर्व दैवतें ॥ अवलोकितां पावला विस्मयातें ॥ म्हणे आतां कउतें करावें ॥ ८७ ॥

मग विवेक आठवून अंतरीं ॥ तया धेनूतें नमस्कारी ॥ विवेका ऐसा साहाकारी ॥ आणिक नसे क्रोधाते ॥ ८८ ॥

क्रोध आलिया शरीरीं ॥ अनर्थातें उभा करी ॥ तेथें विवेक तो आवरी ॥ निवारी जो अनर्थातें ॥ ८९ ॥

विवेक करूनि पाहाहो ॥ क्रोधें शांत केला देहो ॥ मग तया प्रसन्न महादेवो ॥ सर्व देवांसहीत पै ॥ ९० ॥

पुरवून ऋषीची मनकामना ॥ वाहून नेला वैकुंठभुवना ॥ ऐशीही कथा श्रोतेजना ॥ परिसविली जाणा शास्त्राधारें ॥ ९१ ॥

म्हणोनियां मलमासीं ॥ दान द्यावें धेनूसी ॥ स्त्री अथवा पुरुषासी ॥ लाभ उभयासीं समान ॥ ९२ ॥

ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र ॥ येहीं दान करावें पवित्र ॥ पाहुनि ब्राह्मण सत्पात्र ॥ यथायोग्य दान दीजे ॥९३ ॥

तया योगें पुण्यवंत देह ॥ पापाचा तो होय क्षय ॥ म्हणोनि सुलभ उपाय ॥ धेनूसेवा निवेदिली ॥ ९४ ॥

अनेन विधिना धेनुं यो विप्राय प्रयच्छति ॥
सर्वकामसमृद्धात्मा विष्णुलोके महीयते ॥ १० ॥

सर्वेषामपि पापानां ज्ञातानामविजानतं ॥
प्रायश्चित्तमिदंप्रोक्तमृषिभिस्तत्वदर्शिभि: ॥ ११ ॥

ऐसिया परी श्रोतियातें ॥ कथा निवेदिली संतातें ॥ न्यून पूर्ण जें तें क्षमामातें ॥ कृपावंतें पै कीजे ॥ ९५ ॥

माझें सरतें हें बोलणें ॥ जैसें खर्यामाजी खोटें नाणें ॥ मेळविती जेवी कुजनें ॥ तेवी बोलणें पै माझें ॥ ९६ ॥

व्यासोक्तवाणी खरें नाणें ॥ तोचि श्लोकार्थ अनुभवावें ॥ सरता केला प्राकृतें जाण ॥ नव्हे बोलणें पदरिंचें ॥ ९७ ॥

मी नव्हे कविता कुशळ ॥ नाहीं संकृत वाणी निर्मळ ॥ सर्वांपरि मी अमंगळ ॥ संती सांभाळ पै कीजे ॥ ९८ ॥

नाहीं उद्योग व्यवसाय कांहीं ॥ तपश्चर्या न घडेचि देहीं ॥ म्हणोन काळक्रमणें स्तव पाहीं ॥ उदेला देहीं उद्गारु ॥ ९९ ॥

परि बुद्धिदाता तो समर्थ ॥ शिरावरी माझिया रघुनाथ ॥ वदता वदविता तोचि येथ ॥ बुद्धिदाता निर्धारें ॥ १०० ॥

स्वस्ति श्रीमलमाहात्म ग्रंथ ॥ पद्मपुराणींचें संमत । मनोहरसुत विरचित ॥ तृतीयोध्याय गोड हा ॥ ओवी संख्या ॥ १०० ॥

॥ इति तृतीयोध्यायः ॥

-----------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय चौथा

श्रीगणेशाय नमः ॥ जय अयोध्यावासी श्रीरामा ॥ चराचराच्या फलांकितद्रुमा ॥ सदासर्वदा तव नामी प्रेमा ॥ दे नाम महिमा पतिता पै ॥ १ ॥

तोडुनियां भवपाश बंधन ॥ अखंड घडो मज भजन ॥ हेंचि देई कृपादान ॥ वरदानें आपुलिया ॥ २ ॥

आतां ऐका श्रोतेजन ॥ मलमहात्म आख्यान ॥ जें आचरलिया घडे पुण्य ॥ करा श्रवण भावार्थे ॥ ३ ॥

श्रवण केलिया सतत ॥ व्रताचें फळ होय प्राप्त ॥ दान पुण्य न घडे जरी तप ॥ तरीं घ्यावें माप श्रवणपंथी ॥ ४ ॥

या मलमासाचे ठायीं जाण ॥ करावें गोब्राह्मणसेवन ॥

म्हणोन लक्ष्मीप्रती नारायण ॥ करी कथन तेचि ऐका ॥ ५ ॥

यत्पुरा भवताप्रोक्त पूजनं ब्राह्मणस्यच ॥ मलमासे प्रकर्तव्यं नरैः स्वर्गेप्सुभिः सदा ॥ १ ॥

कीं दृशो ब्राह्मणः प्रोक्तः कथं पूजोमलिम्लुचे ॥ किं फलं लभते मर्त्यः पूजनाच्च द्विजन्मनः ॥ २ ॥

श्रीरुवाच ॥ लक्षणं ब्रूहि विप्राणां देवाधीनां सुरेश्वर ॥ कथं संज्ञायते नाथ एतदेवोच्यतां मम ॥ ३ ॥

जया इच्छा वाटे अंत:करणीं ॥ पापाची झाली पाहिजे धुणी ॥ तरी पूजावें ब्राह्मणालागुनी ॥ अगत्य करूनि मलमास ॥ ६ ॥

तरीं ते ब्राह्मण असावे कैसे ॥ इहीं लक्षणीं जाण ऐसे ॥ ऐकतांची संशय निरसे ॥ मनीं ठसे प्रबोधु ॥ ७ ॥

मुख्य ब्राह्मणाचें लक्षण ॥ करावें षट्कर्माचरण ॥ अध्ययन अध्यापन ॥ उपासन अग्नीचें ॥ ८ ॥

तपश्चर्या करावी जाण ॥ सुशीळ वरी संध्यास्नान ॥ करूनि नसावें लोलुप्तपण ॥ संतुष्ट मन असावें ॥ ९ ॥

असंतुष्ट द्विजनष्ट ॥ असंतुष्ट असलिया वरिष्ठ ॥ तरि

तो न म्हणावा श्रेष्ठ ॥ ऐसें स्पष्ट वेद बोले ॥ १० ॥

म्हणोनि लक्षणयुक्त ब्राह्मण ॥ तेचि श्रेष्ठ चहुंवर्णातें जाण ॥ आतां ऐका आणिक कथन ॥ वर्तती कैसेनी ब्राह्मणाते ॥ ११ ॥

जे करिती अश्वसेवन ॥ उपर्जिती इतरा लागुन ॥ युद्धहव्यास मनीं धरून ॥ करिती सेवन नृपाचें ॥ १२ ॥

तेथें कैचें संध्यास्नान ॥ न घडे षट्कर्माचरण ॥ तरी तो क्षत्रिय धर्मपूर्ण ॥ तोही संपूर्ण नसे पै ॥ १३ ॥

अश्व उपर्जिती निजांगें ॥ जे करिती संसार सांगें ॥ तेथेंही अश्वविक्रय आंगें ॥ न घडे सांग तयातें ॥ १४ ॥

म्हणोन क्षत्रिय धर्मी ब्राह्मण ॥ ते पूजना योग्य नव्हेती जाण ॥ आतां ऐका दुसरें लक्षण ॥ सांगतों जाण ब्राह्मणाचें ॥ १५ ॥

पशुसेवा निरंतर करून ॥ जे करिती वाणिज्य कर्माचरण ॥ धन मेळविती भाडें करून ॥ ते वैश्य जाण म्हणावे ॥ १६ ॥

त्याहीवरी रसविकय ॥ घृतमधुलवणादि पाहे ॥

घृतमधु संचय आहे ॥ तुळराशी अपार ॥ १७ ॥

नाना वस्तुजात संग्रह ॥ करून करी जो विक्रय ॥ तो वैश्यधर्मा ब्राह्मण पाहे ॥ न साहे प्रतिग्रहीं ॥ १८ ॥

ऐसें कर्म ब्राह्मण आचरतां ॥ तरि तो वैश्य बोलिजे तत्वता ॥ ब्राहणपणाची वार्ता ॥ बोलों नये जाण पां ॥ १९ ॥

पशुसेवा करून नित्य ॥ कृषिकर्मातें आचरत ॥ तेणेंच योगें संसारकृत्य ॥ चालविती निरंतर ॥ २० ॥

तेथे स्नान संध्यातें कैची ॥ अष्टौप्रहर चिंता कृषीची ॥ होय न होय तयाची ॥ करणें घडे तयातें ॥ २१ ॥

म्हणोनि ऐसे जे का ब्राह्मण ॥ ते शूद्रा ऐसे म्हणावे जाण ॥ प्रतिग्रह तया लागून ॥ न द्यावा जाण धर्मिष्टें ॥ २२ ॥

आतां परघात कर्मे करी ॥ नीच यातीची संगती धरी ॥ वाट पाडोनि वस्तु हरी ॥ जीवें मारी प्राणिया ॥ २३ ॥

चौरकर्मे करूनि जाण ॥ उदरनिर्वाह चालवी आपण ॥ दुसर्याचे द्रव्य अभिलाषून ॥ उपार्जन चालवी जो ॥ २४ ॥

करितां अभिलाष द्रव्याला ॥ बहुत मनीं संतोषला ॥ म्हणे आज लाभ मोठा झाला ॥ पुढें तयाला सुटका कैची ॥ २५ ॥

ऐसा न करी जो विचारातें ॥ आणि अन्योन्य कर्मी प्रवर्ते ॥ भक्षाभक्षणेंचित्तें ॥ कृतघ्नता सदा वसे ॥ २६ ॥

नाहीं संध्या नाहीं स्नान ॥ नाहीं पितरांचें तर्पण ॥ तेथें कैचा धर्म आणि दान ॥ पर्वकाळ धर्म तोही नेणें ॥ २७ ॥

पापद्रव्य सांचलें साची ॥ सेवा करी नित्य कुटुंबाची ॥ परी नेणें स्वधर्माची ॥ नित्य पापाची वासना ॥ २८ ॥

नित्य अनित्य क्रिया पाहीं ॥ ठाऊकें नसे जया ह्रदयीं ॥ तरी तो ब्राह्मण ऐसा पाही ॥ द्विपाद पशु बोलिजें ॥ २९ ॥

जो ब्राह्मणांचें ऋण घेउनी ॥ पुन: न देत तया परतुनी ॥ मोठा लाभ झाला म्हणोनी ॥ निज मनीं हर्षित ॥ ३० ॥

तरी ब्रह्मस्वहरणा ऐसें पाहीं ॥ मारक विष दुसरें नाहीं ॥ नेऊन घाली अपायीं ॥ रवरव नरकांत पै ॥ ३१ ॥

आधींच ब्रह्मस्व मारक ॥ त्याहीवरी कृतघ्न मारक देख ॥ द्रव्यावरी जो सदा आसक्त ॥ पोट न खाय अन्नातें ॥ ३२ ॥

ऐशियाचें ऋण घेउनी ॥ जो न देई मागुत्यानीं ॥ तरी तो पचे नरकभुवनीं ॥ परी सुटका तया लागुनी असेना ॥ ३३ ॥

येचविषयीं इतिहास ॥ ऐक होऊनी सावकाश ॥ पुराणांतरीं संमतास ॥ पाहावें बरें आदरें ॥ ३४ ॥

ऋण वैर आणि हत्त्या ॥ हें तो न चुके सर्वथा ॥ म्हणोन दृष्टांतासी कथा ॥ आकर्णवूं बरी ॥ ३५ ॥

कोणे एके देशीचा ब्राह्मण ॥ क्षत्रियधर्मी परम निपुण ॥ अश्वावरी आरूढोन ॥ विदेशा लागुनी तो गेला ॥ ३६ ॥

घरीं कुटुंब असे सर्वही ॥ परी धनाशा धरून जीवीं ॥ वरी शूरत्वाची उर्मी पाहीं ॥ आंगीं बैसे तयाच्या ॥ ३७ ॥

म्हणोनि पातला विदेशा ॥ धनालागीं चालिली वयसा ॥ वर्षे क्रमिलीं द्वादशा ॥ द्रव्य आशा बहुतची ॥ ३८ ॥

धनाशा धरूनि बहुत ॥ उपार्जिता जाला नृपनाथ ॥ धन मेळविले बहुत ॥ ऐका गणती तयाची ॥ ३९ ॥

सुवर्णनाणें सातशत ॥ द्रव्य जालेंसे निभ्रांत ॥ मग मनीं उपजला हेत ॥ गृह आशा चित्तांत उद्भवली ॥ ४० ॥

निरोप घेऊन माघारी ॥ परतता जाला निजमंदिरीं ॥ तंव मार्गी काय झाली परी ॥ तेचि निर्धारीं ऐकिजे ॥ ४१ ॥

दूरदेशी विदेश पंथ ॥ मार्ग क्रमी दिवस बहुत ॥ येत येतां एका मार्गात ॥ स्नानातें उतरे मध्यान्हीं ॥ ४२ ॥

वारू उभा करून तेथ ॥ वस्त्रें फेडून समस्त ॥ एकझरा उपसोनि तेथ ॥ स्नान करीत बैसला ॥ ४३ ॥

स्नानसंध्या वरचेंवरी ॥ करून सोडिली सिदोरी ॥ तांबुल घेऊन वरचेवरी ॥ परीधान करी लगबगें ॥ ४४ ॥

लगबग झाली जाण्याची ॥ मनीं आस उद्भवली कुटुंबाची ॥ म्हणे आजच भेट घेऊं तयेची ॥ परी गाठोडी धनाची विसरला ॥ ४५ ॥

बैसोन अश्वावर पाहीं ॥ निघता झाला लवलाहीं ॥ द्रव्य आठवून तयाचे ह्रदयीं ॥ हर्षे पाही विसरला ॥ ४६ ॥

तंव तो गेलिया मागे जाण ॥ एक पांथिक बैसला येऊन ॥ तयाने निरखितां ठिकाण ॥ सांपडलें धन अनायासे ॥ ४७ ॥

मग उठोनि अति तांतडी ॥ निघता झाला लवडसवडी ॥ म्हणे पुढे करावी परवडी ॥ स्नान आणि उपहारु ॥ ४८ ॥

म्हणोन तो पंथ क्रमित ॥ तंव आणिक एक शूद्र तेथ ॥ येऊनियां बैसत ॥ सिदोरि सोडीत भक्षावया ॥ ४९ ॥

इकडे मार्गी जातां अश्वावरी ॥ स्मरण करितो अंतरी ॥ तंव द्रव्य न दिसे पदरीं ॥ विसर निर्धारी मज जाला ॥ ५० ॥

म्हणोन तैसाची अश्व पिटित ॥ येता झाला पूर्वस्थळाते ॥ जेथे केलें असे स्नानातें ॥ आला तेथे लगबगे ॥ ५१ ॥

तो तेथे शूद्र असे बैसला ॥ पाहून तयाते बोलता झाला ॥ तुम्हीं येथे केधवां आलां ॥ ते आम्हाला सांगिजे ॥

५२ ॥

तंव शूद्र बोले ते समयीं ॥ क्षण एक अवकाश जाला पाहीं ॥ मग तो म्हणे या ठायीं ॥ धन तुज सापडलें पै माझें ॥ ५३ ॥

शूद्र म्हणे मी नेणे सर्वथा ॥ तुझा द्रव्यार्थ केउता ॥ येरु वदे शत साता ॥ द्रव्यार्थ माझें सुवर्ण ॥ ५४ ॥

तें तुवां अभिलाषिलें ॥ माझें मज देतां भलें ॥ नाहीं तरी जासी वधिले ॥ मज हस्तें पापिष्टा ॥ ५५ ॥

येरु आण वाहे ते समयीं ॥ मग म्हणे माझा झाडा घेई ॥ महापुरुषा तूं कवणे ठायीं ॥ विसरलासी धनातें ॥ ५६ ॥

ऐसा कलह उभयतां ॥ होत असे हो तत्वतां ॥ शूद्राजवळी न देखे तत्वता ॥ मग प्रवर्तला घाता तयाचिये ॥ ५७ ॥

मग तयातें म्हणे ते वेळे ॥ बरें झालें तें बरें झालें ॥ परी मी स्वसंतोषें आपुलें ॥ अर्धभाग देतों तूंतें ॥ ५८ ॥

अरे माझी द्वादश वर्षाची कमाई ॥ तूं अभिलाषूं नको या ठायीं ॥ येरू आण वाहोनि म्हणे नाहीं ॥ नेत्रीं पाहीं

देखिलीं म्यां ॥ ५९ ॥

मग सक्रोध होऊन अंतर ॥ वस्त्रें पुसूनि खड्गधार ॥ तात्काळ तयाचें शरीर ॥ छेदिता झाला पै ॥ ६० ॥

क्षतें क्षीण होऊनि अंतरी ॥ म्हणें आता केउता जावें घरीं ॥ मुख स्वकुटुंबातें केवी दाऊं तरी ॥ म्हणोन माघारीं मुरडला ॥ ६१ ॥

इतुका वृत्तांत येथें झाला ॥ पहा लाभ कवणाला कवण मेला ॥ ऐसी ते असे विचित्र लीळा ॥ पुढें कथेला अवधान द्यावें ॥ ६२ ॥

अंतरिक्ष जातां नारदमुनी ॥ इतुका वृत्तांत देखिला नयनीं ॥ मग तैसाच वैकुंठा लागुनी ॥ त्वरें करूनि पातला ॥ ६३ ॥

भावें नमिला देवराणा ॥ इहीं मस्तक ठेविला चरणा ॥ पुसते जाले आगमना ॥ कोठुनी येणें पै झालें ॥ ६४ ॥

नारद म्हणे हो घननीळा ॥ फिरत फिरत आलों भूतळा ॥ परी तेथें देखिजे लीळा ॥ ती दयाळा अवधारीं ॥ ६५ ॥

मग सविस्तर कथन ॥ जालें तें कथी ब्रह्मनंदन ॥ म्हणे

लाभ कवणा लागुन ॥ आणि मरण कवण पावला ॥ ६६ ॥

ऐसि अन्यायाची परवडी ॥ तूं निरखिसी कीं आवडी ॥ हे जगामाजी तुझी प्रौढी ॥ बरी न दिसे गोविंदा ॥ ६७ ॥

तूं तव त्रैलोक्याचा नाथ ॥ हा अन्याय नसे अवगत ॥ ही तव करणी अद्भुत ॥ बरी न दिसे तुजलागीं ॥ ६८ ॥

ऐकूनिया मुनीचे वचना ॥ हांसें आलें जनार्दना ॥ म्हणे हा अपराध मातें जाणा ॥ न लावावा दयानिधे ॥ ६९ ॥

हे तो ज्याची करणी जैशी ॥ भोगिती जाण हो तैसी ॥ तें दूषण ठेवितां आम्हासी ॥ जाणून होसी अज्ञान ॥ ७० ॥

आतां ऐकिजे कथन ॥ ऋण आणि हत्त्या जाण ॥ न चुके कवणालागून तेंचि कारण अवधारीं ॥ ७१ ॥

जयातें प्राप्त झालें जें धन ॥ तो पूर्वी होता सधन ॥ तयापासूनी घेतलें धन ॥ मेला शूद्र तेणें पै ॥ ७२ ॥

जयानें मारिलें शूद्रासीं ॥ तो जामिन जाला होता त्यासीं ॥ वायदा भरतां दिवसादिवसीं ॥ नेदि द्रव्यासी मागतां ॥ ७३ ॥

मग त्या सावकारें तगादा ॥ जामिनामागें लाविला सदां ॥ येरू पेटलासें द्वंदा ॥ परी तो नुसधा नायके ॥ ७४ ॥

मग देण्याची काळजी भारी ॥ न सोसेची निधारी ॥ म्हणोन पोटीं घातली सुरी ॥ प्राण निर्धारी तेणें दिधला ॥ ७५॥

आतां जो होता सावकार ॥ तोची द्रव्य घेऊन गेला समग्र ॥ ज्याचें गेलें तो होता जामीन थोर ॥ म्हणोन प्रकार हा जाला ॥ ७६ ॥

आपली जामिनगत उगवून ॥ शेखीं त्याचाही घेतला प्राण ॥ पूर्वी त्याचे घरीं सुरी घेऊन ॥ दिधला होता प्राण पैं तेणें ॥ ७७ ॥

तोचि अंतरीं साधून वैर ॥ खड्गें तोडिलें तयाचें शीर ॥ हा तंव बोल कवणावर ॥ सांगा मुनि निर्धारें ॥ ७८ ॥

ऐकून विष्णुमुखीची वाणी ॥ तटस्थ जाला नारदमुनी ॥ मग नमस्कार करूनी ॥ ऊर्ध्वपंथें तो गेला ॥ ७९ ॥

ऐसी हे दृष्टांतीं कथा बरवी ॥ श्रोतियातें निवेदिली आघवी ॥ यालागीं जीवीं गोष्टी धरावी ॥ सरती करावी वचनीं हे ॥ ८० ॥

आदौ ब्राह्मणाचें घेऊं नये ऋण ॥ घेतलिया न ठेविजे जाण ॥ तें तो अपायाचें कारण ॥ होय नि:संतान पै तेणें ॥ ८१ ॥

असो आतां हें मागील कथन ॥ आठव देतों तुह्मांलागून ॥ मागें निवेदिला ब्राह्मणधर्म जान ॥ सर्व जनीं परिसिला ॥ ८२ ॥

तरि म्हणाल कैसें कथन ॥ परिसीजे व्यास वचन ॥ माझें पदरींचे न होती जाण ॥ श्लोकी जाण पुराणींचे ॥ ८३ ॥

अश्ववाहनतत्वज्ञः संग्रामे नचभीः क्वचित ॥ आरंभे नीतिमान् शूरःक्षत्रियोसौ प्रकीर्तितः ॥ ४ ॥

लोहकर्मणिः निष्णातः पशूनां परिपालकः ॥ कृषिवाणिज्यकर्ताच सविप्रो वैश्य उच्यते ॥ ५ ॥

स्नेहलाक्षातिलानीली क्षारंक्षीरघृतंमधु ॥ मद्यादि विक्रयीविप्रः सशूद्रः परिकीर्तितः ॥ ६ ॥

भक्ष्याभक्ष्य समोयस्तु समोदारान्ययोरपि ॥ कृत्याकृत्यं न जानाति कृतघ्नो ब्राह्मणः पशुः ॥ ७ ॥

ऐसिया श्लोकाधारें करून ॥ केलें ब्राह्मण धर्माचे निरोपण ॥ म्हणोनी न ठेवा जी दूषण ॥ मजलागूनी स्वामियां ॥ ८४ ॥

ग्रंथगर्भी असे भाव जैसा ॥ तरी वदावा लागे मग तैसा ॥ तरीं ब्राह्मण पाहिजे कैसा ॥ तेही दशा अवधारीं ॥ ८५ ॥

श्रीविष्णु रुवाच ॥ मिताश्यध्यापकश्चैव संतुष्टोविजितेंद्रियः ॥ वेदशास्त्रार्थतत्वज्ञो विप्रोदेवः प्रकीर्तितः ॥ ८ ॥

अकष्ट फलमूलाशी वनवासरतः सदा ॥ कुरुतेहरहः कर्म सविप्रऋषिरुच्यते ॥ ९ ॥

पुराणकथको विप्रो व्यासरूपीहरिः स्वयं ॥ तद्भक्तिं कुर्वतांनृणा गंगास्न नं दिने दिने ॥ १० ॥

इहीं लक्षणीं पाचारूनि ब्राह्मण ॥ तयाची पूजा अगत्य करून ॥ मग यथानुशक्त्या द्यावें दान ॥ अपूपान्नकृतेसी ॥ ८६ ॥

घृतशर्करायुक्त पाहीं ॥ तीन दशक वरी तीनही ॥ दक्षिणेसहीत बरवीं ॥ घृतयुक्त तै दीजे ॥ ८७ ॥

वापीकूप सरोवर जीवन ॥ तेथें करावया प्रात:स्नान ॥ ऐसें मासवरी करितां जाण ॥ घडे पुण्य तें ऐका ॥ ८८ ॥

एव ज्ञात्वानरैः सेव्यः पुराणज्ञो मलिम्लुचे ॥ प्रयागादधिकं पुण्यं तस्य विप्रस्य सेवनात् ॥ ११ ॥

गंगा-यमुना सरस्वती पाही ॥ तें प्रयाग स्नान घडे देहीं ॥ वरी ब्राह्मणपूजा बरवी ॥ स्नेहें करावी आदरें ॥ ८९ ॥

तेणें पुण्यें करूनि जाण ॥ होय पापमळाचें क्षाळण ॥ अपमृत्यु गंडातर दूर होऊन ॥ वैकुंठभुवन तो पावे ॥ ९० ॥

राजा हो अथवा रंक ॥ सर्वास लाभ समान देख ॥ यदर्थी संशय आणिक ॥ न धरावा देख मानसीं ॥ ९१ ।

काळें करूनि तीर्थाचें फळ ॥ शरीर शक्ति यात्रा सफळ ॥ द्रव्यशक्ति यज्ञाचें फळ ॥ सेवा फळ ब्राह्मणाची ॥

९२ ॥

ब्राह्मण सेवा फळे तत्काळ ॥ आतृप्त भोजन घालितां सकळ ॥ आशीर्वाद देती सुफळ ॥ तोचि फळे भाविका ॥ ९३ ॥

म्हणोनि देवाचें मुख ॥ ते ब्राह्मण जाणिजे देख ॥ यालागीं सेवा अधिक ॥ मासामाजी निर्धारें ॥ ९४ ॥

क्वचित् वेदमंत्रोच्चारी ॥ क्वचित् पुराणज्ञ जरी ॥ तरीं घेतला शास्त्राधारीं ॥ दानाधिकारी असे तो ॥ ९५ ॥

ऐसा इतिहास बरवा ॥ निवेदिला तुम्हां सर्वा ॥ येथें संशयो न धरावा ॥ शास्त्रीं घ्यावा प्रत्ययो ॥ ९६ ॥

स्वस्तिश्री अधिक माहात्म्य ॥ ब्रह्मांड पुराण समंत ॥ मनोहरसुत विरचित ॥ चतुर्थोऽध्याय गोड हा ॥ ९७ ॥

ओवी संख्या ९७ ॥ श्लोक ११ ॥

॥ इति चतुर्थोध्यायः ॥

----------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय पाचवा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरवे नमः ॥ जयजयाजी गुरुराया ॥ मोरेश्वरमहाराजया ॥ नमन तुमचियां पायां ॥ करा छाया कृपेची ॥ १ ॥

तुमचिया कृपेची नौका ॥ परतीरा न्यावें बालका ॥ मनीं धरिला जो आवंका तो ॥ तो सिद्धि नेई का दयानिधी ॥ २ ॥

ऐका आतां श्रोतेजन ॥ कथा हे पुण्यपावन ॥ जे ऐकतां वैकुंठभुवन ॥ लक्ष्मीनारायण संवाद हा ॥ ३ ॥

श्रीविष्णुरुवाच ॥ एकदोपवनं देविजग्मुर्यदुकुमारकाः ॥ विहर्तुं सांब प्रद्युम्न चारुभानु गदादयः ॥ १ ॥

क्रीडित्वा सुचिरं कालं विचरंतः पिपासिताः ॥ जलंनिरुदके कूपे ददृशुः सत्वमद्भुतं ॥ २ ॥

कृकलासं गिरिनिभं वीक्ष्य विस्मितमानसाः ॥ तस्यचोद्धरणे यत्नं चक्रुस्ते कृपयान्विताः ॥ ३ ॥

ऐका हो श्रोते सर्व ॥ ब्राह्मणाचें माहात्म्य अपूर्व ॥ मागें कथिलें तुम्हातें सर्व ॥ आतांही अपूर्व आकर्पिजे ॥ ४ ॥

श्री विष्णु स्वयें आपण ॥ लक्ष्मीप्रती करीतसे श्रवण ॥

तेंची ऐका सावधान ॥ करूनि मन एकाग्र पै ॥ ५ ॥

एकदां मिळोन सर्व कृष्णकुमर ॥ खेळत होते तेव्हां अपार ॥ खेळत खेळत प्रवेशले दूर ॥ एका अरण्यामाजी ते ॥ ६ ॥

तंव तेथें खेळतां चेंडू उसळला ॥ तो जाऊन एका कूपामाजी पडला ॥ तंव तेथें पातला अर्भकमेळा ॥ पाहती कूपालागीतें ॥ ७ ॥

तेथें आश्चर्य देखिले नयनीं । तया कूपामाजी तक्षणीं ॥ कृकलास देखिला तयांनीं ॥ कृकलाश म्हणजे सरड तो ॥ ८ ॥

तो सरड पर्वता ऐसा ॥ कांती सुवर्णमय सहसा ॥ म्हणती आजवरी सरड ऐसा ॥ न देखों निजदृष्टीं ॥ ९ ॥

मग समग्र मिळोन एके ठायीं ॥ प्रवर्तक जाले त्याचि डोई ॥ सर्व मिळोन ते समयीं ॥ कर्षिते झाले तयातें ॥ १० ॥

चर्मबंधनीं बांधिला दृढ ॥ तंव बोलता जाला तो सरड ॥ हे मूलहो सर्वही मूढ ॥ तुम्हांमाजी प्रौढ तो कवण ॥ ११ ॥

मनुष्यवाणी तो बोले पाही ॥ आश्चर्य करूं लागले सर्वही ॥ मग सांब-प्रद्युम्न ते समयी ॥ बोलते जाले तयातें ॥ १२ ॥

म्हणती चतुरपणें बोलशी भाषा ॥ तरी तूं आहेस कवण महापुरुषा ॥ तुझी तंव व्हावया ऐशीदशा ॥ कारण काय निवेदीं ॥ १३ ॥

मग तो सरड ते काळीं पाहीं ॥ वदता जाला तयाते देहीं ॥ म्हणे मूलहो ऐका सर्वही ॥ पूर्वकथन माझें हें ॥ १४ ॥

पूर्वी मी नृग राजेंद्र देख ॥ इक्ष्वाकुवंशीं असे एक ॥ राज्यभार चालविं विवेक ॥ धर्मन्याय प्रतापी ॥ १५ ॥

दान करितसें अपार ॥ अमित माझा कारभार ॥ वयसा सुवर्णमय साचार ॥ देखुनि सुरवर मानवती ॥ १६ ॥

ऐसें असतां एकेकाळीं ॥ मलमासाचिया पर्वकाळीं ॥ पाचारून विप्रमंडळी ॥ गोदानें तोषवितसें ॥ १७ ॥

सलक्षणीं सालंकारयुक्त ॥ सहस्र गोदानें देतसे नित्य॥ पुढें परिसिजे वृत्तांत ॥ वर्तला तो अवधारा ॥ १८ ॥

एका ब्राह्मणातें धेनु दिधली दान ॥ तंव ते कळपांत आली पळून ॥ दुसरे दिनी सेवकीं धरून ॥ उभी केली दानार्थ ॥ १९ ॥

मी संकल्पयुक्त पाहीं ॥ दान दिधलें ते समयीं ॥ ब्राह्मण घेऊन जातां स्वगृहीं ॥ पूर्व दिवशींचा भेटला द्विजवर ॥ २० ॥

तयानें ते धेनु ओळखिली ॥ म्हणें मज हे काल दान आली ॥ येरू म्हणे रायें आतांचि दिधली ॥ मजलागुनी स्वामियां ॥ २१ ॥

मी तो न देई तुम्हातें ॥ येरू जाऊं न देई तयातें ॥ कलह मांडिला उभयतांतें ॥ आले धांवत मजलागीं ॥ २२ ॥

मग मी समजावीं दोघांतें ॥ नेणोनि अपराध घडला मातें ॥ म्हणे हिचेनि पालटे तुम्हातें ॥ धेनु देतों दुसरी मी ॥ २३ ॥

ऐसें तयातें समजावितां ॥ तंव ते नायकती उभयंता ॥ मग सहस्र गोदानें तत्वतां ॥ द्यावया सिद्ध जाहालों ॥ २४ ॥

एका धेनूचे पालटें ॥ सहस्र द्यावया नेटें ॥ सिद्ध

जहालोसे हटें ॥ परी नायकती उभयतां ॥ २५ ॥

मज ते सांगती शास्त्राधार ॥ संकल्पें बद्ध झाला तो द्विजवर ॥ तया पालटें अन्य विचार ॥ तरी पाप अघोर तें असे ॥ २६ ॥

गोविक्रया समान जाण ॥ पाप घडे हो तेणें दारुण ॥ म्हणोन शापिलें मजलागून ॥ कृकलास होईं पापिष्ठा ॥ २७ ॥

विनाकारण हा शाप त्याणीं ॥ दिधला हो मजलागुनी ॥ मग प्रार्थिता जालों मधुरवाणी ॥ मग उश्शाप वाणी बोलिले ॥ २८ ।

कृष्णकुमाराची दृष्टी पडतां ॥ तैं उद्धार होय तुझा नृपनाथा ॥ तोची प्रसंग जाण आतां ॥ सिद्धनिरुता पातलासे ॥ २९ ॥

पुढें कालांतरें करून ॥ देह झाला विसर्जन ॥ यमदूत येऊनि जाण ॥ नेले मज लागून यमलोका ॥ ३० ॥

यमानें माझा सत्कार ॥ केला तेथें अति आदर ॥ विप्रशाप परम दुर्धर ॥ गांठींस असें माझें पैं ॥ ३१ ॥

तयायोगें करूनि जाण ॥ मज बोले सूर्यनंदन ॥ तूं

नृपपुण्य पावन ॥ परी विप्रवचन न चुके ॥ ३२ ॥

यालागी नृपवर्या पाहीं ॥ मज भोगणे लागे सरड देहीं ॥ म्हणोन प्राप्त झालें तिये समयीं ॥ तेंची पाहीं भोगूं आतां ॥ ३३ ॥

तरी तुम्हीं आतां ऐकावें ॥ कृष्णदर्शन मज करवावे ॥ जाऊन तयातें निवेदावें ॥ वृत्तांत माझा हा ॥ ३४ ॥

ऐकून तयाचें उत्तर ॥ धांवत गेले कृष्णकुमर ॥ करून देवातें नमस्कार ॥ समाचार सांगितला ॥ ३५ ॥

वृत्तांत ऐकतांच देवें ॥ धांव घेतली यदुपुंगवें ॥ दर्शन होतांची रमाधवें ॥ उद्धार केला तात्काळीं ॥ ३६ ॥

पाहूनियां स्वदेहासी ॥ नृगराज प्रवर्तला स्तुतीसी ॥ हे जनार्दन ऋषीकेशी ॥ तोडीं भवपाशासी माझिया ॥ ३७ ॥

हे केशव मधुमुरसंहरणा ॥ हे कृष्ण विष्णुजनार्दना ॥ जगपाळका दीनोद्धारणा ॥ नारायणा दयानिधे ॥ ३८ ॥

अवलोकितां कृपानयनीं ॥ पूर्वदेह आठवला मनीं ॥ दर्शन जालें मजलागूनीं ॥ पूर्वपुण्यें करूनि स्वामियां ॥

३९ ॥

देवदेव जगन्नाथ गोविंद पुरुषोत्तम ॥ नारायण हृषीकेश पुण्यश्लोकाच्युताव्यय ॥ ४ ॥

ऐसी स्तुती करितां रावो ॥ संतोषें बोले रमाधवो ॥ तुवां आचरलासी व्रत प्रभावो ॥ म्हणोनि पाहावो देव भेटी ॥ ४० ॥

यालागीं केलें कर्म जे तें वायां ॥ जाईनाजी नृपवर्या ॥ आणि ब्राह्मण पूजनाची चर्या ॥ ती या समया फळलीसे ॥ ४१ ॥

मग पाचारून समग्र कुमर ॥ तयाप्रती बोले शारङ्धर ॥ म्हणे अन्याय केउता नृपवर ॥ कहर केवढा जाहला ॥ ४२ ॥

यालागीं ब्राह्मणातें जे भिवोन ॥ करिती तयाचें पूजनस्तवन ॥ सद्भावें घालिती जे भोजन ॥ तरी मी जनार्दन संतुष्टें ॥ ४३ ॥

रणउत्साह क्षत्रियांसी ॥ तृणउत्साह धेनूसीं ॥ आमंत्रणउत्साह ब्राह्मणासी ॥ कृपणासी धनउत्साह ॥ ४४ ॥

म्हणोन ब्राह्मणभोजना ऐसें ॥ साधन तों आणीक नसे ॥ म्हणोनी पूजावें सायासें ॥ समयीं अनयासें अभ्यागत ॥ ४५ ॥

जरी शक्तिही नाहीं द्यावयासीं । आणि शक्तिही नाहीं दानासीं ॥ तरी नमन कीजे सद्भावेंसी ॥ तेणें द्विजासीं संतोष ॥ ४६ ॥

इतुकेंही न घडे जरी ॥ अभ्यंग स्नान सत्कारीं ॥ यासी तो वेंचावें न लागे पदरीं ॥ असलिया मुष्टीभरी अर्पावें ॥ ४७ ॥

अहो या ब्राह्मणासाठीं ॥ अवतार घे मी जगजेठी ॥ स्वयें सोसी आटाआटी ॥ ब्राह्मणासाठीं केवढी ॥ ४८ ॥

ब्राह्मणाचें लांछन पाहीं ॥ स्वयें मी मिरवीत ह्रदयीं ॥ ब्राह्मणा ऐसें दैवत नाहीं ॥ भूमंडळा माझारी ॥ ४९ ॥

ऐसियापरी शिकवण ॥ कुमारा सांगे श्रीकृष्ण ॥ याउपरी कथा अवलोकुन ॥ श्रोतेजन परिसोत कां ॥ ५० ॥

मग तो नृग राजशिरोमणी ॥ दिव्य देह पावोन तेच क्षणीं ॥ आरूढ जाला विमानीं ॥ नमस्कारूनी हरीतें

॥ ५१ ॥

इत्युक्त्वा तं परिक्रम्य पादौ स्पृष्ट्वा स्वमौलिना ।
अनुज्ञा तो विमानागर्यमारोहत्पश्यतां नृणां ॥ ५ ॥

सद्भिः समागमो राजन् कदाचिन्नाफलो भवेत् ॥
विमुक्तो नरकाद्राजानृगः साधुसमागमात् ॥ ६ ॥

या प्रकारे नृगनृपवर ॥ पावता जाला उद्धार ॥
म्हणोनियां धरामर ॥ अगोदर पूजावे ॥ ५२ ॥

पाहा केवढा ग्र्यान भगवंतें ॥ दिधलासे ब्राह्मणातें ॥
ब्राह्मणाधीनची प्राप्त दैवतें ॥ ब्राह्मणाधीनते मंत्र ॥
५३ ॥

पाहाया भूमंडळीं विख्याती ॥ भगीरथें आणिली
भागीरथी ॥ तें जगातें पूर्ण करिती ॥ परी साधु
उद्धरिती तयातें ॥ ५४ ॥

एकदा भागीरथी तटाकीं ॥ स्नान कीजे समग्र लोकीं ॥
तंव नारद तेथे दुरोन अवलोकीं ॥ परि न स्पर्श सलीला
॥ ५५ ॥

तव गंगा म्हणे मुनिवर्या ॥ दुरूनीच अवलोकुनियां ॥
कां स्पर्शोनद्याजी पायां ॥ करा छाया कृपेची ॥ ५६ ॥

सर्वेलोकानिमज्जांतिसाधुः किन्ननिमज्जति ॥ मातः त्वद्दर्शनान्मुक्तिः पुनर्जन्मन विद्यते ॥ ७ ॥

तंव नारद म्हणे ते समयीं ॥ तुज ऐसें पवित्र नाहीं ॥ तव दर्शनेंचि पाहीं ॥ मुक्ती होई प्राणियां ॥ ५७ ॥

मग स्नान केलिया सकळ ॥ क्षाळण होय अंगाचे मळ ॥ पाप न उरे तिळभर ॥ राहें अचळ ब्रह्मभुवनीं ॥ ५८ ॥

तंव गंगा बोले मुनिराया ॥ जैं मी आलें हो या ठायां ॥ तैंचा नेम वचन आठव ह्रदया ॥ माझिया असे कीं ॥ ५९ ॥

जगाचे पापाचें क्षाळण ॥ ते तव होतसे माझे न ॥ परी माझे पापमोचन ॥ तुमचेंनि जाण होतसे ॥ ६० ॥

मग हास्य करून देवऋषी ॥ मार्जन मज्जन केलें तिसीं ॥ प्रवेशता जाला भुवनासी ॥ ब्रह्मलोकासी मुनिरावो ॥ ६१ ॥

ऐसें साधूचें महिमान ॥ गंगा वर्णीतसे आपण ॥ म्हणोन प्रार्थितो तुम्हांलागून ॥ पूजा साधुजन आदरें ॥ ६२ ॥

साधूनां दर्शनं स्पर्शःकीर्तनं स्मरण तथा ॥ ब्रह्मस्व नच हर्तव्यं यदिच्छसि परांगतिं ॥ ८ ॥

सामर्थ्य असोनि आंगीं ॥ शक्तिनुसार न पूजिती जगी ॥ तरी तया ऐसा अभागी ॥ भुवन त्रयीं नसेची ॥ ६३ ॥

संसार तरी माईक ॥ आयुष्य जाण क्षणैक ॥ येथें कीजे पूर्ण विवेक ॥ करा सार्थक देहाचें ॥ ६४ ॥

धन असलिया अपरमित ॥ कांहीं नयेचि पै सांगत ॥ म्हणोनि कीजे हिताहित ॥ ह्रदयीं श्रीअनंत आठवूनी ॥ ६५ ॥

कृष्णः परिजनं गृह्य भगवान् देवकीसुतः । ब्रह्मण्यदेवो धर्मात्मा राजानमनुशिक्षयन् ॥ ९ ॥

एवं विभाव्य भगवान् मुकुंदो द्वारशोकसः ॥ पावनः सर्वलोकानां विवेश निजमंदिरं ॥ १० ॥

ऐसा कथाभाग रमाधवें ॥ कथिला जो स्वभावें ॥ जग हे पावन करावें ॥ म्हणोनि स्वभावें निवेदित ॥ ६६ ॥

तोची अर्थांतर बरवा ॥ तुम्हा निवेदिला श्रोतिया सर्वां ॥ चित्ती संशय न धरावा ॥ पुराणीं पाहावा प्रत्ययो ॥

६७ ॥

इति श्रीअधिकमास माहात्म ग्रंथ ॥ पद्मपुराणींचें संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ पंचमोऽध्याय गोड हा ॥ ६८ ॥

ओव्या ६८ ॥

॥ इति पंचमोऽध्यायः ॥

------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय सहावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ नमूं आतां सद्गुरु ॥ जो पराचाही परपरु ॥ जयाचे कृपेनें पसरु ॥ ग्रंथ निर्धार चाले हा ॥ १ ॥

आतां ऐका श्रोतेजन ॥ अधिक मास महिमा आख्यान ॥ जें श्रवण केलिया घडे पुण्य ॥ होय निरसन पापाचें ॥ २ ॥

पहा भगवंत केवढा दयाळू ॥ दीननाथाचा प्रतिपाळू ॥ झाडावया पापाचा मळू ॥ कथा अळुमाळू वदतसे ॥ ३ ॥

भगवन्मलमासे वै दीपदानस्य यत्फलं ॥ तत्सर्वं ब्रूही मे देव लोकाना हित काम्यया ॥ १ ॥

श्रीविष्णु रुवाच ॥ श्रुणु देवि प्रवक्ष्यामि रहस्यं पापनाशनं ॥ यत्कृत्वां पितृहा गोघ्नोब्रह्महा गुरुतल्पगः ॥ २ ॥

विघाती कूटसाक्षी वा सर्वपाप करोति वा ॥ मुच्यते नात्र संदेहो विष्णुलोकं स गच्छति ॥ ३ ॥

प्रश्न करितसे श्रीलक्ष्मी ॥ वदतसे कैवल्यधामी ॥ तेंचीं श्रवण कीजे तुम्हीं ॥ पाप क्षयातें जाणपा ॥ ४ ॥

जया वाटे कीं पाप जावें ॥ तयानें आधीं श्रवण करावे ॥ एकाग्र अवधान द्यावे ॥ ग्रंथानुमोदनी पै ॥ ५ ॥

तंव लक्ष्मी वदे जी स्वामिनाथा ॥ दीपदानाची व्यवस्था ॥ मज निरोपिजे तत्वता ॥ जेणें भवव्यथा निवारे ॥ ६ ॥

कवण पापाचिया रासी ॥ नष्ट होती दीपदानेशीं ॥ पूर्वी ऐसिया वृत्तासी ॥ आचरून पुण्यराशी तो झाला ॥ ७ ॥

हें आद्यंत निरूपण ॥ मज करवाजी श्रवण ॥ तंव

बोले जनार्दन ॥ ऐकें कथन पुढारी ॥ ८ ॥

पितृहत्या गोहत्यारी ॥ ब्रह्महत्या गुरुहत्यारी ॥ कृतघ्न आणी परद्वारी ॥ दुराचारी मद्यप्राशक ॥ ९ ॥

कुटिल लबाड असत्यवादी ॥ असत्यसाक्षी तें प्रतिपादी ॥ मातापित्यातें त्यजुनि आधीं ॥ मातृगमनीं दुराचारी ॥ १० ॥

भ्रूणहत्या पूत्र हत्या पाहीं ॥ श्नुषाभगिनी कन्येतेंही ॥ याते रत जो स्वदेहीं ॥ ऐशी महापातकें अपार ॥ ११ ॥

तया पापाचें क्षाळण ॥ होय केलिया दीपदान ॥ आतां पावेतो मोक्षसदन ॥ संशय अन्य न धरावा ॥ १२ ॥

अधिकमासी मासवरी ॥ केशवा अर्पण दान करी ॥ प्रतिपदा आरंभ निर्धारी ॥ संपूर्ण मास वरी पै द्यावें ॥ १३ ॥

स्नान कीजे प्रातःकाळीं ॥ गंगायमुनासागरजळीं ॥ अथवा सरोवराचें पाळीं ॥ की जे प्रतिदिनी स्नानातें ॥ १४ ॥

हेंही न घडे कवणातें जरी ॥ वापीकूप तडागाचे परी ॥

स्नान कीजे निर्धारी ॥ अथवा स्वगृहीं शीतोदकें ॥ १५ ॥

शरीरीं सामर्थ्य नसलिया पाहीं ॥ प्रवाहा जावया शक्ति नाहीं ॥ शीतोदक नसे संवर्तेही ॥ तरीं बाध नाहीं उष्णोदका ॥ १६ ॥

संपूर्ण फलदं सम्यक् स्नानमुष्णेन वारिणा ॥ शीतेद्विगुणमेवस्यात्कूपेतश्च चतुर्गुण ॥ ४ ॥

नद्यां दशगुणं प्रोक्तं महानद्यां ततो दश ॥ सहस्रगुणितं प्रोक्तं महानद्योश्च संगमे ॥ ५ ॥

संपूर्णफल असे उष्णोदकीं ॥ तया द्विगुणित जाण शीतोदकीं ॥ वापीकूप आणि तटाकीं ॥ चतुर्गुणित जाण पां ॥ १७ ॥

नदी तीराचिया ठायीं जाण ॥ दशगुणित घडे पुण्य ॥ तया दशगुणें जाण ॥ घडे पुण्य गंगास्नानें ॥ १८ ॥

महागंगा क्षेत्री पाहीं ॥ अथवा सागराचे तीरींही ॥ संकल्पयुक्त स्नान केलें जिहीं ॥ तरी सहस्रगुणें पुण्य जोडे ॥ १९ ॥

ऐसें स्नानविधीतें सारून ॥ मग कीजे देवतार्चन ॥

स्वयें ताम्रपात्रीं आज्य घालून ॥ दीप लावून ठेविजे ॥ २० ॥

मग सत्पात्र ब्राह्मण ॥ पाचारावें तया लागून ॥ दीपपूजन करूनि जाण ॥ द्यावें दान ब्राह्मणातें ॥ २१ ॥

दक्षिणेसहीत दीप ॥ एक मासवरी साक्षेप ॥ केलिया होय नि:पाप ॥ सुख अमूप ते पावती ॥ २२ ॥

आयुरारोग्य संतती अपार ॥ चुके यमयातना कीं अघोर ॥ ॥ दीपदानें कांति सुंदर ॥ वर्धमान होय पै ॥ २३ ॥

अपमृत्यु गंडांतर ॥ दूर होय हा निर्धार ॥ ये विषयीं आन विचार ॥ न घडे साचार जाणपां ॥ २४ ॥

शतजन्मोत्थितं पामं मासार्धे नैव गच्छति ॥ जन्मांतर सहस्त्रैस्तु यदघं समुपार्जितं ॥ ६ ॥

सप्त जन्मार्जित जें पाप ॥ तेही झडे आपोआप ॥ शत जन्माचा जो लेप ॥ तोही अमूप झडतसे ॥ २५ ॥

परी श्रद्धापुरस्कर पाहीं ॥ नित्य नित्य हव्यास देहीं ॥ घडतो ऐसा संदेह नाहीं ॥ शास्त्रीं पाहीं हा निर्णयो ॥ २६ ॥

दीपदानाचा पर्वविधी ॥ जळकुंभ ठेविजे आधीं ॥ परिपूर्ण जळसंधी ॥ पूजाविधी करूनियां ॥ २७ ॥

तयावरी मग दीप ठेवूनी ॥ जळकुंभा सहीत दीजे दानीं ॥ एकमास वरी प्रतिदिनी ॥ करितां निर्वाणीं फळ लाभे ॥ २८ ॥

स्त्री अथवा पुरुषातें ॥ समान लाभ दोहीं तें ॥ सौभाग्य अथवा विधवेतें ॥ समान पुण्यातें पाविजे ॥ २९ ॥

वरकड करितां यज्ञदान ॥ द्रव्य पाहिजे तया लागून ॥ येथें अल्प वेचे महापुण्य ॥ सांगितले जाण साक्षेपे ॥ ३० ॥

यथाशक्ति ब्राह्मणभोजन ॥ भक्तिपुरस्कर करावें जाण ॥ श्रीलक्ष्मी नारायण म्हणोन ॥ संतर्पण करावें ॥ ३१ ॥

तयावरी शक्ति असेल पाहीं ॥ वस्त्रें अलंकार दक्षिणातेही ॥ भाव धरोनीं देहीं ॥ अति आदरे अर्पिजे ॥ ३२ ॥

नानापरी घृतमिश्रित ॥ अपूप अन्नें यथास्थित ॥ षड्रसें पक्वान्नें बहुत ॥ ब्राह्मणातें अर्पावीं ॥ ३३ ॥

गोभूहिरण्य दानांनीं ॥ जो अर्पी भूदेवा लागुनीं ॥ मलमासाशी प्रतिदिनीं ॥ तो मोक्षसदनीं पावतो ॥ ३४ ॥

आयुरारोग्य धनसमृद्धी ॥ अपमृत्यु न बाधी ॥ पुरे आयुष्याची अवधी ॥ तोवरी आरोग्यता देहासी ॥ ३५॥

वैश्यातें पशुधन प्राप्त ॥ शूद्राते सुखोत्पत्ति होत ॥ क्षत्रिय तो विजयी रणांत ॥ न बाधित शस्त्र घाय ॥ ३६ ॥

स्त्रियांतें वैधव्य नाहीं ॥ कुमारी तें निज भ्रतार तोही ॥ सुलक्षणीक प्राप्त होई ॥ व्रत प्रभावें ऐशिया ॥ ३७ ॥

नित्य करावें पुराणश्रवण ॥ रात्रौ कीजे हरिजाग्रण ॥ प्रातःकाळीं प्रातःस्नान ॥ दीपदान यथाविधि ॥ ३८ ॥

पूर्वी सरस्वती तीराचे ठायीं ॥ सुशर्मा नामें द्विज पाहीं ॥ पुत्र कलत्र सर्व आप्तही ॥ स्त्रीयुक्त नांदतसे ॥ ३९ ॥

भिक्षा मागून नित्यानित्य ॥ कुटुंबातें संरक्षित ॥ तयावरीही अतीत ॥ असलिया सांभाळीत माध्यान्हीं ॥ ४० ॥

धन्य ऐशियाचा संसार ॥ स्त्री असोनी स्वधर्मी नर ॥ रूपवती सेवेसीं सादर ॥ मनीं तिरस्कार न मानीं ॥ ४१ ॥

समयीं आलिया अतीत ॥ लाहें लाहे दुणावत ॥ तयातें असे तोषवित ॥ भोजनपानें आदरेंसी ॥ ४२ ॥

भिक्षार्थी याचे गृहातें ॥ सर्व संग्रहक कैचा तेथे ॥ परी समयीं असेल तें ॥ यथारुचि संपादी ॥ ४३ ॥

स्वपुत्राची आशा न धरी मनीं ॥ परम आल्हाद ब्राह्मणभोजनीं ॥ न उरो आपणा दुसरें दिनीं ॥ परि खेद मनीं मानिना ॥ ४४ ॥

ऐशी स्त्री धर्मानुकूळ ॥ तया पुरुषाचा सुफळ काळ ॥ तयावरी तुष्टे हो गोपाळ ॥ पावे दयाळ संकटीं ॥ ४५ ॥

परी ऐसें वर्ततां संसारीं ॥ तया अपुरें न पडे निर्धारी ॥ सदां वर्ततां सदाचारी ॥ पाहे मुरारी कसवटी ॥ ४६ ॥

तेथें सर्वदा जो संतुष्ट ॥ हर्षची मानी उत्कृष्ट ॥ मग तयावरी जगन्नाथ ॥ सदां संतुष्ट मानसीं ॥ ४७ ॥

असो आतां पाल्हाळ बहुत ॥ सुशर्मा यथाचारें वर्तत ॥

गृहीं धेनूसेवा नित्य करित ॥ उदर भरी ऐसिया परी ॥ ४८ ॥

नित्य करून प्रातःस्नान ॥ वरी करीतसे जपध्यान ॥ मग करूनियां भिक्षाटण ॥ अतीतासहीत भोजन करितसे ॥ ४९ ॥

धन्य ऐशियाचा संसार ॥ तोची प्रिय होय रमावर ॥ नाहीं तरी असाक्षी भोजन प्रकार ॥ न घडो निर्धार देहातें ॥ ५० ॥

अतिथि बैसवूनिया द्वारीं ॥ स्वगृहीं भोजन जो करी ॥ सोयरियाची प्रार्थना करी ॥ बरवियापरीं मिष्टान्न ॥ ५१ ॥

ऐसें भोजन घडे जयासीं ॥ तरी नरकीं वास तयासीं ॥ तें भोजन मांसभक्षणासी ॥ उदक प्राशनें रुधिर ॥ ५२ ॥

अतिथि अभ्यागता विरहित ॥ भोजन घडे जयातें नित्य ॥ तरीं सोमपानाचें फळ प्राप्त ॥ असे निश्चित निर्धारें ॥ ५३ ॥

ऐसा सुशर्मा निर्धारी ॥ पुराणश्रवण तृतीय प्रहरीं ॥ रात्रौ करि हरिजागरि ॥ तेणें तुष्टे नारायण ॥ ५४ ॥

ऐसी करिता काळक्रमणा ॥ पैसा वेची सत्कारणा ॥ तव मलमास प्रवर्तता जाणा ॥ करी विचारणा मानसीं ॥ ५५ ॥

म्हणे संचय नाहीं धनासी ॥ केवी घडे पुण्यराशी ॥ कवणें करावें दानासी ॥ व्रत प्रभावासी याचि पै ॥ ५६ ॥

मी तंव दरिद्री अत्यंत ॥ न घडेची परमार्थ ॥ दानधर्म यथास्थित ॥ न घडे किंचित मजलागीं ॥ ५७ ॥

ऐशी चिंता परम ह्रदयीं ॥ उद्भवली तयाशीं पाहीं ॥ म्हणें सार्थक घडलें नाहीं ॥ मूर्खदशा पाही या वाचे ॥ ५८ ॥

प्रतिदिनीं मौन्य धरून ॥ पुराणीं बैसतो जाऊन ॥ तंव तेथें निघालें दीपाख्यान ॥ केलें श्रवण यथा निगुती ॥ ५९ ॥

तोचि बोध चित्तीं ठसाऊन ॥ म्हणें हेंची करावें आपण ॥ मग प्रतिदिनीं दीपदान ॥ करी ब्राह्मण निजनिष्ठें ॥ ६० ॥

पुरुषोत्तम प्रीत्यर्थ भक्ती ॥ दान देत असे ब्राह्मणाप्रती ॥ ऐसा नेम चालवितां प्रीती ॥ काय निश्चिती वर्तलें ॥

६१ ॥

एकादशीचे दिवशीं ॥ सुशर्मा बैसला जागरणासी ॥ दीप लावून घृतेसी ॥ संनिधेसी ठेवीत ॥ ६२ ॥

पूजा करून संकल्पयुक्त ॥ प्रातःकाळीं अर्पू ब्राह्मणातें ॥ ऐसा नेम करून ह्रदयांत ॥ प्रातःस्नानाते जातसे ॥ ६३ ॥

तंव घरची निद्रिस्त सर्वही ॥ जागृत तेथें कोणीच नाही ॥ तंव एक बिडाळक तेथें पाही ॥ मूषका लागीं डंसितसे ॥ ६४ ॥

तेथें दीपज्योति मंद झाली ॥ मूषक न देखे नेत्रयुगुळीं ॥ मग माजरिे ते वेळीं ॥ केली नव्हाळी ते ऐका ॥ ६५ ॥

आपुल्या पुढल्या हातानें ॥ दीप सरसावित युक्तीनें ॥ मूषक दृश्य व्हावा तेणें ॥ म्हणोनि केला उपावो ॥ ६६ ॥

तों कृपाळु तो सर्वेश्वर ॥ मूषक पळाला तो सत्वर ॥ परी नवल वर्तले थोर ॥ ऐका समग्र भाविक हो ॥ ६७ ॥

तया मार्जारा ते वेळीं ॥ विमान उतरलें भूमंडळीं ॥ विमानीं बैसविताचि तात्काळीं ॥ देखे नेत्रकमळीं ब्राह्मण ॥ ६८ ॥

सुशर्मा स्नान करूनि आला ॥ तों हा चमत्कार देखिला ॥ मग बोलता जाला ते वेळां ॥ विमानस्थाते ते काळीं ॥ ६९ ॥

म्हणें देवदूत हो विज्ञापना ॥ माझा आणि जे हो मना ॥ या बिडाळकें पुण्याचरणा ॥ केलें म्हणोनि वाहिला विमानीं ॥ ७० ॥

तंव ते देवदूत सर्व समाचार ॥ तया ब्राम्हणातें कथिला साचार ॥ म्हणति हा तव संगीं उपकार ॥ केला उद्धार बिडाळका ॥ ७१ ॥

तरी संगसंगती दोष जैसा ॥ हाही पुण्यलेश जाण तैसा ॥ संवाद ऐकूनियां ऐसा ॥ चित्त उद्विग्न तें जालें ॥ ७२ ॥

म्हणे हे जनार्दना वासुदेवा ॥ हे वैकुंठमुरारे केशवा ॥ अच्युता अनंता माधवा ॥ करुणार्णवा दीनबंधो ॥ ७३ ॥

कवण पुण्याची या रासी ॥ बिडाळक आचरला

देहासी ॥ नेणे पूर्वसकृताच्या राशी ॥ म्हणोनि विमानासीं प्राप्तता ॥ ७४ ॥

हे जगदिशा जनार्दना ॥ हे कैवल्यदानीं मधुसूदना ॥ क्षीराब्धिशायी नारायणा ॥ करुणाघना दीनबंधो ॥ ७५ ॥

मी तंव अभागीं पूर्ण ॥ नेणेच कधीं पुण्यचरण ॥ मज पापीयातें स्वर्गभुवन ॥ प्राप्त कोठून होय पै ॥ ७६ ॥

ऐसा सद्गदीत अंतरीं ॥ परम द्रवला ह्रदयमंदिरीं ॥ अश्रु चालिले नेत्रद्वारीं ॥ करुणास्वरीं भाकीत ॥ ७७ ॥

तयाची करुणा ऐकून ॥ कृपेनें द्रवला नारायण ॥ तयातें चतुर्भुज करून ॥ तात्काळ वाहिला विमानीं ॥ ७८ ॥

यालागीं केलें पुण्याचरण ॥ तें कदापि वाया न जाय जाण ॥ वायां गेलिया येईल उणें ॥ ब्रीदपूर्ण तोरडीं असे ॥ ७९ ॥

स्वबुद्धी अथवा सत्संगती ॥ पुण्य घडावें भलत्या रीती ॥ तेणें संतोष श्रीपती ॥ अधोगती नवजाय ॥ ८० ॥

धन असूनियां पदरीं ॥ जो दान धर्मातें न करी ॥ तया

पापिया नरक अघोरी ॥ जन्मवरी सुटेचिना ॥ ८१ ॥

म्हणोनि अवचिता नरदेहो ॥ सुकतें लाधला पाहा हो ॥ न विचारितां न्यायान्यायो ॥ करी संचयो धनातें ॥ ८२ ॥

ऐसी वयसा संसारी वेंचितां ॥ केवी घडे सार्थकता ॥ तेचि वयसा निघोनि जातां ॥ मग धन वार्ता केउती ॥ ८३ ॥

संचय केला ज्या धनातें ॥ तो राहे जेथील तेथें ॥ एकलेची जाणें घडे त्याते ॥ जेथील तेथे निजात्मा ॥ ८४ ॥

धर्म नेणे काहीं ॥ जडला प्रवाहीं जन्मपंक्ती ॥ ८५ ॥

हाची जाणोनि अभिप्रावो ॥ कृपाळू जो देवाधिदेवो ॥ म्हणोनि सुलभ उपावो ॥ निर्मूनि ठेविला जनाते ॥ ८६ ॥

म्हणोनि सुशर्मा द्विजवर ॥ वर्ततसे दरिद्राचार ॥ परी चित्तीं धरूनि निर्धार ॥ केला उद्धार स्वयें तेणें ॥ ८७ ॥

नवियोगमवाप्नोति दीपदान प्रभावतः ॥

आधयोव्याधयश्चैव दीपदानात्प्रणाशिताः ॥ ७ ॥

भीतोभयात्प्रमुच्येत बद्धोमुच्येत बंधनात् ॥
ब्रह्महत्यादिभिः पापैर्दीपदानप्रभावतः ॥ ८ ॥

सर्वपापविनिर्मुक्तो विष्णुलोकं सगच्छति ॥
अत्राप्युदाहरंतीमितिहासं पुरातनं ॥ ९ ॥

यालागीं प्राणियातें पाहीं ॥ सुलभ उपाव निर्मिला महीं ॥ म्हणोनि आचरावें देहीं ॥ सार्थकता पाहीं अनायासें ॥ ८८ ॥

ऐसा इतिहास पुरातन ॥ लक्ष्मीतें निवेदी नारायण ॥ म्हणोनि तुम्हां श्रोतेजन ॥ केलें निरोपण यथामतीं ॥ ८९ ॥

तरीं ग्रंथांतरी ठेवूनि विश्वास ॥ स्वयें करा हो या व्रताचा सायास ॥ जेणें चुके हो गर्भवास ॥ चुके अनयासें जन्मपंक्ति ॥ ९० ॥

येथें मुख्य भावासीं कारण ॥ भावें संतुष्ट जनार्दन ॥ येर अभाविकतें पतन ॥ न चुके जाण निर्धारें ॥ ९१ ॥

ऐका भावार्थासीं कारण ॥ तुलसीदळें संतुष्टे जनार्दन ॥ म्हणोनि गर्वरहित जाण ॥ करावें पूजन महाविष्णूचें

॥ ९२ ॥

हाचि जाणोनि निर्धार ॥ वाग्वल्ली तुळसीदळ साचार ॥ तेणें अर्चिला रमावर ॥ प्रीति पडिभारें आपुलिया ॥ ९३ ॥

स्वस्तिश्री अधिकमाहात्म्य ग्रंथ ॥ पद्मपुराणींचे संमत ॥ मनोहर सुतविरचित ॥ षष्ठोऽध्याय गोड हा ॥ ६ ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ओंव्या ॥ ९३ ॥ श्लोक ॥ ९ ॥

॥ इति षष्ठोऽध्यायः ॥

--------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय सातवा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीराम जयराम राघवा ॥ पतितपावना रमाधवा ॥ करुणानिधे दयार्णवा ॥ देवाधिदेवा दीनबंधो ॥ १ ॥

तव चरणसरोजीं मीन ॥ राहो सदा होऊनि मन ॥ ऐसें देई मज वरदान ॥ कृपा निधान राघवा ॥ २ ॥

तव कृपाबळें समस्त ॥ वदेन म्हणतसें हा ग्रंथ ॥ पुरवीं

माझा मनोरथ ॥ कृपावंता दीनाचा ॥ ३ ॥

श्रीरुवाच ॥ देवेश्वरं रमानाथ पुनर्दीपफलंवद ॥ यथ येन कृतो दीपेविध्वस्तेः किं च पातकं ॥ १ ॥

लक्ष्मी म्हणेहो देवाधिदेवा ॥ प्रश्नाक्षर परिसावा ॥ पुनः दीपदानाते परिसावा ॥ कृपा करूनि स्वामिया ॥ ४ ॥

मागील अध्यायीं कथन ॥ दीपसरसावितां जाण ॥ मार्जार गेला उद्धरून ॥ नवल विंदान ऐकिलें ॥ ५ ॥

तरी दीप सरसावितां । इतुकें पुण्यजी तत्वता ॥ मग दीपातें विध्वंसिता ॥ कवण वार्ता तयाची ॥ ६ ।

ऐसा प्रश्नाक्षर रमेचा ॥ आकर्णून वदे स्ववाचा ॥ स्वामी जो दीनजनाचा ॥ वदता झाला ते काळीं ॥ ७ ॥

श्रीकृष्ण उवाच ॥ पुनरन्यत्प्रवक्ष्यामि दीपस्य फलमुत्तमं ॥ दीपविध्वंसने पुण्यं सर्व नश्यति यत्कृतं ॥ २ ॥

मग वदे वासुदेवा ॥ ऐकें दीप विध्वंसनाचा प्रभावो ॥ ये विषयींचा इतिहास पहा हो ॥ श्रवण करा हो आदरें ॥ ८ ॥

पूर्वी मधुवनाचे ठायीं ॥ एक सामवेदी विप्र असे पाही ॥ शांकली नाम तया देहीं ॥ असे निजगृहीं आनंदें ॥ ९ ॥

सदाचारी शुचिष्मंत ॥ स्नानसंध्या वेदपारंगत ॥ देवार्चनीं नित्यरत ॥ पुराण सांगत स्वगृहीं ॥ १० ॥

दुष्ट प्रतिगृह न घे कवणाचा ॥ उपार्जना नसे दीनवाचा ॥ स्वधर्म पाळून नेमाचा ॥ काळक्रमणें चालवीत ॥ ११ ॥

तयातें भार्या उभयतां दोघी ॥ विमलिका सुशीला पाही ॥ एकमय वर्तती त्रिवर्गही ॥ नसे कांहीं विपरीत ॥ १२ ॥

तयामाजी ज्येष्ठ सुशीला ॥ सदां सादर पतिवचनाला ॥ अंतर पडो नेदी वाचेला ॥ परम तत्पर दिवसनिशी ॥ १३ ॥

त्याहीवरी अतीत अभ्यागत ॥ कथापुराण श्रवण करी नित्य ॥ गृहाचारींही नित्य नैमित्य ॥ असे चालवित यथा विभागें ॥ १४ ॥

ज्यावेळीं प्रसंग पडे जैसा ॥ संसार प्रसंग चालवी तैसा ॥ सत्कर्मी लावितसे वयसा ॥ क्रमित ऐसा काळ पै ॥

१५ ॥

धन्य धन्य ऐशी कामिनी ॥ पतिव्रता शिरोमणी ॥ सदां सादर पती भजनीं ॥ पूर्वपुण्यें लाधिजे ॥ १६ ॥

धन्य तयाचा संसार ॥ जेणें पूर्वी अर्चिला रमावर ॥ म्हणोनि ऐसियेसीं संसार ॥ करणें घडे तयातें ॥ १७ ॥

नाहीं तरी दुर्मुखी भार्या ॥ मिळतां संसार गेला वायां ॥ तेथें पुण्य मार्गाची क्रिया ॥ तया प्राणिया कोठुनी ॥ १८ ॥

परी ऐसी नव्हे ती सुशीला ॥ परम पतिव्रता मंगला ॥ ऐसियेचें नाम घेतां आगळां ॥ दोषमळ परिहरती ॥ १९ ॥

तंव कवण एक अवसरीं ॥ पुराण श्रवणीं बैसे ते नारी ॥ तंव तेथें अधिकमास परी ॥ केलें निर्धारी श्रवण ॥ २० ॥

मग निजध्यास धरुनि मनीं ॥ परम विनीत होऊनी ॥ भ्रतारातें बोलतसे वाणी ॥ मधुर वचनीं तेधवां ॥ २१ ॥

भगवत्प्रष्टुमिच्छामि क्रोधं कर्तुनचार्हसी ॥ अद्यकः

पुण्यदिवसोलोकोयाति रवेःसुतां ॥ ३ ॥

हे नाथ हे स्वामीदेवा ॥ आज कवण पर्वणीचा ठेवा ॥ सर्व जनाचा मिळोन थवा ॥ जाती रेवातीरा स्नानार्थ ॥ २२ ॥

जरी कृपा करूनियां मज ॥ आज्ञा दिधलिया सहज ॥ तरी स्नाना जाऊनियां चोज ॥ निरखूं आज निजनयनीं ॥ २३ ॥

ऐकून ऐसी मंजुळवाणी ॥ शांकली बोले ते क्षणीं ॥ म्हणे आजिचिये पर्वणीं ॥ प्राप्त जाला मळमास ॥ २४ ॥

हा तंव पुरुषोत्तममास ॥ म्हणोनी जन जाता स्नानास ॥ हे व्रत करावें सायास ॥ धरूनि हव्यास निजमनीं ॥ २५ ॥

एक मासावरी चालवितां नेम ॥ तरी सकळ पापें होती भस्म ॥ संतुष्टोनी पुरुषोत्तम ॥ पावती आराम स्वपदीं ॥ २६ ॥

शांकलिरुवाच ॥ श्रृणुभद्रे प्रवक्ष्यामि यदर्थ यांति नागराः ॥ असंक्रांतः समायातोमासः श्रीपतिवल्लभः ॥ ४ ॥

तरी माझिये आज्ञेवरी ॥ तूं ह्या व्रतातें स्वीकारी ॥ प्रातःस्नान करून आदरीं ॥ दीपदानातें करी सुशीले ॥ २७ ॥

ऐसी आज्ञा होतां ते काळीं ॥ परमहर्षयुक्त जाली ते बाळी ॥ मग नमन करूनि गंगाजळीं ॥ स्नानालागीं पातली ॥ २८ ॥

स्नान करून यथाविधीं ॥ परतुनी आली गृहासंधी ॥ करून देवतार्चन विधी ॥ दीपदान संधी पाहात ॥ २९ ॥

तंव येणें प्रकारें जाणा ॥ प्रथम दिवसीं करिती जाली अंगना ॥ पासूनियां द्वितीयदिना ॥ यथानुक्रमें करीतसे ॥ ३० ॥

ताम्रपात्री सुकृतेंसी ॥ दीप ठेवीतसे सायासीं ॥ तया तळवटीं मृन्मय कुंभासीं ॥ भरून ठेवीतसे आदरें ॥ ३१ ॥

मग तयाची पूजा विधियुक्तें ॥ करून पाचारीं ब्राह्मणातें ॥ तयाची पूजा करून नमस्ते ॥ दक्षिणेसहीत अर्पीतसे ॥ ३२ ॥

श्रोते घेतील आशंका ऐसी ॥ केवि वदतां मृत्तिका

कुंभासी ॥ न चाले अवांतर धातूसी ॥ म्हणोनि मृण्मयासी वदलेती ॥ ३३ ॥

ऐसी आशंका श्रोते चतुर ॥ घेता ऐकाहो प्रत्युत्तर ॥ तरी दरिद्रव्यथा ऐसी थोर ॥ नसे निर्धार जगातें ॥ ३४ ॥

म्हणोनि ती सुशीला पाहीं ॥ दरिद्रव्याप्त निजगृहीं ॥ इतर धातूचा स्पर्श तोही नाहीं ॥ मृत्तिका पात्र या लागीं ॥ ३५ ॥

जयावरी कृपा श्रीची ॥ तयानें कीजे इतर धातूचीं ॥ यदर्थी वार्ता संशयाची ॥ मना नाणिजे श्रोतेहो ॥ ३६ ॥

ऐसें करितां व्रताचरण ॥ सुशीला नित्य करी आपण ॥ तंव सापत्न भाव मनीं कल्पून ॥ करीतसे विघ्नविमला पैं ॥ ३७ ॥

व्रत करीते नाम सुशीला ॥ नामासारखी करणी अचळा ॥ दुजीते नामाभिधान विमळा ॥ परी द्वेष कल्लोळा ह्रदयीं वसे ॥ ३८ ॥

एका पुरुषातें दोघी नारी ॥ पहातां दोघीची विपरीत परी ॥ एक मळातें त्यागी स्वीकारी ॥ हे खूण चतुरीं

जाणिजे ॥ ३९ ॥

असो ते विमळ नारी ॥ निशीदिनी टपतसे निर्धारी ॥ जेवी मूषका लागीं अंतरीं ॥ बिडाळकू जैसा ॥ ४० ॥

तैशापरी अहोरात्रीं ॥ जपतसे ते सुंदरी ॥ मत्सर धरून अंतरीं ॥ विघ्ना लागीं उदित ॥ ४१ ॥

पहा दुर्जनाचा स्वभावो ॥ दुजियातें करावा अपावो ॥ हा तरी सहजीं स्वभावो ॥ अंगप्रभावो दुर्जनाचा ॥ ४२ ॥

यालागीं श्रीरघुपती ॥ नको हे दुर्जनाची संगती ॥ तात्काळ भ्रमे सुमती ॥ लागतां संगती तयाच्या ॥ ४३ ॥

ऐसें जपत असतां विमळेस ॥ संधी साधी मासार्ध दिवस ॥ तंव सुशीला गेली स्नानास ॥ लक्षुनी दिवस एकादशी ॥ ४४ ॥

सिद्ध करूनि दीपपान ॥ मग गेली स्नानालागून ॥ तंव येरी काय करी कारण ॥ दीप मालवूनि विझविला ॥ ४५ ॥

दीपघृतातेंही उलंडिलें ॥ रिक्तपात्र करून ठेविले ॥

ऐसें करिता तये वेळें ॥ तो स्नानाहून आली सुशीला ॥ ४६ ॥

करूनि देव देवतार्चन ॥ म्हणे द्यावें आतां दीपदान ॥ नेत्रीं पाहे जें विलोकून ॥ तों घृतेसहीत विझोनी दीप गेला ॥ ४७ ॥

चित्तीं म्हणे मार्जार करणी ॥ करूनि गेलें येक्षणीं ॥ पुनः साहित्य मेळवूनीं ॥ करी कामिनी दीपदान ॥ ४८ ॥

ऐसें प्रत्यही होत जाय ॥ येरी म्हणे होतसे काय ॥ घडत असे जो पर्याय ॥ विदित नव्हे तयेतें ॥ ४९ ॥

ऐशिया परी ते विमळा पाहीं ॥ कर्म करूनि विचरे स्वगृहीं ॥ सुशीळा खेद करी ह्रदयीं ॥ म्हणे कवण अपायीं प्रवर्तला ॥ ५० ॥

नेणो जन्मांतरीचा ठेवा ॥ मज कैचें घडेल पुण्य देवा ॥ हे जनार्दना माधवा ॥ कवण उपाया करूं मी ॥ ५१ ॥

ऐसी चिंता करितां ते कामिनी ॥ जपत बैसली ते क्षणीं ॥ तों नित्य प्रकार करणी ॥ करून गेली विमळा ती ॥ ५२ ॥

परी तयां दिनीं काय केलें ॥ विमलेनें मनीं जाणितलें ॥ म्हणोन घृत पात्रीं भरून ठेविलें ॥ उर्वरीत स्नेह दीपाचें ॥ ५३ ॥

हें पाहून आपुले नयनीं ॥ खेद करिती झाली मनीं ॥ म्हणें देवदेवा चक्रपाणि ॥ यासीं यालागुनी करूं काय ॥ ५४ ॥

वृत्तांत सांगितला भ्रतारासीं ॥ तो तंव विहित धर्म नोहे मजसी ॥ सवती मत्सर म्हणोन तयासीं ॥ निजमानसीं क्रोधें भरलें ॥ ५५ ॥

ऐसें विचारून अंतरीं ॥ कांहीं न बोले ते सुंदरी ॥ कुसमुसुनि राहे अंतरीं ॥ गृहाचारी वर्ततसे ॥ ५६ ॥

येणें प्रकारें करून ॥ व्रत करिती जाली संपूर्ण ॥ करूनियां उद्यापन जाण ॥ ब्राह्मण संतर्पण यथाविधी ॥ ५७ ॥

संपूर्ण एकमास भरतां ॥ काय प्रवर्तली कथा ॥ तिघे पुत्र विमळेसीं असतां ॥ मृत्युपंथाते गेले ॥ ५८ ॥

एकामागें एक ॥ मरण पावले हो सम्यक ॥ नेत्र जाऊनि अंधत्व देख ॥ तेही देख पावली ॥ ५९ ॥

नेत्री न दिसेचि कांहीं ॥ चाचपीत वावरे स्वगृहीं ॥ मग आठवीतसे ह्रदयीं ॥ शेषशायी परमात्मा ॥ ६० ॥

ह्रदयीं परम गहिवरोन ॥ मग आठवी पूर्व कर्मातें जाण ॥ हे भगवान जनार्दन ॥ जाणून कर्म हें केलें ॥ ६१ ॥

मी तव अपराधी बहुत ॥ पुढें केवी होय माझा प्रांत ॥ म्हणोनि तळमळे ह्रदयांत ॥ निशिदिवस तळमळी ॥ ६२ ॥

आधीं कर्म जैसें करावें ॥ तात्काळ लागे तें भोगावें ॥ पुढें यमयातना ते स्वभावें ॥ न चुके कल्पांत काळीं ॥ ६३ ॥

यालागीं विवेकें करूनि ॥ सावध वर्तावें हो जनी ॥ पुढें अवघड यमजाचणी ॥ नरक विंदानीं सुटेना ॥ ६४ ॥

व्यासादिक महाऋषी ॥ वाल्मीकादी तपोराशी ॥ पुराणें करून ठेविली जगासी ॥ तरणोपायासी निर्धारें ॥ ६५ ॥

परी जग हें अलगट मोठें ॥ कोणी न जाती त्या वाटे ॥ म्हणोनि दुःखी होती अचाटे ॥ जातात वाटे यमपुराच्या ॥ ६६ ॥

असो ते विमळा सुंदरी ॥ दिवसनिशीं खेदकरी ॥ म्हणे धन्यतेची नारी ॥ भ्रतार आज्ञेनें वर्तत ॥ ६७ ॥

मी तंव अभागी मोठी ॥ परम दैवाची करंटी ॥ नेणें कांहीं हातवटी ॥ व्रतदानें उद्यापनें ॥ ६८ ॥

ऐसी करितां चिंता ॥ कालांतरें ती मृत्युपंथा ॥ पावती जाली ते तत्वता ॥ यमव्यथा दारुण ॥ ६९ ॥

यमदूतीं नेलें मारीत ॥ चित्रगुप्तें काढिलें लिखित ॥ मग ते जाचणीं नित्यानित्य ॥ भोगवीत तियेतें ॥ ७० ॥

दारुण ते यमयातना ॥ शास्त्रें बोलिली प्रकार नाना ॥ तदनुसार ते कमिनी ॥ भोगिती जाली दुःखातें ॥ ७१ ॥

आठवून आपुले आचरण ॥ अट्टहास्ये रडे आपण ॥ परी तेथें सोडविता कवण ॥ असे जाण सांग पा ॥ ७२ ॥

सोयरे आणि आप्त पाहीं ॥ हे तंव राहाती ठायींचे ठायीं ॥ परी तेथीची न जाणती सोई ॥ पाडिती अपाई प्राणिया ॥ ७३ ॥

मिळोन आप्तवर्ग सकळ ॥ घृत शर्करेचे मारिती

कवळ ॥ म्हणती उत्तम प्रकारे काळ ॥ क्रमिला याचिया संगती ॥ ७४ ॥

सर्वसुखाचे सांगाती ॥ शेवटी कोणी कामा न येती ॥ ही तंव जनाची असे प्रवृत्ती ॥ न जाणति हिताहित ॥ ७५ ॥

कोणीही म्हणती ऐसे ॥ परलोकीं सार्थक करी हव्यासे ॥ ऐशिया लागी उपदेशे ॥ न सांगती कोणीही ॥ ७६ ॥

जरी ऐसा करिती उपदेश ॥ मग सकळही लागती पुण्यपंथास ॥ तंव यमपुरी पडतां वोस ॥ म्हणोनि पुण्यमार्गास नेणती ॥ ७७ ॥

असो ते विमला सुंदरी ॥ यातना भोगूनियां भारी ॥ मग टाकिली नरक अघोरीं ॥ कुंभपाकीं तियेते ॥ ७८ ॥

ऐशी ते कुंभपाकीं पडत ॥ रौरवाते झाली भोग प्राप्त ॥ क्रमितां वर्षे गणित ॥ छत्तिस सहस्र गर्जना पैं ॥ ७९ ॥

दीपनिर्नाशनात्सद्यो विमला दुःखिताभवत् ॥ तस्याः पुत्रतयं नष्टमधत्वं समुपागता ॥ ५ ॥

अदीर्घे तैव कालेन निधनं समुपागता ॥
त्रिंशद्वर्षसहस्त्रापि रौरवे नरकेस्थिता ॥ ६ ॥

मग जन्मा घातली ग्रामसूकरी ॥ मग व्याघ्र जन्मा दुसरी ॥ श्रृगाळ जन्म तीसरी ॥ वडवाघळी चौथीं पैं ॥ ८० ॥

पुनः मानवदेह पावोन ॥ निशादी जाली ते कामिन ॥ तेथें हिंसा कर्म दारुण ॥ घडलें जाण तिये तें ॥ ८१ ॥

मग मीन होऊनियां जळीं ॥ थिल्लरोदकांत तळमळी ॥ तयावरी ते घार जाली ॥ आकाश पोकळी फिरत ॥ ८२ ॥

ऐसे जन्म भोग भोगितां ॥ परम कष्ट जाले तत्वतां ॥ नको नको हे जन्मव्यथा ॥ श्रीरघुनाथा घडूं देऊं ॥ ८३ ॥

यापरी दीप विध्वंसन ॥ तेंचि कथिलें होय कारण ॥ ऐका पुढील कथन ॥ सुशीलेचें कैसें तें ॥ ८४ ॥

काळांतरें करून जाण ॥ तेही पावली असे मरण ॥ विष्णुदूतीं विमानीं वाहून ॥ नेलें पैं तियेतें ॥ ८५ ॥

एवं तया विमलयादीपप्रशमनात्फलं ॥ प्राप्तं दुःखं

वियोगेन सुशीला सद्गतिंगता ॥ ७ ॥

नारी वापि नरोवापि यः करोति मलिम्लुचे ॥ स्नानं वा दीपकं वापि विप्रसेवनमेवच ॥ ८ ॥

यालागीं पुरुष अथवा नारी ॥ व्रत कीजे हो निर्धारी ॥ इये कलियुगा माझारी ॥ उपाव श्रीहरी पैं केला ॥ ८६ ॥

परम दयाळू दीननाथ ॥ ब्रीद सत्य करावया व्रत ॥ होऊनियां कृपावंत ॥ आदरें सांगत लक्ष्मीसी ॥ ८७ ॥

एवं दोघी स्त्रियांची दोन गती ॥ एक सद्गती एक अधोगती ॥ परी शांकली तें कवणगती ॥ ऐकिजे पुढती श्रोतेजन ॥ ८८ ॥

दोघी स्त्रिया पावतां निधन ॥ चित्तीं उदास तो ब्राह्मण ॥ तिघे पुत्र पावले मरण ॥ पुढें संतान नसेची ॥ ८९ ॥

म्हणोन तळमळ मानसीं ॥ रात्रंदिवस कुसुमुसी ॥ हे नवसंगती संगदोषीं ॥ घडे अनायासीं प्राणिया ॥ ९० ॥

पातक जें कायिक वाचिक ॥ तैसेंचि हें सांसर्गिक ॥ शास्त्राधार असे देख ॥ म्हणोन पातक बोलिजे ॥ ९१

॥

यापरी कष्टी तो ब्राह्मण ॥ पावता झाला परम शीण ॥ काळांतरे पावला मरण ॥ नेला बांधून यमदूती ॥ ९२ ॥

पहिलाच ब्राह्मण पुण्यशीळ ॥ दानधर्म आचारशीळ ॥ यालागीं तयाते केवळ ॥ नसे हळहळ जाचणीची ॥ ९३ ॥

परी विष्णुलोकीं सुशीळेतें ॥ नारदें कथिलें तियेतें ॥ तिणें प्रार्थून विष्णुतें ॥ करुणामृत वचनें करूनी ॥ ९४ ॥

म्हणे देवदेवा ह्रषीकेशी ॥ तूं तव कृपाळू होसी ॥ तरी कोण दशा भ्रताराशीं ॥ निजमानसीं विचारा ॥ ९५ ॥

मग संतुष्ट होऊन नारायण ॥ तया आणवी धाडून विमान ॥ मग उभयतां दोघेजण ॥ वैकुंठ भुवना पावली ते ॥ ९६ ॥

संस्थाप्य संततिं भूमौ वैकुंठ निलयंगता ॥ सायुज्यं पति संयुक्ता पुनरावृत्ति दुर्लभं ॥ ९॥

याप्रकारें श्लोकार्थ बरवा ॥ श्रोति आदरें परिसावा ॥

न्यून पूर्ण क्षमा करावा ॥ दोष न ठेवावा मजलागीं ॥ ९७ ॥

पाहूनियां संमतातें ॥ अर्थान्वय वर्णिला येथें ॥ प्राकृत भाषा म्हणोन तीतें ॥ अव्हेर संतीं न करावा ॥ ९८ ॥

समर्था केला पाहुणेर बरवा ॥ म्हणोन दुर्बळातें अव्हेरावा ॥ हें केवी उचित थोरिवा ॥ विहित भावा न दिसे ॥ ९९ ॥

स्वस्ति श्रीमलमास महात्म ग्रंथ ॥ पद्मपुराणींचें संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ सप्तमोऽध्याय गोड हा ॥ ७ ॥ ओव्या ॥ ९९ श्लोक ॥ ९ ॥

॥ इति सप्तमोऽध्यायः ॥

-------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय आठवा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीरामचंद्राय नमः ॥ जय रुक्मिणीवरा ॥ पांडुरंगा दीनोद्धारा ॥ कृपासागरा करुणाकरा ॥ वेदोद्धारा दीनबंधो ॥ १ ॥

अनाथनाथा दयासिंधो ॥ करुणासागरा दीनबंधो ॥

कृपाकटाक्षें अवबोधो ॥ ग्रंथारंभीं वेधो लागो पैं ॥ २ ॥

श्रीगुरुवाच ॥ भगवन् भवतापौघहारिन्नानंदविग्रह ॥ मलमासेत्वशक्तानां स्नानादौ किं शुभं नृणां ॥ १ ॥

ऐका आतां श्रोतेजन ॥ लक्ष्मीनारायण संवाद जाण ॥ जे करिती समग्र कथन ॥ होय निरसन महापाप ॥ ३ ॥

लक्ष्मी वदे हो पुरुषोत्तमा ॥ अगाध तुमचा महिमा ॥ जो ऐकतां कर्माकर्मा ॥ पासावमुक्त होती ॥ ४ ॥

तरी आतां प्रश्न एक ॥ स्वामीराया असे देख ॥ शरीर जालिया अशक्त ॥ न घडे देख स्नानविधी ॥ ५ ॥

जयातें मुख्य नाहीं स्नान ॥ तयानें काय करावें दान ॥ तरी निर्फळ तो जन्मोन ॥ भूभार केला तेणें पैं ॥ ६ ॥

तरी ऐेसियाची कवण गती ॥ मज निवेदावें कृपामूर्ति ॥ जेणें तरणोपाय प्राणियाप्रती ॥ घडे सद्गती अनयासें ॥ ७ ॥

श्रीकृष्ण उवाच ॥ श्रृणुसाध्वि प्रवक्ष्यामि लोकानुग्रहकारिणि ॥ सम्यक् प्रश्नः कृतः सर्वलोकोपकृतिकारकः ॥ २ ॥

ऐक साध्वी वचनातें ॥ तुवां प्रश्न केला निरुतें ॥ तो तंव सर्वया जगातें ॥ परम उपकारातें जाणपां ॥ ८ ॥

तरी शक्ती नाहीं जया शरीरीं ॥ आणि धन तेंही नसे पदरीं ॥ इच्छा ते उद्भवलीसे अंतरीं ॥ करावें परोपरी व्रतातें ॥ ९ ॥

ऐसें अंतर जयाचें द्रवलें ॥ नारी अथवा पुरुष भले ॥ तयानें पाहिजे काय केलें ॥ तरी ऐक वहिले भामिनी ॥ १० ॥

मुक्त क्रिया जयाची पाहीं ॥ तो विचरो भलतिये ठायीं ॥ तैसीच हेहि नवाई ॥ ठाईंचे ठायीं तटस्थ ॥ ११ ॥

यालागीं सांगतों ऐकें ॥ भजन करावें परम निकें ॥ भजनावीण आणीक देखें ॥ सार्थक आणिक नसेची ॥ १२ ॥

भजनें तरले महाज्ञानी ॥ तपस्वियांमाजी शिरोमणी ॥ महाराज तो नारदमुनी ॥ नामस्मरणीं रत सदां ॥ १३ ॥

नामजपें कैलासनायक ॥ हळाहळ जालें शांत तात्काळिक ॥ ऋषीमाजी पुण्य श्लोक ॥ वाल्मिकि देख तरलासे ॥ १४ ॥

नामस्मरणाचा प्रादुर्भावो ॥ शतकोटी प्रबंध पाहाहो ॥ त्रैलोकींचा समुदावो ॥ मान्य केलें तयालागीं ॥ १५ ॥

यालागीं सुंदरी पाहीं ॥ नामस्मरणाविण सार्थक नाहीं ॥ न पडावें आणिक प्रवाहीं ॥ शक्ती नाहीं म्हणोनिया ॥ १६ ॥

अपि कर्मफलौधानां दाहकं भवतारकं ॥ अशक्तानां विशेषेण मलमासे विशेषतः ॥ ३ ॥

हरेर्नाम हरेर्नाम कीर्तनं कथितं बुधैः ॥ येनकेन प्रकारेण सर्व कामाप्तिसाधनं ॥ ४ ॥

शक्ती नसे जयाचे देहीं ॥ तरी भजन करावें तेंही ॥ सदां सर्व काळ ह्रदयीं ॥ अच्युतचिंतन करावे ॥ १७ ॥

कोटि गोदानाचें फळ पाहीं ॥ जन्मवरी तीर्थ केलें नाहीं ॥ अपार दाने दिधली स्वगृहीं ॥ परी तुळना नाहीं नामासीं ॥ १८ ॥

कृष्णकृष्णेति कृष्णेति प्रत्यहं वक्तिवैकलौ ॥ नित्यं यज्ञायुतं पुण्यं तीर्थकोटिफलं लभेत् ॥ ५ ॥

कोटि यज्ञाचें जें फल ॥ तें नामें पाविजे तात्काळ ॥ ऐसे हें नाम सुफळ ॥ कोणी न भजे तयातें ॥ १९ ॥

फुकाचें मुखीं नाम घेतां ॥ काय वेंचे हो तत्वता ॥ अवघा वेळ भांडता ॥ उसंत तत्वता नसेची ॥ २० ॥

परी यासाठीं घडीमाजी एक ॥ पळ अथवा निमिष देख ॥ आठवितां यदुनायक ॥ याविण आणिक नसे कांहीं ॥ २१ ॥

म्हणोन अशक्त पुरुषातें पाहीं ॥ हरि भजनावीण कांहीं ॥ दुसरें सार्थक नाहीं ॥ न पडावें प्रवाही आणिक ॥ २२ ॥

जरीं जाले पापाचे डोंगर ॥ नारी हो अथवा नर ॥ पाप क्षाळणातें आन विचार ॥ नाम निर्धार बोलिला असे ॥ २३ ॥

या कलियुगीं जाण लतिके ॥ घडतील अनंत पातकें ॥ स्त्रीहत्या बाळहत्या देखें ॥ भ्रूणहत्या महापाप ॥ २४ ॥

मात्रागमनी मातृहत्यारी ॥ भगिनीश्रुषागमनी निर्धारी ॥ शेखीं तयाचा जो वध करी ॥ पापें अघोरिया नामें ॥ २५ ॥

गुरुहत्या पितृहत्या जाण ॥ गोहत्या अभिलाषी जो धन ॥ मांसाहारी मद्यप्राशन ॥ निंद्य जाण विप्रासी ॥

२६ ॥

हीं महत्पापें सांगितलीं ॥ क्षुद्रपापें नाहीं गणिलीं ॥ नामें नाश होती सकळी ॥ जेवी होळी तृणाची ॥ २७ ॥

एते चान्येच पापिष्ठा महापापमृताश्चये ॥ सर्वपापैः प्रमुच्यंते कृष्णरामेतिकिर्तनात् ॥ ६॥

आपुलेनि न करवे नामोच्चार ॥ तरी दुजियातें करावा सोपस्कार ॥ अथवा पुराण श्रवणीं क्षणभर ॥ जाऊनियां बैसावें ॥ २८ ॥

अवघा वेळ संसार धंदा करितां ॥ फुरसतची नाहीं तत्वतां ॥ तथापी क्षण एक पाहतां ॥ अवकाश कीजे सज्जनीं ॥ २९ ॥

अमोल्य नरदेहाची प्राप्ती ॥ कोटि वेंचितां नये एक घटी ॥ आयुष्य जातसे उठाउठी ॥ म्हणोनि पुण्यासांठी पैं कीजे ॥ ३० ॥

घोरे कलियुगे प्राप्ते सर्व धर्म विवर्जिते ॥ हरिकीर्तनमेवात्र संपूर्ण फलदायकं ॥ ७ ॥

हरेर्नामैव नामैव नामैव मम जीवनं ॥ कलौनास्त्येव

नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा ॥ ८ ॥

यदर्थी इतिहास बरवा ॥ श्रोता विमळ परिसावा ॥
तयायोगें जगाते सर्वा ॥ उपरती घडे तात्काळ ॥ ३१
॥

उत्तरदेशीं नर्मदा तीरीं ॥ भूसुर नामें एक नगरी ॥
तेथील एक ब्राह्मण गृहाचारी ॥ असे अधिकारी
ज्योतिषी ॥ ३२ ॥

कांता तयाची पाहतां ॥ नामें सावित्री परमपतिव्रता ॥
अवघा वेळ संसार धंदा करितां ॥ नाम तत्वता न सोडी
॥ ३३ ॥

हे कृष्ण गोविंदा गोपाळा ॥ मुखीं सर्वदां हाचि चाळा
॥ पती तिचा परम धनागळा ॥ असे आगळा कृपण
तो ॥ ३४ ॥

पोटा न खाय पुरतें अन्न ॥ सांचिलेंची सांची तसे धन ॥
कोणी दिधलिया वस्त्र नूतन ॥ टाकी विकून धनलोभें
॥ ३५ ॥

ऐसें धन संग्रहितां पाही ॥ सप्त कुंभ सांचले स्वगृहीं ॥
सुवर्ण नाणें असे तेंही ॥ धन पाहीं संचितार्थ ॥ ३६ ॥

कांतेसी धड वस्त्रे नसें ॥ पोटा अन्न मोजून देतसे ॥ स्वयें एक भुक्त करीतसे ॥ धन गोडसरसें न पाहे ॥ ३७ ॥

या रीतीं क्रमीतसें काळ ॥ पोटीं नसे एकही बाळ ॥ कांता सदा करी तळमळ ॥ म्हणे धन हें निर्फळ असोनी ॥ ३८ ॥

नेणें कधी कुळधर्म कुळाचार ॥ तीर्थ पर्वणी सणवार ॥ आसक्त सदां धनाचार ॥ नेणें प्रकार आणिकही ॥ ३९ ॥

काय करावें ऐसियास ॥ नेणें कधीही सुग्रास ॥ ऐसियाचे देवें संगतीस ॥ कां पां घातलें मजलागीं ॥ ४० ॥

स्वगृही इतुकी आपदा ॥ परी पतीते न मागे कदां ॥ नामही न सांडी सर्वदां ॥ गोविंदा गोपाळा माधवा ॥ ४१ ॥

ऐसें वर्ततां संसारीं ॥ तंव वर्तली नवल परी ॥ ब्राह्मण गेलासें बाहेरी ॥ कृषीवळीते आणावया ॥ ४२ ॥

तयाचा नित्य हाचि व्यापार ॥ पंचांग घेऊनि बरोबर ॥ सदांचा तो रानभर ॥ जाय निर्धार रानातें ॥ ४३ ॥

ऐसें असतां एके अवसरीं ॥ एक शूद्र दुजिये ग्रामाधिकारी ॥ मध्यान्ह समयीं पातला घरीं ॥ म्हणे आहेत घरीं भट्टबाबा ॥ ४४ ॥

तंव कांता आली धावत ॥ कोण म्हणूनि पुसत ॥ येरु वदे मी शूद्र निश्चित ॥ आमंत्रणार्थे पातलों ॥ ४५ ॥

आज माझिये ग्रामीं ॥ ब्राह्मणभोजन आहे धामीं ॥ ऐसें म्हणोन पातलों मीं ॥ द्यावया आमंत्रण ॥ ४६ ॥

तरी बावा आलिया बाहेरूनी ॥ सत्वर धाडा माझिये सदनीं ॥ विलंब न लाविजे तें क्षणी ॥ येता क्षणी धाडिजे ॥ ४७ ॥

ऐसे सांगोनि तो गेला ॥ तंव दिवस संपूर्ण माध्यान्ह झाला ॥ तों सवेंची ब्राह्मणही पातला ॥ कृषीभारा शिरावरी ॥ ४८ ॥

तो भारा आपटिला तात्काळी ॥ उसासा बैसला स्थळीं ॥ कांतेसि म्हणे ते वेळी ॥ उदक आणी प्राशना ॥ ४९ ॥

येरी उदक न देतां घडी ॥ निरोप सांगतसे तातडी ॥ म्हणें ऐका हो स्वामी परवडी ॥ शूद्र याघडीं पातलासे ॥ ५० ॥

ग्राम तयाचा कोश दोन ॥ तुम्हां देऊन गेला आमंत्रण ॥ म्हणे सत्वर द्या पाठवून ॥ खोळंबतील ब्राह्मण भोजनासी ॥ ५१ ॥

ऐसी ऐकतांची मात ॥ तैसाचि उठिला खडबडीत ॥ म्हणे पंचपात्र देई त्वरित ॥ जातो निश्चित धावूनी ॥ ५२ ॥

येरी म्हणें उदक स्वीकारा ॥ तो म्हणें मार्गी असें झरा ॥ मज जाण्याची असें त्वरा ॥ उदक मार्गी स्वीकारीन ॥ ५३ ॥

ऐसें ऐकतां वचन गांठा ॥ येरी पिटीतसे लल्लाटा ॥ म्हणे अहो कटकटा ॥ केवि हा वांटा पापाचा ॥ ५४ ॥

इतुकें धन असोनि गृहीं ॥ परी नाहीं याचिया दैवीं ॥ अहारें शेषशायी ॥ कैसी नवाई हे केली ॥ ५५ ॥

कां न सरे हे माझा भोग ॥ याचें पावल्यें मी अर्धांग ॥ तव पापियामाजी सांग ॥ शिरोमणी असें हा ॥ ५६ ॥

ऐसें म्हणोनि ते अवसरीं ॥ शर्करामिश्रित दुग्ध झारी ॥ आणून ठेविली झडकरी ॥ तया निकटीं तात्काळिक ॥ ५७ ॥

म्हणे हे उदकाची झारी ॥ घेऊनि जाइजे बरोबरी ॥
तृषा लागतां मार्गावरी ॥ प्राशन करीं दयाळा ॥ ५८ ॥

निकें म्हणोनी वरीं घेतलें ॥ तत्क्षणीं प्राशन नाहीं केलें ॥ मार्ग झडकरोनि चाले ॥ विलंब जाला म्हणोनि ॥ ५९ ॥

चालतां क्रमितसे पंथ ॥ घर्म दाटलासे अतोत ॥ धापा देऊनी धांवत ॥ लगबग बहुत भोजनाची ॥ ६० ॥

पाहाहो मिष्टान्नासाठीं ॥ विप्रा लागी आवड मोठी ॥
परान्नातें लाळघोटी ॥ टपत बैसे बक जैसा ॥ ६१ ॥

आलियाही आमंत्रण ॥ जीवा उल्हास मानी पूर्ण ॥
ऐसें तें ब्राह्मणाचें जिणें ॥ यालागीं घडोन जाले तें ॥ ६२ ॥

असो मार्गी जातां ब्राह्मण ॥ वसंत ऋतु तापले उष्ण ॥
जवळी असतां जीवन ॥ प्राण जावो परी न सेवी ॥ ६३ ॥

तृषेनें जाहलासे व्याकुळ ॥ म्हणे उदक असे अळुमाळु ॥ सभोंवते निरखितसें सकळ ॥ सावली पैं न देखे तेथे ॥ ६४ ॥

मग एक वारूळ देखिलें नयनीं ॥ तयाची साउली पाहुनी ॥ नावेक स्थिरावला तये स्थानीं ॥ उदक झारी काढीत ॥ ६५ ॥

तृषेची लगबग मोठी ॥ म्हणोन पाहिलें नाहीं दृष्टी ॥ तैसेंचि लावीतसे होटीं ॥ गौल्यता दृष्टी देखत ॥ ६६ ॥

मग प्राशन करितां जाण ॥ तैसेंच तोंडींचे हातीं घेऊन ॥ म्हणे हे शिव भगवान ॥ बुडविलें रांडेनें सर्वही ॥ ६७ ॥

यावरी ते दुग्ध झारी ॥ वोतिली वारुळा माझारी ॥ चांडाळ तो प्राशन न करी ॥ केली परी असी तेणें ॥ ६८ ॥

परी नामस्मरणाचें महिमान ॥ कांता नित्य करीतसे आपण ॥ तयाचेनि योगें करूनि जाण ॥ फिरलें अदृष्ट तयाचें ॥ ६९ ॥

एका फुस्करा सरसी ध्वनी ॥ निघती झाली तत्क्षणीं ॥ येरू दचकला अंतःकरणीं ॥ म्हणे हे तो करणी अघटित ॥ ७० ॥

तया वारुळामाजी देख ॥ महा भुजंग असे भयानक ॥ तप्तशरीर पसरिलें मुख ॥ उष्णें देख संतप्त जालासे

॥ ७१ ॥

तंव त्या वारुळामाजी ॥ दुग्ध धार पडली मुखामाजी ॥ घटघटोन प्राशन करितां जी ॥ मनामाजी संतोषला ॥ ७२ ॥

तात्काळ निघाला बाहेरी ॥ मनुष्यरूपें ते अवसरीं ॥ फणा उभारूनियां शिरीं ॥ बोले त्या अवसरी ब्राह्मणातें ॥ ७३ ॥

म्हणे कृपावंता तूं कोण ॥ पर उपकारिया सगुण ॥ संतुष्ट केलें मजलागून ॥ इये काळीं स्वामिराजा ॥ ७४ ॥

म्हणे इच्छा असेल मानसीं ॥ तोंचि मागिजे आम्हां पासीं ॥ संकोच न धरावा मानसीं ॥ ब्रह्मदेवा महाराजा ॥ ७५ ॥

ऐसें तयाचें उत्तर ऐकूनी ॥ येरू परम दचकला मनीं ॥ म्हणे कवण बोले मनुष्यवाणी ॥ मागे परतुनि पाहात ॥ ७६ ॥

मागें परतुनी पाहे तयातें ॥ तंव पंचफणा मस्तका वरुतें ॥ मनुष्यवाणी बोले त्यातें ॥ ऐका श्रोते हो ॥ ७७ ॥

म्हणे आपण असा कवण ॥ मस्तकी फणा दारुण जाण ॥ बोलता मनुष्या ऐसें वचन ॥ कीजे निवेदन मजलागीं ॥ ७८ ॥

तंव बोलता झाला ईश ॥ म्हणे मी तंव असे शेष ॥ संतुष्ट जालें मानस ॥ दुग्धप्राशनें तुझिया ॥ ७९ ॥

यालागीं झालोंसे प्रसन्न ॥ इच्छा असेल तें मागें वरदान ॥ येरू करि हास्यवदन ॥ म्हणे हें तो विंदान कांतेचें ॥ ८० ॥

ऐकें महाराजा ये अवसरी ॥ कांता आमुची असे घरीं ॥ ती तें पुसोन झडकरी ॥ येतों माघारी परतोनी ॥ ८१ ॥

तियेची इच्छा असे काय ॥ हेतो मज ठाउके न होय ॥ इतका केला जो उपाय ॥ तो पर्याय तियेचा असे पैं ॥ ८२ ॥

मी परतून मागुता येतां ॥ आपण स्थिरावें समर्था ॥ येरु तथास्तु म्हणोन तत्वता ॥ झाला परतता ब्राह्मण ॥ ८३ ॥

कैची संध्या कैचें स्नान ॥ तेथें कैचें भोजन पान ॥ दिधलें सोडून आमंत्रण ॥ आला परतून निजगृहीं ॥

८४ ॥

धांवत पळत लगबगें ॥ गृहीं पातला लाग वेगें ॥ द्वारदेशींहुनि म्हणें कोठे गे ॥ घरबुडवणी पापिष्ठे ॥ ८५ ॥

ऐसा पति शब्द ऐकतां ॥ धांवत आली पतिव्रता ॥ चरणावर ठेवून माथा ॥ अपराध समर्था क्षमा करीं ॥ ८६ ॥

नमना ऐसे वोढण ॥ दुजें न देखों पै जाण ॥ तात्कालची शांत होऊन ॥ क्रोध निघोन पै गेला ॥ ८७ ॥

मग समूळ वृत्तांतातें ॥ सांगता झाला तियेतें ॥ तुवां दुग्ध झारी निरुते ॥ दिधली प्राशना मजलागीं ॥ ८८ ॥

उदक म्हणूनि पय दिले ॥ क्रोधे मी तो नसो प्राशिले ॥ म्हणोंनि वारुळीं उलंडिलें ॥ तें प्राशिलें भुजंगें ॥ ८९ ॥

तात्काळ मनुष्य रूप धरून ॥ प्रसन्न झाला मजलागून ॥ पुसावया तुज कारणें ॥ आलों धांवून तात्काळीं ॥ ९० ॥

तरी काय इच्छा असेल मानसीं ॥ तेंचि माग तूं तयासीं

॥ ऐकून ऐसिया वचनासी ॥ येरी मानसीं चाकाटली ॥ ९१ ॥

म्हणे नवल केवढें जाहलें ॥ आमंत्रणें सोडिलें ॥ बोलतसे ऐसिया बोलें ॥ सत्यमिथ्या हरि जने ॥ ९२ ॥

विचार करू निजमनी ॥ म्हणे इतुकेंची मागिजे तया लागुनीं ॥ जें दिधलें असे तेंची देऊनीं ॥ मनोरथ पुरवावे ॥ ९३ ॥

इतुकेंचि मागा स्वामी ॥ आणीक नसे कांहीं उर्मी ॥ तथास्तु म्हणोन स्वआगमीं ॥ परता जाला तात्काळ ॥ ९४ ॥

येऊनि नमिलें शेषराजा ॥ म्हणे ऐकें वचन महाराजा ॥ कांतेचे मानसीं जे चोजा ॥ श्रवण करीं आदरेंसी ॥ ९५ ॥

ती बोलें दिधलें तेंचि द्यावें ॥ आणिक न मागूं जिवें भावें ॥ समर्थे हेंची पुरवावें ॥ मनोभावें दयाळुवा ॥ ९६ ॥

ऐकूनि तयाचें उत्तर ॥ शेष वदे कर्म अघोर ॥ कांता तुझी परम चतुर ॥ मागितला वर नेटका ॥ ९७ ॥

तें तव नसे तुझिये कपाळीं ॥ परी देणें घडे ये काळीं ॥
तथास्तु म्हणून ते वेळीं ॥ गुप्त झाला भुजंग ॥ ९८ ॥

ब्राह्मण परतला तेथूनी ॥ मार्गी विचार करीतसे मनीं ॥
म्हणें आमंत्रणें दिधली सोडूनी ॥ संधी अस्तमानी होऊं
आली ॥ ९९ ॥

तरी आजी सुदीन पर्वकाळ ॥ शनिप्रदोष परममंगळ ॥
तरी ग्रामवासी द्विज सकळ ॥ भोजनालागीं पाचारूं ॥
१०० ॥

म्हणें मिष्टान्न करुन बरवें ॥ भूदेवातें तोषवावें ॥
आपणही यथेष्ट भक्षावें ॥ मन संतोषवावें कांतेचें ॥ १
॥

ऐसा विचार करूनि विचार ॥ गृहीं पातला सत्वर ॥
परम हर्षे होऊन निर्भर ॥ बोले उत्तर स्त्रियेसीं ॥ २ ॥

म्हणें तुवां सांगितलीं जी रीती ॥ आम्हीं मागितलें
भुजंगाप्रती ॥ दिधलें म्हणोन त्रिवार वचनोक्ती ॥
वदुनि गुप्त जाहला तो ॥ ३ ॥

तरीं ऐकें एक विचार ॥ आम्हां क्षुधेनें पीडिलें फार ॥
आजी प्रदोष आणि मंदवार ॥ पर्व अपार बोलिजे ॥ ४
॥

यालागीं ग्रामवासीं ब्राह्मण ॥ तया देऊनि येतो आमंत्रण ॥ तुवां षड्रस अन्न निर्मून ॥ करि पक्वान्न यथास्थित ॥ ५ ॥

सामोग्री आणितों या अवसरीं ॥ म्हणोनि पातला गृहांतरीं ॥ उकरूनियां द्रव्याची घागरी ॥ घेतलें करी सुवर्ण नाणें पांच ॥ ६ ॥

मग शर्करेसहीत सामोग्री ॥ सर्वही बांधी पदरीं ॥ आमंत्रणें करून विप्रा घरीं ॥ आला झडकरी मागुतां ॥ ७ ॥

ऐसें होतां ते अवसरी ॥ कांतेचा हर्ष न माये अंतरीं ॥ म्हणे संतुष्ट जाला मुरारी ॥ उपजली अंतरी सद्वासना ॥ ८ ॥

मग लगबगें पाकसिद्धी ॥ करिती झाली ते गुणनिधी ॥ षड्रस अन्नें नानाविधी ॥ सिद्ध करूनि ठेवीत ॥ ९ ॥

मग भ्रतारातें विनवी सूंदरा ॥ म्हणे सत्वर ब्राह्मणातें पाचारा ॥ विलंब जालासे तुम्हां तें खरा ॥ होईल एकादा पित्तक्षोभ ॥ १० ॥

एक याम भरली निशी ॥ सत्वर बैसावें भोजनासी ॥ येरू परम हर्षयुक्त मानसीं ॥ ब्राह्मणांसी पाचारिलें ॥

११ ॥

अर्घ्यपाद्यादी पूजन ॥ करितां झाला आपण ॥ देऊन सुमन आणि चंदन ॥ रंगमाळिका घातली ॥ १२ ॥

विस्तीर्ण मांडली कर्दळी पात्रें ॥ दीप उजळोनियां पवित्रें ॥ कणारांगोळी निरांजन पात्रें ॥ प्रतिपात्रें ठेविलासे ॥ १३ ॥

मग सरसाऊनि अचळातें ॥ वाढीतसे पक्वान्नातें ॥ जोडूनियां बद्ध हस्तातें ॥ ब्राह्मणाते वाढीतसे ॥ १४ ॥

म्हणतीं ब्राह्मण नवलकायी ॥ कधींच ऐसें देखिलें नाहीं ॥ अप्रुप आजिची नवाई ॥ भाग्य आमुचें उदेलें ॥ १५ ॥

असो भोजन होऊन निवाडे ॥ मग अर्पून त्रयोदशगुणी विडे ॥ दक्षिणा देतसे अति कोडें ॥ सुवर्ण नाणें प्रत्येका एक ॥ १६ ॥

कांतेनेंही भोजन सारिलें ॥ म्हणे आजि परम भाग्य उदेलें ॥ सावकाश भोजन झालें ॥ भूसुर आलें गृहासी ॥ १७ ॥

मग तो ब्राह्मण धनसंचय ॥ सत्कारणीं करिता झाला

व्यय ॥ समयीं अतित आलिया पाहे ॥ नव्हे विन्मुख तयातें ॥ १८ ॥

ऐसी धरितां सद्वासना ॥ पापातें जालीसे क्षाळणा ॥ झाली पुण्याची गणना ॥ पतिव्रता अंगना तयाची ॥ १९ ॥

कालांतरें करूनि उभयतां ॥ पावतीं जालीं मोक्षपंथा ॥ ऐशी नामस्मरणाची वार्ता ॥ तुम्हां सर्वथा निवेदिली ॥ २० ॥

कथा हे गोड ऐकिली ॥ म्हणोनि दृष्टांतीं असे योजिली ॥ न्यून ते पाहिजे क्षमा केली ॥ श्रोतेयांणीं आदरेसी ॥ २१ ॥

हें तव दंतकथा न म्हणिजे ॥ प्रत्ययो पुराणांतरीं पाहिजे ॥ नामस्मरणाविण आन दुजे ॥ नसे जाणिजे सर्वथा ॥ २२ ॥

या कलियुगीं नामसार ॥ वदोनि गेले महाज्ञानी ऋषेश्वर ॥ आणि भगवद्वचन निर्धार ॥ श्लोकाधार परिसावा ॥ २३ ॥

सर्वकामांश्च मुक्तिश्च हस्ते तेषां वरानने ॥ ये स्मरंति नरानित्यं नाममेसर्वरूपिणः ॥ ९ ॥

इति श्रीअधिकमहात्म ग्रंथ ॥ पद्मपुराणींचें संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ अष्टमोध्याय गोड हा ॥ ८ ॥

ओव्या १२३ ॥ श्लोक ॥ ९ ॥

॥ इति अष्टमोध्यायः ॥

-------------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय नववा

श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी रामचंद्रा ॥ अयोध्यावासिया रघुवीरा ॥ दयावंता कृपासागरा ॥ नेई पैलतीरा पंथ हा ॥ १ ॥

तव कृपेची अखंड नौका ॥ परतीरा नेतसे भाविका ॥ येथींचा कर्णधार निका ॥ वाल्मिक देखा साचार ॥ २ ॥

हे धर्मनौका जनालागीं ॥ शिल्पिकार तोहा महाराज योगी ॥ निर्माण केलीसे जगालागीं ॥ वाढविला परमार्थ ॥ ३ ॥

ऐका श्रोते सज्जनहो ॥ मळमहात्म परिसाहो ॥ सांगतसे लक्ष्मीना हो ॥ सत्कारुनि आदरेसी ॥ ४ ॥

ऐकतां हो त्रिविधताप ॥ दूरी जाय भव संताप ॥ पापें जातातीआपेंआप ॥ घेतां नाम श्रवणग्रंथीं ॥ ५ ॥

श्रीरुवाच ॥ देवदेव दयासिंधो वद किंचिदथोद्धुतं ॥ मलमासे न चीर्णेन भवेत्सकलसत्कृतं ॥ १ ॥

श्रीविष्णु रुवाच ॥ श्रृणु क्षीरोदतनये सर्वदा नंददायिनी ॥ सर्वोपरि दयादृष्टे सर्वानुग्रहकारिणी ॥ २ ॥

लक्ष्मी वदे जी स्वामिनाथा ॥ देवदेव जगन्नाथा ॥ अवधान देइजे वचनार्था ॥ अनाथ नाथा दयासिंधो ॥ ६ ॥

या मलमासाचें उपोषण ॥ करावे काय कारण ॥ याचें निवेदावें कथन ॥ कवण तरोन गेलासे ॥ ७ ॥

मग वदे तेव्हां श्रीधर ॥ ऐका प्रश्नाचें उत्तर ॥ मुख्य दयावंत अंतर ॥ असोनि निर्भरेंसी हो ॥ ८ ॥

दया असे जयाचे ह्रदयीं ॥ तया तें घडे सर्व काहीं ॥ अन्नदाना ऐसें दुजें नाहीं ॥ साधन आणीक निर्धारें ॥ ९ ॥

भूतमात्री दया जयातें ॥ सर्व साधनें घडती तयातें ॥ तेणें जाती मोक्षपंथें ॥ तपसामर्थ्ये आगळा ॥ १० ॥

या विषयींचा इतिहास ॥ नावेक ऐका सावकाश ॥
तेंची कथन श्रवणास ॥ यथामती निवेदूं आतां ॥ ११
॥

सर्व धर्मामाजी उत्तम धर्म ॥ अन्नदान अति उत्तम ॥
तयावरी दया आणि क्षेम ॥ विशेषाहूनि विशेष ॥ १२
॥

उत्तरदेशीं नर्मदातीरीं ॥ महिस्मृती नामें असे नगरी ॥
तेथील एक ब्राह्मणाची नारी ॥ वैधव्य निर्धारी तियेतें
॥ १३ ॥

भ्रताराविरहित कामिनी ॥ आप्तवर्ग नसेची कोणी ॥
एकाकी विचरे ते स्थानीं ॥ भिक्षा मागुनी क्रमी काळ
॥ १४ ॥

तामसी परम कोपिष्ट ॥ विधवा असूनी रागीट ॥
तपश्चर्या करी श्रेष्ठ ॥ काया कष्टें कष्टवीतसे ॥ १५ ॥

तंव पातलिया मलमास ॥ नर्मदातीरीं जातसे स्नानास
॥ नक्त नेम करी उपवास ॥ भरतां मास एक पैं ॥ १६
॥

ऐसें करितां एक मासवरी ॥ परम कृश झाली शरीरीं ॥
तंव तिची सखी एक अवधारीं ॥ मार्गी भेटली तियेतें ॥

१७ ॥

नाम तियेचें तुरिजया पाहीं ॥ परम पापिष्ठ दुरत्ययी ॥ दोषयुक्त सर्वदां ही ॥ अतित्याई चंडिका ते ॥ १८ ॥

मार्गी चालतां अकस्मात ॥ ब्राह्मणी भेटली तियेतें ॥ येरी उभी राहूनि तेथें ॥ पुसे स्वागत आदरेंसी ॥ १९ ॥

म्हणे कृश जालीस बाई ॥ व्रत आचरत असा देहीं ॥ मी तव अभीगी पाहीं ॥ न घडे कांही सार्थकता ॥ २० ॥

स्त्री देहाची बुद्धि पाहीं ॥ पापरूपी अमंगळ देहीं ॥ यासीं उपाव करूं काई ॥ सांगा बाई आदरें ॥ २१ ॥

ऐसें बोलून उत्तरातें ॥ करुणास्वरे गहिंवरें तेथें ॥ म्हणे नेणें कधीं दान-व्रतातें ॥ भगवंतातें अंतरलें ॥ २२ ॥

पाहा कर्माचें विंदान ॥ पोटीं न रिघे संतान ॥ पुढें परम कठीण जाण ॥ नरक दारुण सुटेना ॥ २३ ॥

निपुत्रिकातें नाहीं गति ॥ ऐसें बोले वेद श्रुति ॥ पापीयातें नाहीं गति ॥ तरों केउती पुढारी ॥ २४ ॥

ऐसें करुणा स्वरे गहिंवरोन ॥ करिती झाली ते रुदन ॥ ऐसे देखून ब्राह्मणीन ॥ कळवळली मानसी ॥ २५ ॥

भूतमात्रीं दया तिजलागीं ॥ म्हणोन कळवळली निजांगी ॥ मग विचारून स्वआंगीं ॥ काय करिती जाली पै ॥ २६ ॥

हातीं होते गंगाजळ ॥ सवेची होते कर्दळी फळ ॥ मग सुदलेहो तात्काळ ॥ करीं जाण तिचीया ॥ २७ ॥

म्हणें ऐकें सादर आतां ॥ करुणा देखून द्रवले चित्ता ॥ तरी स्वीकारीं हे उदक आतां ॥ फळासहीत निर्धारि ॥ २८ ॥

एका दिवसाचे व्रतपुण्य ॥ तुजलागीं केले अर्पण ॥ येणे हो तुज कल्याण ॥ जाले उत्तीर्ण सर्वस्वेसी ॥ २९ ॥

ऐसे वदोन ते अवसरीं ॥ फळासहीत उदक करीं ॥ घालितांची ते नमस्कारी ॥ कृतकृत जाहलें म्हणोनियां ॥ ३० ॥

ऐसें वर्तता ते समयीं ॥ नवल वर्तलेंसे पाहीं ॥ तात्काळ जाली दिव्यदेही ॥ केवढी नव्हाळी व्रताची ॥ ३१ ॥

मनीं चमत्कारी ब्राह्मणीन ॥ वरतें पाहे जो विलोकून ॥ तो तात्काळ पावलें विमान ॥ स्वर्गाहून तात्काळीं ॥

३२ ॥

तत्क्षणीं तये शूद्रीतें ॥ वाहोनि नेते जाले विमानातें ॥ येरी नमस्कारी बद्धहस्तें ॥ न विसरें मातें उपकार ॥ ३३ ॥

धन्यधन्य तूं पर उपकारी ॥ तपस्विनी माजी तूं खरी ॥ प्रचीत आली आज खरी ॥ सद्गद अंतरीं होतसे ॥ ३४ ॥

त्रिवार करून नमनातें ॥ विमान गेलें स्वर्गपंथें ॥ पुढें काय वर्तलें तें ॥ सावधान चित्तें परिसावें ॥ ३५ ॥

कौतुक पाहून नयनीं ॥ आश्चर्य करितसे मनीं ॥ म्हणे देखत देखत पापिणी ॥ गेली उद्धरोनि तात्काळ ॥ ३६ ॥

काय माझें अदुष्ट खोटें ॥ म्हणोनि दुःख मोठें ॥ पुढें तरी अवघड वाटे ॥ कैसेनि वोहटे जन्म प्रवाहो ॥ ३७ ॥

अहो जगदीशा काय केलें ॥ वृथा जन्मातें सारिलें ॥ कांहीं सार्थक नाहीं जालें ॥ वृथा आल्ये जन्मासी ॥ ३८ ॥

भगवान कृपेची माऊली ॥ एवढी पापीण उद्धरली ॥ देखत देखतच नेली ॥ वाहोनियां विमानीं ॥ ३९ ॥

आतां कवण करावा उपाहो ॥ कैसेनि लागेल माझी सोय ॥ ऐसें उकलवीं ह्रदय ॥ मुमुक्षु पाहे या नावें ॥ ४० ॥

येथें उद्भवली असे शंका ॥ येवढी पापीण उद्धरली देखा ॥ देतां एक दिन पुण्योदका ॥ तरली देखा निर्धारें ॥ ४१ ॥

मग ते ब्राह्मणी पाहीं ॥ केवीं न तरे ते तो देहीं ॥ कैसेनि पडेल अपायीं हे तो नवलाई अनुपम्य ॥ ४२ ॥

तात्काळ गेली पापीण ॥ मागें राहिले पुण्यवान ॥ तरी ये विषयींचे कारण ॥ सावधान परिसीजे ॥ ४३ ॥

समूळ पापी असलिया पाहीं ॥ पुण्यलेश नेणेची कांहीं ॥ उपरती होतां ह्रदयीं ॥ उद्धरोन जाई तात्काळ ॥ ४४ ॥

समूळ पापाचा ठेवा ॥ अर्धलेश पुण्यवट बरवा ॥ तो कैसेनि तरों पाहे जीवा ॥ करूं नये हेवा दुजियाचा ॥ ४५ ॥

समूळ पाप जेव्हा झडे ॥ तेव्हां पुण्यलेश आंगीं जडे ॥ उद्धरा गतीसी मग रोकडे ॥ जातां विलंब न लागेची ॥ ४६ ॥

असो ते ब्राह्मणी पाहे ॥ सखेदयुक्त गृहा जाय ॥ म्हणे अहो देवा करूं काय ॥ केउता होय परिणाम ॥ ४७ ॥

येरीकडे तो शूद्री जाणा ॥ पावती जाली स्वर्ग भुवना ॥ परि कर्मभोग चुकेना ॥ पावली जनना मागुती ॥ ४८ ॥

पदरीं पुण्याचा संचयो ॥ म्हणोनि प्राप्त झाला मानव देहो ॥ वाराणसी माजी जन्म होय ॥ ब्राह्मण वर्ण लाधला ॥ ४९ ॥

पुण्य सामग्री पदरीं ॥ एका ब्राह्मणाचिया घरीं ॥ भागीरथीचीये तीरीं ॥ जन्म निर्धारी पावला ॥ ५० ॥

काशीनाथ नामाभिधान ॥ तयाचें ठेविले असे जाण ॥ दिवसेंदिवस जाला तरुण ॥ वयसा जाण अष्टवरुषी ॥ ५१ ॥

काळांतरीं ब्राह्मणी पाहे ॥ पाहोनि यात्रेचा समुदाय ॥ वाराणसी यात्रा जात आहे ॥ पातली लवलाहे काशीपुरीं ॥ ५२ ॥

करूनि तीर्थाविधि स्नान ॥ घेतलें श्रीविश्वनाथ दर्शन ॥ मग करिती जाली परिभ्रमण ॥ देवदर्शन सकळांही ॥ ५३ ॥

तव अकस्मात मार्गावरी ॥ काशिनाथ ब्रह्मचारी ॥ भेटता जाला ते अवसरी ॥ दुरोन करी नमनातें ॥ ५४ ॥

परी पूर्वओळखी कैंची इयेतें ॥ जरी पूर्वपुण्यें सामग्री त्यातें ॥ म्हणोनी स्मरता जाला ह्रदयातें ॥ उपकार तेचिया ॥ ५५ ॥

म्हणोनि येता जाला निकटीं ॥ भेटता जाला उठाउठी ॥ म्हणे सखये पडली सदृष्टी ॥ पूर्वपुण्यें करोनियां ॥ ५६ ॥

ऐसें ऐकतांची वचन ॥ येरी म्हणे तूं आहेस कवण ॥ केउती तुझी ओळखण ॥ आलासी कोठून या ठायां ॥ ५७ ॥

मग बोले ब्रह्मचारी ॥ मी तुझी सखी निर्धारी ॥ पूर्ववोळखी पूर्ण धरी ॥ घातलें करीं पुण्योदक ॥ ५८ ॥

ऐसी आठवण देतां तियेतें ॥ येरी भेटती जाली तयातें

॥ मग समूळ वृत्तांताते ॥ पुसे आदरें भामिनी ॥ ५९ ॥

येणें जालें तेची कथिलें ॥ ऐकतां मन संतोषलें ॥ म्हणे एका दिवसाचें दिधलें ॥ पुण्य वाहिलें इजलागीं ॥ ६० ॥

तितुकियानें ही तरली ॥ विमानीं वाहोनियां नेली ॥ देखत देखत उद्धरली ॥ कलह कल्लोळी पापिणी हे ॥ ६१ ॥

पुनः नरदेह लाधला ॥ वरी ब्राह्मण वर्ण चांगला ॥ तोहि गंगातटाकीं निपजला ॥ विश्वनाथ जाला कृपाळू ॥ ६२ ॥

अहो देवा काय केलें ॥ माझें सार्थक नाहीं झालें ॥ वय माझें व्यर्थची गेलें ॥ नाहीं घडलें सार्थक ॥ ६३ ॥

एका दिवसाचें उदक करीं ॥ घालितां उद्धरली नारी ॥ मी तंव आचरलें मासवरी ॥ मळमास निर्धारी व्रताते ॥ ६४ ॥

कवण पापाचा भोगवटा ॥ भोगितां न सरोचि वांटा ॥ म्हणोन पिटीतसे लल्लाटा ॥ गहिंवर मोठा दाटला ॥ ६५ ॥

अट्टहास्यें तेव्हा रडत ॥ उरशीर असे बडवित ॥ जनसमुदाय सभोंवते ॥ मिळाला तेथें पाहावया ॥ ६६ ॥

जे येती ते पुसती काय झालें ॥ येरी उत्तर नेदी बोले ॥ जन म्हणती वेड लागलें ॥ किंवा घेतलें पिशाचीं ॥ ६७ ॥

भूत केवी झडपी तयेतें ॥ ही तव झडपिली महद्भूतें ॥ ऐसें वर्ततां तेथें नवल ॥ अद्भुत वर्तलें ॥ ६८ ॥

इचा पापलेश सरला ॥ पुण्यवाटा उभा राहिला ॥ तेणें योगें अंतरीं द्रवला ॥ नाथ भोळा दिनाचा ॥ ६९ ॥

तात्काळ आणविलें विमान ॥ तीतें दिव्य देह करून ॥ देखत देखत सर्व जन ॥ नेली वाहून विमानीं ॥ ७० ॥

मग तो काशीनाथ ब्रह्मचारी ॥ सखेदयुक्त झाला अंतरीं ॥ दृढ तपश्चर्या तो करी ॥ पावला निर्धारी शिवपदा ॥ ७१ ॥

चंद्रेश्वर नामें लिंग ॥ तयानें स्थापिलें अभंग ॥ देखताती सर्वही जग ॥ वाराणसी माझी अद्यापी ॥ ७२ ॥

ऐसें हें मलमासाचे कथन ॥ त्रिवर्ग गेले उद्धरून ॥ एकी जाले जन्म दोन ॥ एकी स्वदेहानें उद्धरली ॥ ७३ ॥

ऐसें हें महिमानातें ॥ आकर्णविले श्रोतियातें ॥ यदर्थी असे संमतातें ॥ श्लोकाधार पुराणींचा ॥ ७४ ॥

विमान महदायातं दिव्यभोगसमन्वितं ॥ बहुकालं महाभोगान् भुत्तवा चैव भुवस्तले ॥ ३ ॥

काशीनाथ सुतात्वंच लब्ध्वा तत्रापिशं बहु ॥ भुक्वा देहविसृष्टौतु पुनः शंकरलोकगा ॥ ४ ॥

मलमासदिनैकस्य फलं प्राप्ता सखीकरात् ॥ काश्यांस्थास्यति सा शूद्री यावदाचंद्रतारकं ॥ ५ ॥

श्लोकभावार्थ आणुनी मनीं ॥ कथा वर्णिली महाराष्ट्र वाणी ॥ न्यूनतें पूर्ण कीजे सज्जनीं ॥ नव्हे वाणी पदरची ॥ ७५ ॥

विना आधारें सर्वथा ॥ न चालेचहो कविता ॥ केवळ नव्हे ही दंतकथा ॥ पाहावें ग्रंथार्था आदरें ॥ ७६ ॥

व्युत्पन्नता नाहीं माझें आंगीं ॥ नव्हे कुशळ कवितामार्गी ॥ काळकर्मणेस्तव जगीं ॥ वाढविला

प्रसर पैं हा ॥ ७७ ॥

मानेल तरी स्वीकारी जे ॥ न माने तरी त्यागिजे ॥ पुढें कथेतें अवधान दीजे ॥ म्हणे दासानुदास संतांचा ॥ ७८ ॥

स्वस्ति श्रीमलमास माहात्म्य ग्रंथ ॥ पद्मपुराणींचें संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ नवमोध्याय गोड हा ॥ अध्याय ९ ॥ ओव्या ॥ ७८ ॥ श्लोक ५ ॥

॥ इति नवमोध्यायः ॥

----------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय दहावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ गुरवे नमः ॥ जयजयाजी रुक्मिणीरमणा ॥ कृपासागरा दयाघना ॥ तव स्मरणें अघ नाशना ॥ जायं निरसून तात्काळ ॥ १ ॥

तुझिये नामीं उपजो प्रेमा ॥ हेची देई सर्वोत्तमा ॥ निशिदिनी आत्मयारामा ॥ भजन घडो अक्षयी ॥ २ ॥

आतां शक्ति नसे शरीरीं ॥ भजनही नव्हे क्षणभरी ॥

उसंत नाहीं या संसारीं ॥ आठवून अंतरीं पाय तुझे ॥ ३ ॥

परी न कंठेची काळ ॥ चित्तीं वाहें तळमळ ॥ केधवा येईल वोखटी वेळ ॥ नेणों कपाळ महाराजा ॥ ४ ॥

ऐका श्रोतेहो चतुर ॥ मलमास कथानक सार ॥ जें ऐकतां पापें अपार ॥ भस्म होती क्षणमात्रें ॥ ५ ॥

लक्ष्मीनारायण संवाद ॥ परिसा होऊनि सावध ॥ संस्कृत भाषेचे प्रबंध ॥ प्राकृतावबोध परिसावा ॥ ६ ॥

लक्ष्मी रुवाचय ॥ भगवन् ब्रूहि मे सर्व मलमासस्य यत्फलं ॥ उपवासस्य सायर्थ्यं येषां नास्ति मलिम्लुचे ॥ १ ॥

किंकर्तव्यं नरैस्तैस्तु कथं पाप क्षयोभवेत् ॥ तद्वदस्व सुरश्रेष्ठ कृपां कृत्वा ममोपरि ॥ २ ॥

लक्ष्मी म्हणे कृपावंता ॥ मागें निवेदिली उपोषण कथा ॥ परी जया आंगीं नसे सामर्थ्यता ॥ उपाय केउता तयातें ॥ ७ ॥

तयाने व्रत केवी कीजे ॥ परलोकीं कैसेंनि पाविजे ॥

येविषयी निवेदीजे ॥ कवण कीजे सार्थक ॥ ८ ॥

परिसोनिया ऐसें उत्तर ॥ वदता झाला शाङ्गधर ॥
येविषयींचा तो प्रकार ॥ श्रवण कीजे शुभानने ॥ ९ ॥

श्रीकृष्ण उवाच ॥ श्रृणु देवि प्रवक्ष्यामि व्रतं पापप्रणाशनं ॥ येषामुपोषणे शक्तिर्नास्ति किंचिच्चभक्षणे ॥ ३ ॥

तैरेकभुक्तं कर्तव्यं हविष्यान्नेन नित्यशः ॥ तथा मौनंच कर्तव्यं अनंतफलमीप्सुभिः ॥ ४ ॥

विष्णु वदे ते अवसरीं ॥ शक्ति नाही जयाते शरीरीं ॥
तयाचे व्रत श्रवण करीं ॥ कवणे परी आचरावे ॥ १० ॥

तयाने करावे हविष्यान्न ॥ वरी एक भुक्त करून भोजन ॥ करावें मौन्य धरून ॥ नसे अन्य साधन पैं ॥ ११ ॥

मौन्य भोजना ऐसें पाहीं ॥ साधन दुसरें नाहीं नाहीं ॥
तेणें माते जिंकिलें पाहीं ॥ ऐके नवाई आणीक ॥ १२ ॥

मौन्यें पापाचा क्षय ॥ मौन्यें सौभाग्य प्राप्त होय ॥

मौन्यें सर्व शांत होय ॥ निरसुनि जाय सर्व अरिष्टें ॥ १३ ॥

मौन्यें कलहाची हानी ॥ मौन्यें आयुष्य वर्धनी ॥ मौन्यें सौख्यातें पावनी ॥ मौन्यें भोजनीं सादर ॥ १४ ॥

त्रिकार्यातें असावें मौन्य ॥ स्नान होम आणि भोजन ॥ याचें फळ करीं श्रवण ॥ अति आदरें करूनियां ॥ १५ ॥

मौन्य केलिया स्नान ॥ कांतीं सुंदर तेजस्वी पूर्ण ॥ आणीक होय श्रीमान् ॥ करी स्नान मौन्येसी ॥ १६ ॥

होम करितां मौन्ये करून ॥ आयुष्य वृद्धि होय जाण ॥ आणीकही साधन ॥ करिता भोजन मौन्येसीं ॥ १७ ॥

स्नानें संतुष्ट होय जाण ॥ अग्नि संतुष्ट होमें करून ॥ मौन्यें करितां भोजन ॥ स्वयें नारायण संतुष्टे ॥ १८ ॥

प्रसन्न होतां वरुण ॥ दिव्य कांती होय तेणें ॥ होम करितां मौन्ये करून ॥ श्रीवर्धमान अग्नि करितां ॥ १९ ॥

नित्य भोजन करितां मौन्ये ॥ सायुज्यता पावे तेणे ॥

ऐसे मौन्ये भोजनाचे कारण ॥ केले कथन सकळिकां ॥ २० ॥

पंच प्राणाहुति करितां ॥ बोलो नये सर्वथा ॥ संपूर्ण भोजन करितां पापे नासती समूळ ॥ २१ ॥

ऐसे भोजन करितां पाहीं ॥ तयाते प्रायश्चित्त आणीक नाहीं ॥ प्रायश्चिते पापे दहन होई ॥ हा निर्णय शास्त्रीं असे ॥ २२ ॥

मौन्य भोजन करितां ॥ आणीक प्रायश्चित्त नलगे तत्वता ॥ पापे भस्म होती जाणत जाणता ॥ नसे असत्यता हे वाणी ॥ २३ ॥

ऐसे प्रतिदिनी जयाते घडत ॥ त्या येवढा नाहीं पुण्यवंत ॥ तयावरी मलमास जाला प्राप्त ॥ तरी अधिकाधिक पैं ॥ २४ ॥

आदौ संपूर्ण एकमास ॥ तो तंव अवघाची पुण्यदिवस ॥ तयामाजी विशेष ॥ तेंही निःशेष अवधारा ॥ २५ ॥

दशमी द्वादशी तिथी पाहीं ॥ पौर्णिमा अमावास्या तेही ॥ सर्वां वरिष्ट तिथी ह्याही ॥ शास्त्रीं नवाई बोलिली असे ॥ २६ ॥

इतुकिया तिथी वरुनी ॥ पर्वकाळ टाकिजे ओवाळुनी ॥ व्यतीपात वैधृती कल्याणी ॥ इतुकिया वरुनि वोवाळीजे ॥ २७ ॥

प्रत्यही जरी न घडे स्नान ॥ अथवा ब्राह्मणपूजन ॥ नक्त अथवा मौनीभोजन ॥ दीपदान यथाविधी ॥ २८ ॥

न घडे अपूपादी दान ॥ न घडे ब्राह्मण भोजन ॥ सत्पात्रीं न घडे गोदान ॥ तेची लक्षण ऐकें पां ॥ २९ ॥

इतुकेंही न घडे जरी ॥ त्रिरात्र व्रतातें स्वीकारी ॥ स्नानदान बरविया परी ॥ नक्त करी मौन्यभोजन ॥ ३० ॥

यासीं तो वेंचावें न लागे कांहीं ॥ कष्ट करावें स्वदेहीं ॥ तेणें तुष्टमान शेषशायी ॥ पर्व सर्वही कुलकल्याण पुढें ॥ ३१ ॥

हेंची व्रत नारदें केलें ॥ तयातें ज्ञान प्राप्त झालें ॥ सत्यवतीनाथें सेविलें ॥ विश्वामित्रादि भले मुनींद्र ॥ ३२ ॥

यांनीं केलें मौन्य व्रत ॥ तरीच पावलें ब्रह्मत्व ॥ ऋषीमंडळीमाजी महत्व ॥ प्राप्त झालें तयातें ॥ ३३

॥

आधींच मलमास उत्तम ॥ त्यांवरी द्वादशी पर्व नेम ॥ वरी पूर्णिमा उत्तमोतम ॥ कैचा राहे पापलेशा ॥ ३४ ॥

सकळ दान केलियाचें फळ ॥ अथवा तीर्थ केलियाचें फळ ॥ किंवा पुरश्चरण मंत्रमंडल ॥ किंवा दिधलें पृथ्वीदान ॥ ३५ ॥

इतुकेही घडतां एकीकडे ॥ मौन्यभोजन जयातें घडे ॥ तरी ना तुळे तयातें न घडे ॥ सांगतों रोकडे श्लोकाधारें ॥ ३६ ॥

सर्व फलंच मौनेन तिथि नक्षत्रयोस्ततं ॥ इष्टापूर्तफलं तस्य मलमासेतु मौनतः ॥ ५ ॥

मौनव्रतीततो धन्यः स्नाने वै भोजनार्चने ॥ आजन्मतः कृतात्पापान्मुच्यते नात्रसंशयः ॥ ६ ॥

उपवासेन यत्पुण्यं जायते शतवत्सरात् ॥ तत्पुण्यं लभ्यते देवि मौनेनैकेनमानवैः ॥ ७ ॥

मासवरी उपोषण करितां पाहें ॥ शतसंवत्सराचें पाप जाये ॥ एकपर्वणी मौन्य भौजन होये ॥ तरी लाभ पाहे तितुकाची ॥ ३७ ॥

तयावरी पूर्णिमा तिथी ॥ स्नान दान घडे अतिथी ॥ वरी मौन्य भोजनाची रीती ॥ नाहीं गणती पुण्यातें ॥ ३८ ॥

येविषयीं पुरातन इतिहास ॥ श्रवण कीजे सावकाश ॥ बोलता जाला जगदीश ॥ त्याच्या भावार्थास परीस तूं ॥ ३९ ॥

पूर्वी अवंती नगरीं जाण ॥ वेदशर्मा नामें ब्राह्मण ॥ तपोतेजें देदिप्यमान ॥ सूर्यनारायण दुसरा तो ॥ ४० ॥

स्वाध्यायीं नित्यरत असें ॥ दुष्ट प्रतिग्रह कोणाचा नसे ॥ स्वधर्माचारें काळ क्रमित असे ॥ लोलंगता नसे निजांगीं ॥ ४१ ॥

निर असतां निरहंकारी ॥ मत्सर कवणातेंही न करी ॥ प्राणीमात्रातें कृपा करी अपत्यापरी जीवमात्रीं ॥ ४२ ॥

तंव प्रवर्तला मलमास ॥ ब्राह्मण चिंता करी रात्रंदिवस ॥ म्हणे पदरीं संचय नसे धनास ॥ वाटे हव्यास धनाचा ॥ ४३ ॥

तयासीं उपाय कीजे कवण ॥ भिक्षा मागत न मिळे कण ॥ कोणी न देती वस्त्र जीर्ण ॥ मग द्रव्य कोठून

प्राप्त होय ॥ ४४ ॥

फुकाचें न मिळे तक्रपाणी ॥ हे तंव सोलीव दुःखाची करणी ॥ पूर्ण दरिद्र कृपे करूनी ॥ दिधलें मजलागुनी भगवंतें ॥ ४५ ॥

जरी कष्टवावें शरीर ॥ तरी शक्ती नाहीं अपार ॥ उपोषण करावे निर्धार ॥ तरी अन्नगत प्राण ॥ ४६ ॥

क्षणभरी नसतां अन्न ॥ तात्काळ जाऊं पाहे प्राण ॥ पित्तक्षोभ होय तत्क्षण ॥ यालागीं उपोषण घडेना ॥ ४७ ॥

ऐशी चिंता करितां ह्रदयीं ॥ निजध्यास बैसला जीवीं ॥ म्हणे पुण्यलेश आमुचे दैवीं ॥ प्राप्त केवीं होऊं शके ॥ ४८ ॥

मुमुक्षु दशा दृढोत्तर ॥ आंगीं बाणतां साचार ॥ कृपाळू तो सर्वेश्वर ॥ द्रवले अंतर तयाचे ॥ ४९ ॥

स्वप्नीं येऊनियां श्रीअच्युत ॥ तया ब्राह्मणाते संबोधित ॥ म्हणे मी सांगतो निश्चित ॥ करी व्रत मौन्य तेव्हां ॥ ५० ॥

मौन्याची करावे स्नान ॥ मौन्यची कीजे हवन ॥

मौन्यची साधावे भोजन ॥ नलगे आन साधनाते ॥ ५१ ॥

परान्नाचा करीं त्याग ॥ मासमात्र नेम प्रसंग ॥ उपरी उद्यापन यथासांग ॥ तेणे श्रीरंग संतोषे ॥ ५२ ॥

ऐसे स्वप्न होतांचि निशीते ॥ येरू चाकाटला सभोवते ॥ म्हणे दृष्टांत दिधला भगवंते ॥ म्हणोन हर्षाते निजमनीं ॥ ५३ ॥

मग प्रतिदिनी व्रतारंभ ॥ करितां जाला स्वयंभ ॥ मौन्यव्रतीं अलभ्य लाभ ॥ लाभला भला तयाते ॥ ५४ ॥

प्रातःकाळीं नर्मदा तीरीं ॥ स्नानाते जातसे निर्धारी ॥ मौन्येचि येतसे माघारी ॥ याचना न करी कवणाते ॥ ५५ ॥

करुनि देवदेवतार्चन ॥ विधियुक्त जप अनुष्ठान ॥ सारूनियां होमहवन ॥ नक्त उपोषण करितसे ॥ ५६ ॥

अस्तमानीं करी भोजन ॥ स्वपंक्ती अतिथी जाण ॥ परी स्वप्न वचनीं भावार्थ धरून ॥ करी आचरण मौन्येसी ॥ ५७ ॥

धन्य ते सांसारिक जन ॥ जयातें घडे अतिथी जाण ॥ नको देवा ऐशीयाचें जिणे ॥ असाक्षी भोजन जयातें ॥ ५८ ॥

ऐसा नव्हे वेदशर्मा ॥ कर्म करी अकर्मा ॥ सदां सर्वकाळ सर्वोत्तमा ॥ भजन प्रेमा अगम्य ॥ ५९ ॥

संपूर्ण भरतां एकमास ॥ उद्यापन करी सायास ॥ चित्तीं धरूनि अति हव्यास ॥ मौन्यव्रतास संपविले ॥ ६० ॥

तया व्रतप्रभावे करून ॥ आरोग्य कांतिवर्धमान ॥ जरामृत्यु दूर होऊन ॥ पावे निर्वाण पदातें ॥ ६१ ॥

एवं नानाविधा भोगावरमत्तोहिचार्थितः ॥ दत्तामया सुमनसाव्रतेन परितोषिणा ॥ ८ ॥

मग तया विप्रालागीं पाहीं ॥ संतोषून शेषशायी ॥ विमान आणविले लवलाहीं ॥ उद्धरून नेला वैकुंठा ॥ ६२ ॥

इंद्र करीतसे सन्मान ॥ आपणा निकट बैसवून ॥ स्वर्गसुखाचे भोग संपूर्ण ॥ भोगिता झाला स्वयें पैं ॥ ६३ ॥

तो ब्राह्मण अद्यापवरी ॥ स्वर्गलोकीं वास करी ॥ साक्ष घेईजे श्लोकांतरीं ॥ नसे वैखरी अप्रमाण ॥ ६४ ॥

धन्यस्त्वं कृतकृत्यश्च येनेदंव्रतमुत्तमं ॥ मौनादिकं कृतं विप्रतस्येदं फलमीदृशं ॥ ९ ॥

इंद्रस्तमाहसंपूज्य देहिमे किंचिदीप्सितं ॥ मौनव्रतैकदिनजं फलं कृत्वा कृपांमयि ॥ १० ॥

सविप्रोऽद्यापि वैकुंठे वसते बहुसौख्यभाक् ॥ एवं कृत्वाधिके मौनंव्रती किं लभतेनवै ॥ ११ ॥

ऐसा तरला वेदशर्मा ॥ म्हणोन श्रवण केलें तुम्हां ॥ यालागीं भाविकहो धरूनि प्रेमा ॥ ह्रदयीं पुरुषोत्तमा ध्याईजे ॥ ६५ ॥

संकल्प विकल्प करून दूर ॥ मिथ्या जाणून संसार ॥ ह्रदयीं चिंता रघुवीर ॥ नेतसे पैलतीर दासातें ॥ ६६ ॥

जयाचें नाम घेतां जाण ॥ जळीं तरले हो पाषाण ॥ ते तंव निर्जीव कीं हो जाण ॥ परी महिमान नामाचें ॥ ६७ ॥

मग मानव देह तो सजीहो ॥ केवी न तरे पाहाहो ॥

परी एकनिष्ठेविण देवो ॥ केवी पावें दासातें ॥ ६८ ॥

पूर्ण भावार्थाविण सर्वथा ॥ कृपा नयेची अनंता ॥ यालागीं श्रोतेहो तत्वतां ॥ आचरावें व्रता निजनिष्ठें ॥ ६९ ॥

परम साधारण हें व्रत ॥ ऐश्वर्य आयुरारोग्य प्राप्त ॥ कृपा करूनि श्रीभगवंत ॥ निवेदिलें आदरें ॥ ७० ॥

तरी भगवद्भजनासीं अव्हेर ॥ केवी करावा साचार ॥ अव्हेरितां तयाचें उत्तर ॥ मग होय निष्ठुर दासातें ॥ ७१ ॥

पाहा उदरालागीं नीचसेवन ॥ करावें लागे जीवित्व अर्पण ॥ येथें केंचित पडतां न्यून ॥ क्षोभे दारुण सेवकातें ॥ ७२ ॥

आणि आपुली जे कांता ॥ पतिवचनातें आव्हेरितां ॥ मग तो कोपे तियेवरुता ॥ करी लत्ता प्रहारातें पै ॥ ७३ ॥

ऐसें विचारून मानसीं ॥ हा तो स्वामी त्रैलोक्यवासी ॥ अमान्य होतां त्याचिया वचनासी ॥ तरणोपाव केसेनि पावला ॥ ७४ ॥

म्हणोन प्रार्थितो बद्धहस्तीं ॥ विन्मुख न व्हावें भगवंती ॥ हेंची सांगणें पुढतो पुढती ॥ श्रोत्यांप्रती आदरें ॥ ७५ ॥

स्वस्ति श्री अधिकमास माहात्म ग्रंथ ॥ पद्म पुराणींचे संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ दशमोध्याय गोड हा ॥ १० ॥

ओंव्या ॥ ७५ ॥ श्लोक ॥ ११ ॥

॥ इति दशमोऽध्यायः ॥

-----------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय अकरावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीदाशरथे रामचंद्रा ॥ अनाथनाथा करुणासमुद्रा ॥ कृपासमुद्रा नाममुद्रा ॥ अक्षयी नरेंद्रा मज देई ॥ १ ॥

हेंची मागणें पुढतो पुढती ॥ उचित दीजे रघुपती ॥ अंतीं राहूं दे स्फूर्ती ॥ भावना चित्तीं असों दे ॥ २ ॥

श्रोतियें श्रवण कीजे सावधान ॥ मलमाहात्म परम पावन ॥ जें ऐकतां कलिमलदहन || तात्काळ जाण

होतसे ॥ ३ ॥

श्रीलक्ष्मीनारायण संवाद ॥ तोचि तुम्हांतें करवूं विशद ॥ आतां होऊनियां सावध ॥ श्लोकावबोध परिसावा ॥ ४ ॥

श्रीरुवाच ॥ मलिम्लुचे हृषीकेश पुराण पुरुषोत्तम ॥ पंचपर्वकृतं नृणां किं फलं स्याद्वदाच्युत ॥ १ ॥

लक्ष्मीवदेहो जगन्नायका ॥ विज्ञापना एक ऐका पंचपर्वाचा भाव निका ॥ कृपाकरूनि सांगिजे ॥ ५ ॥

पांच पर्षे तीं कवण ॥ काय तयांचें महिमान ॥ आचरलिया कवण पुण्य ॥ पूर्वी कवण आचरिले ॥ ६ ॥

हें समग्र मज कीजे श्रवण ॥ जें ऐकता सुखसंपन्न ॥ मग बोलो आदरिलें जाण ॥ स्वयें नारायण स्वामिराजा ॥ ७ ॥

श्रीकृष्ण उवाच ॥ श्रृणु देवि प्रवक्ष्यामि पर्वाणि तु यथाक्रमं ॥ वैधृतिश्चव्यतीपातोराकाचैवकुहुस्तथा ॥ २ ॥

मग वदे देवाधिदेवो ॥ पांच पर्वाचा अभिप्रावो ॥

वैधृती व्यक्तीपात पाहा हा ॥ केला निर्णयो शास्त्रातें ॥ ८ ॥

पूर्णिमा अमावास्या पाहीं ॥ द्वादशी उत्तम पर्व तेंहीं ॥ ऐसीं पंच पर्षे पाहीं ॥ ऐकें नवाई या अर्थी ॥ ९ ॥

व्यतीपातें जो धर्म घडे ॥ तेणें धर्मराज उभवि हुडे ॥ विधृतीं दान जरी घडे ॥ तरीं जोडे महापुण्य ॥ १० ॥

पूर्णिमेकरितां दान ॥ तेणें संतोषे चतुरानन ॥ अमावास्या पितृगण ॥ संतुष्टमान पैं होती ॥ ११ ॥

द्वादशी परम पावन दिवस ॥ तेणें संतोषे रमाविलास ॥ असो होमस्नानदानास संतोषे कमळालय ॥ १२ ॥

ऐसे तीर्थीं पर्वणी ॥ जे करिती होमहवनीं ॥ तया तुष्टमान चक्रपाणी ॥ यमजाचणी चुकवीत ॥ १३ ॥

वैधृती व्यतिपात पर्वणी ॥ देवा दुर्लभ पितृतर्पणी ॥ धन्यधन्य तयालागुनी ॥ न्यून सदनीं पडों नेदी ॥ १४ ॥

वैधृतौचाक्षयं पुण्यं संक्रात्यधिकमच्युत ॥ निमिषे निमिषेकांते वर्धते नात्र संशयः ॥ ३ ॥

मलमासे विशेषेण मत्प्रिये चारुहासिनि ॥ तस्य पुण्यप्रभावेन प्रल्हादो दैत्यनायकः ॥ ४ ॥

या वैधृतीचें अक्षयी पुण्य ॥ दिवसेंदिवस वर्धमान ॥ जेवी गौतमीषया लागून ॥ दिवसेंदिवस वृद्धी करी ॥ १५ ॥

यथेष्ट भक्ष मिळता तयेतें ॥ मगतें वृद्धि करी पयातें ॥ तैसे दानधर्म करितां वैधृतीतें ॥ होय पुण्यतें वृद्धिंगत ॥ १६ ॥

प्रतिमासाचिये ठायीं ॥ वधृती येतसे पाहीं ॥ परी विशेष महिमा राही ॥ पातलिया मलमास ॥ १७ ॥

याच वैधृती वरी दान ॥ नेमे करी प्रल्हाद आपण ॥ दैत्यकुळीं उपजोन ॥ मजलागून वश्ये केलें ॥ १८ ॥

नेमपूर्वक करितां दान ॥ राज्यप्राप्त शालें तया लागून ॥ ऐसें वैधृतीचें महिमान ॥ विशेषाहून विशेष ॥ १९ ॥

याचि पुण्याचरणें करून ॥ इंद्रपद वासवातें जाण ॥ लक्ष्मी नष्ट झाली पूर्ण ॥ ते लाधली संपूर्ण व्रतदानें ॥ २० ॥

पूर्वी मांधाता राजा सूर्यवंशीं ॥ परम धार्मिक पुण्यराशी ॥ इंद्रपद प्राप्त जालें तयासी ॥ तें वासवासि पदच्युत ॥ २१ ॥

तें काळीं स्वयें येऊन नारद ॥ इंद्रातें उपदेशिला व्रतावबोध ॥ वैधृती महिमा अगाध केला बोध इंद्रातें ॥ २२ ॥

तोची नेम धरून जीवेशीं ॥ सहस्त्रनयन आचरे भावेंसी ॥ म्हणोन प्राप्त झाला स्वपदासी ॥ निज आसनासी आपुलिया ॥ २३ ॥

म्हणोन वैघृती महिमान ॥ मज न वर्णवेची हो जाण ॥ कथिता जाला पंचवदन ॥ चतुरानन तोही पैं ॥ २४ ॥

याचा ऐकें दान महिमा ॥ कवणे परीं आचरावें नेमा ॥ तेंही सांगतों अनुक्रमा ॥ शास्त्राधारें बोलिलासे ॥ २५ ॥

वैधृतीसीं केलिया दान ॥ समग्र देवता संतुष्टमान ॥ घृतासहित पायसान्न ॥ कीजे अर्पण ब्राह्मणाते ॥ २६ ॥

अथवा शक्ति असलिया जाण ॥ यथासांग कीजे संतर्पण ॥ किंवा तिळपात्र घृतेंसीं जाण ॥ दीजे दान ब्राह्मणातें ॥ २७ ॥

तिळमिश्रित लाडू पाहीं ॥ षोडश असावे तेही ॥ कर्दळी फळें अर्पिजे बरवीं ॥ नेमयुक्त षोडश ॥ २८ ॥

खर्जूरी फळें षोडश असावीं ॥ किंवा पूगीफळें गणावीं ॥ भूसुरांतें अर्पावीं बरवीं ॥ पूजाविधानें करूनि ॥ २९ ॥

परी वैधव्य दुखः नसे देही ॥ वंध्या सुपुत्र लाधे पाहीं ॥ सदां आरोग्यता तेथें राहीं ॥ व्याधी नाहीं तिळमात्र ॥ ३० ॥

वैधृतौ दुःखसाकल्यवर्जितो सौभवेत्सदा ॥ पूगंपत्रं षोडशकं योदद्याद्वैधृतौनर ॥ ५ ॥

यापरी वैधृतीचे महिमान ॥ संकलित मार्गे केले कथन ॥ आतां ऐका हो सावधान ॥ व्यतीपात दान महिमा तो ॥ ३१ ॥

पूर्वी वराह पुराणाच्या ठायीं ॥ व्यतीपात कथा असे पाहीं ॥ प्रस्तुत संकलित मार्गे सर्वही ॥ सावध ऐकिजे भावार्थे ॥ ३२ ॥

धर्माधर्म याचा विस्तार ॥ सांगितलासे बहुत प्रकार ॥ समग्र कथा लागेल जर ॥ तरी होईल प्रसर ग्रंथातें ॥ ३३ ॥

म्हणोनी ध्वनितार्थ वाणी ॥ परिसवू श्रोतियांचे कर्णी ॥ संशय नाणिजे मनीं ॥ श्लोकाधारें वाणी वदतसे ॥ ३४

॥

सर्वदानाधिकं पुण्यं व्यतीपात प्रभावतः ॥ प्रतिमासं विवर्धेत संख्यातेभ्यः शताधिका ॥ ६ ॥

कुरुक्षेत्रादि धर्मनृपति ॥ वनांतरीं असतां संकटवर्ती ॥ तयानें हें व्रत आचरता पुढती ॥ देशाधिपती पातलासे ॥ ३५ ॥

चंद्रसूर्यातें समानयोग ॥ प्राप्त होतां यथासांग ॥ तेथें व्यतीपात जन्म प्रसंग ॥ जाला निःसंग अवधारा ॥ ३६ ॥

म्हणोनि याचा विशेष महिमा ॥ वदोन गेला चतुर्मुख ब्रह्मा ॥ न भूतो न भविष्यति सीमा ॥ या पुण्यप्रभावातें ॥ ३७ ॥

कुरुक्षेत्राचिये ठायीं ॥ कनकदान ग्रहणसमयीं ॥ सूर्यपर्वणी दिधलें पाहीं ॥ तरी समता नाहीं व्यतीपाता ॥ ३८ ॥

चक्रतीर्थ अथवा काशी ॥ स्नानें मुक्ति प्राणियांसीं ॥ तेही साम्यता नाहीं यासी ॥ व्यतीपात दानासीं निर्धारें ॥ ३९ ॥

भाद्रपद अमावास्येसीं ॥ जरी स्नान घडे गंगेसी ॥ अथवा सोमवतीसी ॥ परी समता यासी नसेची ॥ ४० ॥

अथवा सूर्यग्रहण लक्षून ॥ केलें जरी जपानुष्ठान ॥ परी व्यतीपाता ऐसें पुण्य ॥ दुजे आन असेना ॥ ४१ ॥

धान्यं दत्तं व्यतीपाते हिरण्यं वाऽब्धिजे रवौ ॥ अनंत फलदं सर्वमग्निहोत्रफलं तथा ॥ ७ ॥

व्यतीपाता अर्पितां धान्य ॥ अनंत फळ लाभे पूर्ण ॥ तयाही वरी अग्निहोत्री पूर्ण ॥ देईजे विधीनें तयातें ॥ ४२ ॥

प्रतिमासें व्यतीपात परम ॥ अग्निहोत्रातें अर्पावें अन्न ॥ किंवा किंचित् अर्पून सुवर्ण ॥ तेणें जगजीवन संतुष्टे ॥ ४३ ॥

प्रातःकाळीं करून स्नान ॥ सारूनि देवदेवतार्चन ॥ मग ब्रह्मयज्ञादी सारून ॥ ब्राह्मणाते पाचारिजे ॥ ४४ ॥

उपरी नारीकेळ त्रयोदश ॥ अथवा कर्दळी फळविशेष ॥ खर्जुरी फळें त्रयोदश ॥ अर्पावी ब्राह्मणास आदरे ॥ ४५ ॥

जें जें फळ जये काळीं ॥ निर्माण होते ऋतुकाळीं ॥
तेंची अर्पी कां वनमाळी ॥ भावबळें आदरेंसी ॥ ४६ ॥

ऐसें सत्पात्रीं करितां दान ॥ होय पुण्य तें वर्धमान ॥
पापें जातातीं भस्मोन ॥ जेवी तृण अग्निसंगें ॥ ४७ ॥

जालिया अनंत पापराशी ॥ असलिया पंच महादोषी ॥
तरी तात्काळची नाशी ॥ आचरतां व्रत ऐसिया ॥ ४८ ॥

अल्प वेंचा महापुण्य ॥ संकलित मार्गे केलें कथन ॥
नारी अथवा पुरुष जाण ॥ लाभ समान उभयतां ॥ ४९ ॥

ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र ॥ सर्वी आचारावें निर्धार ॥
जयातें न घडे साचार ॥ तरी नरक अघोर चुके ना ॥ ५० ॥

परि पाहिजे आगळा भावार्थ ॥ तयानें जोडे परमार्थ ॥
भावेंविण श्रीअनंत ॥ नातुडे निश्चित जाणपां ॥ ५१ ॥

किंचित् भाव होतां न्यून ॥ तरीं दुरावे शेषशयन ॥
यालागीं निरहंकार होऊन ॥ कीजे दान भावार्थे ॥ ५२ ॥

अहंकार न साहे भगवंता ॥ तयातें ही स्वयें अहंकार होतां ॥ शिर गळाले तत्वतां ॥ हयग्रीव तो जालासे ॥ ५३ ॥

तेथे इतर जनाची वार्ता ॥ केवीं सामावे हे कथा ॥ यालागीं अभिमान सर्वथा ॥ नाणिजे वृथा मानसीं ॥ ५४ ॥

मी कर्ता ऐशिया वचनासी ॥ धरिता दुरावे ह्रषीकेशी ॥ आचरेल जे पुण्यराशी ॥ ते तंव नाशी क्षणार्धे ॥ ५५ ॥

आणीक असे एक ॥ कारण तेही ऐका नावेक ॥ जे व्रत आचरावे देख ॥ मध्यंतरीं न सोडावे ॥ ५५ ॥

कैसीही पडो दे काळवेळ ॥ परि न सोडावे व्रत अढळ ॥ मध्येंचि सोडितां निर्फळ ॥ होय तात्काळ सर्वही ॥ ५७ ॥

तस्मिन्मलिम्लुचेपाते येनकेनापिमानवैः ॥ दानं देयं विशेषेण संसारभयभीरुभिः ॥ ८ ॥

संसार सुफळ व्हावा ॥ वाटे जया जिवाभावा ॥ तयाने व्रतनेम करावा ॥ येर आभावा चाड नाहीं ॥ ५८ ॥

दुर्लभ नरदेह पाहीं ॥ शेवटीं नासोनियां जाई ॥ याचे

सार्थक करावे कांहीं ॥ ऐसा न येई मागतां ॥ ५९ ॥

कृपाळू तो जगदीश्वर ॥ तयानें कथिलासे दानप्रकार ॥ अल्पवेंचें लाभ थोर ॥ करा व्यापार भावार्थे ॥ ६० ॥

उदरालागीं अन्यत्र व्यापार ॥ करिताती नारी अथवा नर ॥ परी हा तंव धर्म व्यापार ॥ विरळा नर आचरे ॥ ६१ ॥

जयाते पुण्य पूर्वीचा संचय ॥ तयाचेंचि उकले ह्रदय ॥ पुण्यमार्गे तोचि जाय ॥ येरा क्षय पुण्यासी ॥ ६२ ॥

जयाते वाटेल मनीं ऐसे ॥ कीं पुण्यमार्गे सौख्य दिसे ॥ तयानें व्रत कीजे सायासे ॥ इतरां नसे तो मार्ग ॥ ६३ ॥

या उभयमार्गी जे मानेल ॥ तेची कीजेहो प्रांजळ ॥ लक्ष्मीप्रति घननीळ ॥ सांगे सकळ विस्तारे ॥ ६४ ॥

स्वस्ति श्रीमलमास माहात्म ग्रंथ ॥ पद्म पुराणींचे संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ एकादशोध्याय गोड हा ॥ ११ ॥

ओव्या ॥ ६४ ॥ श्लोक ८ ॥

॥ इति एकादशोध्यायः ॥

-----------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय बारावा

श्रीगणेशाय नमः ॥ जय सद्‍गुरु समर्था ॥ अनाथनाथा कृपावंता ॥ मुमुक्षु शरणांगत होता ॥ जन्मवार्ता तया नाहीं ॥ १ ॥

ऐसे देतसां कृपादानासीं ॥ म्हणोनि शरणांगत पायासीं ॥ भावार्थ धरून मानसीं ॥ शरण चरणांसी आलों असें ॥ २ ॥

मी तंव अनंत अपराधी ॥ अगणित पापाची वृद्धी ॥ परी कृपाळू तूं दयानिधी ॥ नेई सिद्धी परमार्थ ॥ ३ ॥

ऐका श्रोते हो सावधान ॥ मलमास परम आख्यान ॥ मागील अध्यायीं कथन ॥ व्यतीपात वैधृती महिमा वर्णिला ॥ ४ ॥

पांच पर्वे यांचा प्रश्न ॥ लक्ष्मीनें केलासे आपण ॥ तयामाजी सांगितले दोन ॥ पुढें अवधान देइजे ॥ ५ ॥

शताच्छतं च संक्रांतौ ॥ शतोत्थं विषुवेषुच ॥ युगादौ तच्छतगुणमयनेतच्छताधिकं ॥ १ ॥

सोमग्रहे शतगुणं तच्छतं तुरविग्रहे ॥ असंख्यत्वं व्यतीपाते दानंदानविदोविदुः ॥ २ ॥

उत्पातौ लक्षगुणितं भ्रमणे कोटिरुच्यते ॥ अर्बुदं पतने प्रोक्तमक्षय्यं पतिते फलं ॥ ३ ॥

शुभेव्यतीपातदिनेवहन् स पंचगव्येन महानदीजले ॥ उपासते यो यमुनानदीजलं जप्येच शुद्धो व्यती पात ते नमः ॥ ४ ॥

श्रीविष्णु वदतसे निकें ॥ ऐक क्षीराब्धिकन्यके ॥ मागें कथिलें पर्व देखें ॥ पुढें ऐकें अति आदरें ॥ ६ ॥

व्यतीपात वैधृती वर्णन ॥ तुज म्यां केलें निरोपण ॥ तयाहि परी शतगुण ॥ ऐकें महिमान पुढारी ॥ ७ ॥

शत संक्रांतीचें फळ एके ठायीं ॥ तयावरी शतपर्वणी अधीक पाहीं ॥ युगायुगीं मासादि आयनेंही ॥ होत असे विशेष ॥ ८ ॥

तया शतगुणें अधिक ॥ चंद्रग्रहण असे देख ॥ तयाते शतगुणें एक ॥ सूर्यग्रहण बोलिलें असे ॥ ९ ॥

असंख्य व्यतीपात केले दान ॥ कोटितीर्थी केलेंसे भ्रमण ॥ किंवा पंचगव्यादि प्रायश्चित्ते जाण ॥

व्यतीपातस्नान गंगोदका ॥ १० ॥

कोटि पुरश्चरणें जप पाहीं ॥ चंद्रसूर्यग्रहण होई ॥ तया वरिष्ट अधिक पाहीं ॥ ऐकें नवाई शुभानने ॥ ११ ॥

अहोहे पूर्णिमा महिमा ॥ वर्णू न शके चतुर्वक्र ब्रह्मा ॥ तेथें बोलावयाची मीसा ॥ बोलतां बोले न बोलवे ॥ १२ ॥

पूर्णिमा दिनीं प्रातःस्नान ॥ जो नर करी आपण ॥ तया ऐसा पुण्यवान ॥ दुजा आन असेना ॥ १३ ॥

किंचित सुवर्ण अथवा कांहीं ॥ दान दीजे ब्राह्मणाते पाहीं ॥ विप्रभोजन माध्यान्ह समयीं ॥ त्या एवढा नाहीं पुण्यवान ॥ १४ ॥

षड्रस मिष्टान्न पाहीं ॥ वाढी ब्राह्मणातें स्वगृहीं ॥ वरी दक्षिणेसहीत वस्त्र तेंही ॥ अर्पी भावें आदरें ॥ १५ ॥

वैशाखी कार्तिकी माघी रौद्री ब्राह्मीच वैष्णवी ॥ विशेष फलदास्तिस्त्रः पिंडदानेऽक्षयंफलं ॥ ५ ॥

वैशाखीं कार्तिकीं माघीं ॥ श्रेष्ठता जाणिजे तिघीं ॥ फाल्गुनीं चैत्रीं नवविधी ॥ पौषी त्रिशुद्धि जाणिजे ॥ १६ ॥

या इतुकियां पूर्णिमेतें ॥ वेगळालीं असे दैवतें ॥ तेहीं परिसावूं तूंतें ॥ ऐक निरुते भामिनी ॥ १६ ॥

ज्येष्ठ पूर्णिमाते पाहीं ॥ ब्रह्म सर्वत्रीं दैवत राहीं ॥ आषाढी ते नारायणरूपेही ॥ असे तेही जाणिजे ॥ १८ ॥

म्हणोन करावे व्यासपूजन ॥ व्यासरूपे साक्षात नारायण ॥ यालागीं करावे पूजन ॥ भाव धरूनि मानसीं ॥ १९ ॥

नादिसिद्ध हे आषाढी ॥ पूर्वी हंसरूपी श्रीयागुढी ॥ म्हणोनि परम हंस प्रौढी ॥ परंपरा पुढी चालतसे ॥ २० ॥

परमहंसरूपे नारायण ॥ म्हणोनि व्यासरूपे नारायण ॥ यालागीं अगत्य कीजे पूजन ॥ हंसरूपे नारायण म्हणोनी ॥ २१ ॥

माघमासी माधव देवता ॥ फाल्गुनीं रुद्रतत्वता ॥ चैत्र दैवत अनंता ॥ असे तत्वता निर्धारि ॥ २२ ॥

वैशाखीं पितृदैवत जाण ॥ मार्गशीर्षी यक्षकिन्नर जाण ॥ देवी भवानी ते जाण ॥ पौषी पौर्णिमा बोलिजे ॥ २३ ॥

ऐसिया पर्वकाळीं जाण प्रतिमासीं कीजे पिंडदान ॥ तेणे समग्र देवता तुष्टमान ॥ आशिर्वचन पै देती ॥ २४ ॥

स्नानविधी दान पुण्य ॥ जे आचरती भावे जाण ॥ तयाचे ऋण जाय निरसून ॥ नसे अनुमान यदर्थी ॥ २५ ॥

पंचमहा यज्ञ पितृतर्पण ॥ यथोक्त कीजे ब्राह्मण भोजन ॥ प्रतिमासीं जे करिती आचरण ॥ तया नारायण संतुष्टे ॥ २६ ॥

मासामासाचे ठायीं जाण ॥ येतसे तिथी पर्व लक्षून ॥ तरी कां करावे अनमान ॥ बहुत धन लागेना ॥ २७ ॥

अल्पवेचे पुण्यविशेष ॥ परी कोणी न धरिती सायास ॥ येईवीं पिशुन येता गृहास ॥ करिती सायास आदरे ॥ २८ ॥

तेथे खर्च करिती भलतैसा ॥ व्यर्थ वेचिती वयसा ॥ परी सत्कारणीं न वेचिती पैसा ॥ गर्जतसे ठसा पुराणीं ॥ २९ ॥

पुराणिक सांगतचि गेले ॥ व्यासादिकीहीं काव्य केले ॥ पुराणे विस्तारून ठेविले ॥ परि जन न चाले या वाटे

॥ ३० ॥

फुकट स्वल्पाचेही स्वल्प ॥ ते कोणीही न नेणती अल्प वृथा जल्पताती जल्प ॥ अभिमाने कल्प भोगिती ॥ ३१ ॥

शिश्नोदर पारंगत ॥ जगामाजी रूढी बहुत ॥ नेणोनियां हिताहित ॥ भगवंती देख अंतरले ॥ ३२ ॥

वीट न मानावा बोलण्याचा ॥ पुढे मागुता नरदेह कैचा ॥ क्षणेक संग रतिसुखाचा ॥ नये कामाचा बापानों ॥ ३३ ॥

जाय पाहतां सोन्याची घटी ॥ मागुती नये लक्षितां लक्षकोटी ॥ करितां संसाराची आटाटी ॥ जन्म शेवटी निर्फळ ॥ ३४ ॥

उदरालागीं करावे नीचसेवन ॥ तेथे पापपुण्य न विचारितां धन ॥ मेळवावे संसारालागून ॥ शेवटीं कणव सांगाती ॥ ३५ ॥

हे तो जगाची जगप्रौढी ॥ प्रचीत पाहाताती रोकडी ॥ परी कोणीही न करिती तातडी ॥ प्रपंच सांकडी उगवावया ॥ ३६ ॥

असो जे करतिल जैसे ॥ ते तंव भोगितिल तैसे ॥
क्रोध येऊं नये मानसे ॥ वदलो फारसे म्हणवूनी ॥ ३७ ॥

कथाभाग राहिला मागे ॥ सांप्रत तो वदावा लागे ॥
पूर्णिमा महिमा रमारंगे ॥ सांगितला निजांगे रमेलागीं ॥ ३८ ॥

यावज्जीवं मर्त्यलोके स्नानदानादिभिः कृतैः ॥
स्नानेनैकेन पूर्णायां दिनं भवति सार्थकं ॥ ६ ॥

क्षणेक जाणूनि संसार ॥ दयाळू तो जगदीश्वर ॥
मृत्युलोका केला प्रसर ॥ तरणोपाय मानवाते ॥ ३९ ॥

बहुत सुगम सुलभ उपावो सांगितलासे देवाधिदेवो ॥
पूर्णिमादिनीं स्नानदानातपावो ॥ कीजे निर्वाहो जन्माचा ॥ ४० ॥

आपुला जन्म सार्थक करून ॥ कीजे पूर्वजांचे उद्धरण ॥ येविषयींचें कथन ॥ स्वयें जनार्दन वदतसे ॥ ४१ ॥

ऐकेंहो क्षीराब्धिबाळी ॥ अमावास्येची नव्हाळी ॥
श्रवण केलिया सकळी ॥ होय होळी पापाची ॥ ४२ ॥

मासा मासाचिया अंतीं ॥ येतसे अमावास्या तिथी ॥

तरी स्नान दान यथापद्धती ॥ करावें निगुती आदरें ॥ ४३ ॥

सारूनि स्नान संध्या देवतार्चन ॥ करूनियां महाहवन ॥ मग कीजे तिळतर्पण ॥ ब्राह्मण भोजन यथाविधी ॥ ४४ ॥

श्राद्ध कीजे यथास्थित ॥ पिंडदान करून युक्त ॥ तेणें पितृगण संतोषत ॥ आशीर्वाद देत कुळातें ॥ ४५ ॥

ऐसे प्रत्यही अमावास्येसीं ॥ आचरावें निश्चयेसी ॥ तये दिनीं पितृलोकासी ॥ पितरासीं संतोष ॥ ४६ ॥

तये दिनीं पितरांलागून ॥ पितृलोकीं करिता सन्मान ॥ देऊनि मिष्टान्न भोजन ॥ तेणें पितृगण आनंदती ॥ ४७ ॥

मग संतोषून देती आशीर्वचन ॥ तेणें वंशवृद्धि होतसे जाण ॥ जयातें वाटे व्हावें कल्याण ॥ पावे सदन वैकुंठीं ॥ ४८ ॥

तेणें अवश्य करावें पिंडदान ॥ न केलिया अपाय दारुण ॥ आणि मोक्षरूप कल्याण ॥ सावधान परिसावें ॥ ४९ ॥

एकमासवरी उपोषण ॥ पितरांतें होतसे जाण ॥ मग तयातें करावें लागे वायुभक्षण ॥ तंव ते कोपून शापिती ॥ ५० ॥

त्याचिया शापास्तव पाहीं ॥ संसारपुरीं न पडेचि कांहीं ॥ कष्टी होती सर्वदांही ॥ म्हणती आमुचें दैव हेंचि पैं ॥ ५१ ॥

आदौ आचरण करिती सरस ॥ मग बोल ठेविती प्रारब्धास ॥ कुसमुसोन साधिती संसारास ॥ धरूनि हव्यास निजमनीं ॥ ५२ ॥

जिता धड न बोलती वचन ॥ मग कोठून करतील पिंडदान ॥ जळो ऐसियाचें पुत्रपण ॥ काय वांचून संसारी ॥ ५३ ॥

धन्यधन्य ते पितृभक्त ॥ अमान्य न करिती वचनाते ॥ सदांसर्वदां पुरविती हेत ॥ मागीतला पदार्थ देताती ॥ ५४ ॥

जिवंत असतां सन्मान ॥ मेलिया करिती गयावर्जन ॥ प्रतिमासें अमावास्येसी जाण ॥ ब्राह्मणभोजन श्राद्धयुक्त ॥ ५५ ॥

सुफळ तयाचा संसार ॥ सदां तुष्टमान श्रीधर ॥

आशीर्वाद देती अमर ॥ हो कल्याण म्हणोनी ॥ ५६ ॥

ऐसे जे कां पितृभक्त पाहीं ॥ माझें नमन तयांचें पायीं ॥ हेचि बुद्धि सर्वकाळ ह्रदयीं ॥ देवो शेषशायी परमात्मा ॥ ५७ ॥

सांप्रत कलीमाजी पुत्रपण ॥ किंचित् ऐकावें वर्णन ॥ क्रोधें न भरावें पूर्ण ॥ नसा अमान्य वचनासी ॥ ५८ ॥

आपुलिया सुखस्वार्था ॥ पिता सांचवी द्रव्यार्था ॥ नेणोनि पापपुण्य पंथा ॥ धन सर्वथा सांचवीतसे ॥ ५९ ॥

म्हणे मुलें माझीं अज्ञान ॥ माझेंहि झालें वृद्धपण ॥ कामा येई शेवटी धन ॥ पुत्रालागून माझिया ॥ ६० ॥

मग ते पुत्र होती तरुण ॥ पितयातें आलें वृद्धपण ॥ सदां हेळसिती दारुण ॥ मागता धन न देती ॥ ६१ ॥

पिता आपुले धन मागे ॥ तयावरीं डोळे फिरविती रागें ॥ म्हणे मी याचें काय ऋण लागें ॥ वडिलोपार्जित पहिलें ॥ ६२ ॥

बालत्वा पासुनि पाळिला ॥ तोंडीचा घांस चारिला ॥ शेवटीं पुत्र कामा न आला ॥ वृद्धपणी पितयातें ॥ ६३

॥

ऐसेही पुत्र असती ॥ नको देवा ऐशियाची संगती ॥ जिता नाही नाहीं गती ॥ मेलिया सद्गती केवी होय ॥ ६४ ॥

म्हणोनि एकची पुत्र भला ॥ जेणें कुळाचा उद्धार केला ॥ येही परत्रसाधनीं भला ॥ वंशा केला उद्धारु ॥ ६५ ॥

ऐसे जे का सुपुत्र पाहीं ॥ तेची आचरती अमावास्याही व्रताही ॥ आणीक पुण्यकर्म पाहीं ॥ परलोक पाही साधिती जे ॥ ६६ ॥

जे नर करिती पिंड दानाते ॥ वरी आचरती व्रताते ॥ तयाहीवरी मलमासातें ॥ विशेष पर्वणी अमावास्या ॥ ६७ ॥

वर्धते प्रत्यहं सत्यंनात्र कार्या विचारणा ॥ मासिमासित्वमावास्या दिनेप्राप्ते नराधमाः ॥ ७ ॥

ऐसींहीं पर्वे दोन पाहीं ॥ पूर्णिमा अमावास्या तेही ॥ तुम्हां निवेदिलें सर्वही ॥ शेषशायी वदला असे ॥ ६८ ॥

जे नर ऐकूनि नाचरती ॥ पुराण श्रवणीं न बैसती ॥ तयाची न चुके यातायाती ॥ पुनरावृत्ती चुकेना ॥ ७९ ॥

पितरातें न करिती तोष ॥ तयाची संतती होय नाश ॥ यालागीं श्लोकाधार विशेष ॥ श्रवण कीजे आदर ॥ ७० ॥

तंमासं पितरस्तस्य कुर्वतो वायु भोजनं ॥ तस्य विघ्नं प्रयच्छंति क्षुधितास्तृषितास्तथा ॥ ८ ॥

ते संततिं नाशयंति संपदो भवनानिच ॥ तस्मादमायां कर्तव्यं स्नानदानजपादिकं ॥ ९ ॥

यालागीं श्रोतेजनहो ॥ मलमासातें पाहाहो ॥ अगत्य व्रतातें आचराहो करालाहो परमार्थाचा ॥ ७१ ॥

जैसा लाहो घेता संसारीं ॥ तैसाच कीजे परमार्थावरी ॥ तेणें चुकेल येरझारी ॥ जन्मवरी खंडेल ॥ ७२ ॥

हा नरदेह परम सांग ॥ येथे धरावा सत्संग ॥ सत्संगाविण साधनमार्ग ॥ हाता न लागे सर्वथा ॥ ७३ ॥

म्हणोन मलमास अवधी ॥ साधाहो हेची संधी आधी ॥

गांठ घाला मूळ पदीं ॥ भजा गोविंदीं आदरें ॥ ७४ ॥

स्वस्ति श्री अधिक माहात्म ग्रंथ ॥ पद्मपुराणींचे संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ द्वादशोध्याय गोड हा ॥ १२ ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ओव्या ७४ ॥ श्लोक ९ ॥

॥ इति द्वादशोध्यायः ॥

------------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय तेरावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ जयश्री सर्वोत्तम वासुदेवा ॥ दामोदरा अनंता केशवा ॥ क्षीराब्धिजामाता रमाधवा ॥ देवाधिदेवा दयानिधे ॥ १ ॥

तव चरणसरोजीं प्रेमा ॥ अखंड देई सर्वोत्तमा ॥ नाम वदायाची सीमा ॥ शेषातेंही गती नव्हे पै ॥ २ ॥

तेथें मी अल्पमती पामर ॥ वदेन म्हणतों स्तुतिउत्तर ॥ एक जिव्हेचा प्रसर ॥ केवि विस्तार साहों शके ॥ ३ ॥

परी आत्मसार्थक करावें कांहीं ॥ म्हणोन आरंभिलीसे नवाई ॥ कृपाळुत्वें शेवटास न्यावी ॥ हेची परिसावी विज्ञापना ॥ ४ ॥

मी नेणें जपतपसाधन कांहीं ॥ दानधर्म व्रतें उद्यापनें पाहीं ॥ करावयातें धनही नाहीं ॥ गृहीं संग्रहीं तूं जाणता ॥ ५ ॥

निशिदिनीं संसाराची हळ ॥ सदां चित्तीं वाटे तळमळ ॥ तेणें न गमेची काळवेळ ॥ म्हणोनिया खेळ आरंभिला ॥ ६ ॥

तरी कृपा करूनि रमारंगें ॥ न्यून तें पूर्ण करावें अंगें ॥ रसोत्पती रसवेगें ॥ जीवन घाली दयाळुवा ॥ ७ ॥

समर्थे मुक्ताफळाची लाखोली ॥ वाहतां हरुष ह्रदयकमळीं ॥ दरिद्रें तुळसीदळें समर्पिलीं ॥ तरी का न स्वीकारा स्वामियां ॥ ८ ॥

श्रीमानें नैवेद्य पक्वान्न ॥ अर्पिता तोषलें मन ॥ दरिद्रियाचें किंचित कदान्न ॥ काय अव्हेरून सांडावें ॥ ९ ॥

तैसे थोर थोरांनीं प्रबंध केले ॥ नानापरीं गीतीं आळविले ॥ तयाचे लळे पुरविले ॥ मज अव्हेरितां

भलें नोहे कीं ॥ १० ॥

असो कृपा कराल श्रीहरी ॥ तरीच वदेल वैखरी ॥
सरस्वती बैसे जिव्हाग्रीं ॥ मनतुरंगीं आत्माराम ॥ ११
॥

ऐकां संत श्रोते सज्जन ॥ पांचा पर्वाचा केला प्रश्न ॥
तया माजी चार संपूर्ण ॥ मागें निवेदन जालेंसे ॥ १२
॥

व्यतीपात वैधृती पाहीं ॥ पूर्णिमा अमावास्याही ॥
ऐसीं पर्वे चार पाहीं ॥ केलें सर्वही कथन पै ॥ १३ ॥

आतां पांचवें पर्व तें कवण ॥ तयाचें ऐकावें निरोपण ॥
लक्ष्मीप्रती नारायण ॥ सांगता जाहलासे ॥ १४ ॥

लक्ष्मी रुवाच ॥ पुरुषोत्तम ह्रषीकेश भक्तिप्रिय
दयानिधे द्वादश्याश्वैध माहात्म्यं वद लोकहितायच ॥ १
॥

लक्ष्मी वदे जी पुरुषोत्तमा ॥ भक्तकामकल्प द्रुमा ॥
मागें निवेदिला महिमा ॥ पूर्णिमा अमावास्या ते ॥ १५
॥

उपरी पर्व राहिलेंसे एक ॥ तेंही परिसावें नावेक ॥

व्रतामाजी श्रेष्ठता अनेक ॥ कैसेनि देख स्वामीयां ॥ १६ ॥

तरी कृपा करुनि समग्र ॥ लोकहितार्थ वदावें साचार ॥ जे ऐकतां जडमूढउद्धार ॥ तात्काळिक होय पै ॥ १७ ॥

श्रीकृष्ण उवाच ॥ श्रृणु देवि प्रवक्ष्यामि द्वादशीफलमुत्तमं ॥ मलमासें विशेषेण मुनिभिर्भाषितं पुरा ॥ २ ॥

विष्णु बोलते झाले उत्तर ॥ एक क्षीराब्धिजे सादर ॥ पर्वामाजी पर्व थोर ॥ विशेष सत्कार द्वादशीं ॥ १८ ॥

तयामाजी मलमास ॥ पातल्या विशेषाविशेष ॥ आदरें आचरलिया व्रतास ॥ तुटें पाश यमाचा ॥ १९ ॥

हें ऐकतां महिमान ॥ पापें भस्म होती जाण ॥ यदर्थी नसे अनुमान ॥ सावधान परिसावें ॥ २० ॥

समग्र तीर्थांची गर्जना तोंवरी ॥ संपूर्ण यज्ञक्रिया बरी ॥ अवघीहीं पर्वे पृथ्वीवरी ॥ न पवतीसरी द्वादशीतें ॥ २१ ॥

संपूर्ण पर्वाचें फळ पाहीं ॥ न तुळे द्वादशीचें ठायीं ॥

काय सांगो तेथीची नव्हाई ॥ मी शेषशायी वदतसें ॥ २२ ॥

यज्ञ केलियाचें फळ ॥ अथवा प्रयागीं स्नान गंगाजळ ॥ तेथींचा कल्पवास प्रबळ ॥ सेविला सर्वकाळ आदरें ॥ २३ ॥

तरीं द्वादशीतें तुळणा नाहीं ॥ शास्त्र देती याची ग्वाही ॥ प्रत्ययो घेइजे स्वदेहीं ॥ केलिया पाहीं व्रताते ॥ २४ ॥

उपोषण एकादशी दिने ॥ द्वादशींत कीजे पारणें ॥ ब्राह्मण संतर्पण मिष्टान्ने ॥ आणीक दानें नानाविध ॥ २५ ॥

आणीक करावें पिंडदान ॥ श्राद्धतिथी असो नसो जाण ॥ परि अगत्य कीजे श्राद्धसाधन ॥ घडे पुण्य कोटीगुणें ॥ २६ ॥

हें तव त्रिरात्रीचें व्रत ॥ दशमीपासोन द्वादशीयुक्त ॥ तिन्ही देवता मूर्तिमंत ॥ वसताती तेथें निश्चयीं ॥ २७ ॥

दशमीते दैवत चतुरानन ॥ एकादशी गिरिजारमण ॥ द्वादशीतें विष्णु आपण ॥ वास्तव्य स्थान त्रिवर्गी ॥ २८ ॥

दशमीतें दृश्य दोष त्यागावे ॥ एकादशीं वर्जावे ॥ द्वादश द्वादशी तें बरवे ॥ आधीं त्यागावे शास्त्राधारे ॥ २९ ॥

परान्न गृहान्न उष्णोदक ॥ सर्व स्नेह खट्वांग देख ॥ लवण ताबूल स्त्रीसंग सुखदुःख ॥ एकभुक्त दशमीते ॥ ३० ॥

ऐसें एकादशी दिनीं ॥ एक अधिकतये स्थानीं ॥ अन्न न स्वीकारावे जनीं ॥ एकादशी म्हणून बोलिजे ॥ ३१ ॥

आता द्वादशीते वर्ज कीजे ॥ दिवा निद्रा न सेविजे ॥ शास्त्राधार बोलिजे ॥ ऐके क्षीराब्धीतनये ॥ ३२ ॥

ऐसे विधियुक्त एकादशी ॥ व्रत कीजे सायासेंसी ॥ वरी साधनद्वादशी ॥ ब्राह्मणेसी विधियुक्त ॥ ३३ ॥

त्याहीवरी केलिया पिंडदान ॥ ते तंव विशेषाहून विशेष जाण ॥ तेणे केले गयावर्जन ॥ पितृउद्धारण कुळाशी ॥ ३४ ॥

तुळसीपत्रासमान ॥ अर्पिला जरी पिंड जाण ॥ तरी ते मज मेरूसमान ॥ वदे नारायण स्वमुखे ॥ ३५ ॥

कृता यज्ञाखिलास्तेन गयायां पिंडपातनं ॥ अहो धन्याश्वते धन्या येषां बुद्धिर्हरेर्दिने ॥ ३ ॥

तुळशीपत्रमिश्रानं मक्षिकापादमात्रकं ॥ द्वादशां ब्राह्मणेदत्तं तदन्नं मेरुतां व्रजेत ॥ ४ ॥

मलमासाची द्वादशी ॥ जरी उपोषण घडे ते दिवशीं ॥ तया ऐसा पुण्यराशी ॥ दुजा आन असेना ॥ ३६ ॥

जन्मांतर सहस्रेन ॥ तयाने जिंकिलेसे जाण ॥ वरी ब्राह्मण संतर्पण ॥ पूजाविधान यथोचित ॥ ३७ ॥

ऐसें व्रत भावें आचरतां ॥ यमरावो वोढवी माथा ॥ तया दुरिताची वार्ता ॥ बोलो नयेचि राजसे ॥ ३८ ॥

तये दिनीं ब्राह्मणालागून ॥ जरी वस्त्र करविले परिधान ॥ तरी कल्पपर्यंत स्वर्गभोग जाण ॥ तयालागून प्राप्त होय ॥ ३९ ॥

विष्णुमाधवप्रीत्यर्थ ॥ जरीं आचरेल हे व्रत ॥ ब्राह्मणभोजन यथार्थ ॥ विष्णुप्रीत्यर्थ द्वादशीसी ॥ ४० ॥

सुवर्णदान सहस्रदान ॥ रौप्यदान उपानहदान ॥ छत्रासहीत पादुकादान ॥ पुरुषोत्तमा अर्पण कीजे ॥

४१ ॥

घृतदान घृतपाचित पक्वान्न ॥ त्रयोदशगुणी तांबूल दान ॥ गंधपुष्प सुदान ॥ कीजे अर्पण यथाविधीं ॥ ४२ ॥

इतुके दान केलिया पाहीं ॥ वैकुंठवास तयातें होई ॥ मलमास द्वादशीठायीं ॥ शेषशायीं संतुष्टे ॥ ४३ ॥

यथाऋतुकाळे फळे ॥ कर्दळी फळें नारीकेळे ॥ खर्जूरी लवंगा पूगीफलें ॥ जायफळादी आदरें ॥ ४४ ॥

कपिला गोदानें नेमस्त ॥ महिदान अश्वासहित ॥ गजअजादी रथगणीत ॥ अर्पणकीजे द्विजातें ॥ ४५ ॥

इतुकीं दानें सांगितलीं देख ॥ परी घृतदानाचें महात्म अधिक ॥ मलमास पर्वणी आवश्यक ॥ कीजे देख यथाविधी ॥ ४६ ॥

कांस्यपात्रीं घालूनियां घृत ॥ सुवर्णप्रतिमासंयुक्त ॥ पूजा करूनि नेमस्त ॥ दीजे दान विप्रालागीं ॥ ४७ ॥

त्याही वरी घृतपाचिक पक्वान्न ॥ तेंही कांस्यपात्रीं घालून ॥ घृतासहीत पूजा करून ॥ ब्राह्मणाकरीं

अर्पिजे ॥ ४८ ॥

संख्या तयाची त्रीणि दशक ॥ वरी त्रीणि अधीक देख ॥ ऐसें करूनियां आवश्यक ॥ दीजे सम्यक विप्रांतें ॥ ४९ ॥

साक्षर विप्रालागीं बरवें ॥ पूजा करूनि वस्त्र द्यावें ॥ वरी दक्षिणेसहीत दान अर्पावें ॥ तेणें पावे स्वर्गवासु ॥ ५० ॥

द्वादशी ऐसें दुजें पर्व ॥ काशी ऐसें क्षेत्र अपूर्व ॥ तीर्थामाजी विशेष गौरव ॥ प्रयागराज जाणिजे ॥ ५१ ॥

द्वादशीं केलिया अन्नदानें ॥ कोटिकुळें उद्धरलीं तयानें ॥ नरकीं तारिले पितृगण ॥ ऐक महिमान शुभानने ॥ ५२ ॥

सकळ दानामाजी वरिष्ठ ॥ अन्नदान अतिश्रेष्ठ ॥ म्हणोनि महिमा उत्कृष्ट ॥ वर्णिला श्रेष्ठ पुराणीं ॥ ५३ ॥

असाक्षी भोजन द्वादशी ॥ तया ऐसा न देखो दोषी ॥ अनकूल असे ज्या समयासी ॥ तेंचि ब्राह्मणासीं अर्पिजे ॥ ५४ ॥

चित्त आशेतें न धरावे ॥ भगवंतीं विन्मुख न व्हावें ॥ अतिथी विन्मुख नसावे ॥ वित्त असोनी जवळीक ॥ ५५ ॥

सर्वांचे अंतर ह्रद्गत ॥ स्वये जाणें त्रैलोक्यनाथ ॥ तयातें करितां वंचनार्थ ॥ पावे अघात रोकडा ॥ ५६ ॥

यालागीं उत्तम अथवा मध्यम ॥ सकळ श्रोतीं धरि जे नेम ॥ बहुतीं मार्ग हा सुगम ॥ निर्मून ठेविला अनंतें ॥ ५७ ॥

ये विषयीं इतिहास पुरातन ॥ होऊन ऐकिजे सावधान ॥ पूर्वी सूर्यवंशीं राजा पुण्यवान् ॥ अंबरीष जाण नाम तया ॥ ५८ ॥

सार्वभौम सर्वा वरिष्ठ ॥ तपोबळें अति उत्कृट ॥ अति धैर्य गांभीर्य श्रेष्ठ ॥ भक्ती एकनिष्ठ जयाची ॥ ५९ ॥

प्रजेलागी अति कनवाळु ॥ विप्रालागीं परम स्नेहाळु ॥ रिपुद्रुमालागीं जैसा काळु ॥ कृतांतवत तयाते ॥ ६० ॥

परम धर्मिष्ठ ह्रदयीं ॥ आडकाठी कवणातें नाहीं ॥ व्रत नेम उद्यापनें पाहीं ॥ सदांसर्वदांही चालवीत ॥ ६१ ॥

विन्मुख नव्हेची कवणातें ॥ मागितलें अर्पितसे त्यातें

॥ आपत्यापरी मागत्यातें ॥ लळे त्याचे पुरवीत ॥ ६२ ॥

ऐसें असतां वरिष्ठ ॥ द्वादशी नेम अचाट ॥ साधनयुक्त द्वादशी श्रेष्ठ ॥ नृपवरिष्ठ आचरतसें ॥ ६३ ॥

सहस्त्रावधी ब्राह्मणपंक्ती ॥ घेऊन साधी द्वादशी तिथी ॥ न उगवताची गभस्ती ॥ साधन रीती साधीतसे ॥ ६४ ॥

ऐसे लोटतां काळ बहुत ॥ पुण्य संग्रहो जाला अपरिमित ॥ इतुकेंही असुनि गर्वरहित ॥ नृपनाथ वेगळा तो ॥ ६५ ॥

तंव वासवा अंगी भय दारुण ॥ माझें पद घेईल हिरून ॥ चिंता करी रात्रंदिन ॥ तंव नवल पूर्ण वर्तलें ॥ ६६ ॥

अकस्मात ऋषी दुर्वास ॥ येता झाला इंद्रसभेस ॥ वासवें सन्मानोनि बहुवस ॥ षोडशोपचारें पूजिला ॥ ६७ ॥

बैसवूनियां निजासनीं ॥ स्वागत पुसिलें तये क्षणीं ॥ स्वस्ति क्षेम विप्र वदोनी ॥ पाहे नयनीं तयातें ॥ ६८ ॥

तंव परम कृश जालें शरीर ॥ शोकें उतरला मुखचंद्र ॥

देखूनी बोले मुनीश्वर ॥ दुःख अपार ह्रदयीं दिसे ॥ ६९ ॥

येरू म्हणे महाराजा ॥ उपाव न देखोंजी दुजा ॥ मग समग्र वृत्तांत वोजा ॥ ऋषिवर्या सांगतसे ॥ ७० ॥

म्हणें अंबरीष परम विख्यात ॥ तपोतेजें आगळा अमित ॥ द्वादशी व्रतातें आचरत ॥ न चाले तेथें उपावो ॥ ७१ ॥

ऐसियासी करूं मी काहीं ॥ ह्रद्रोग हा परम माझे जीवी ॥ म्हणोन पायीं ठेविली डोई ॥ सांगा काई मजलागीं ॥ ७२ ॥

जयातें ह्रद्रोग लागला ॥ तो रोगी दे नखो वांचला ॥ महद्रोग जयातें जाला ॥ तरी धन्वंतरी तयाला वांचविती ॥ ७३ ॥

परी ह्रद्रोगी प्राणियातें ॥ कवण वांचवूं शके तयातें ॥ एक सद्‌गुरु वांचून त्यातें ॥ उपाय अन्य असे ना ॥ ७४ ॥

तरीं तुम्ही सद्‌गुरु वरिष्ठ ॥ सकळ ऋषींमाजी श्रेष्ठ ॥ अमृतवचनीं स्पष्ट ॥ देऊनि रोग कुष्ट निवारा ॥ ७५ ॥

ऐकून वासवाची ग्लानी ॥ कोमलह्रदय दुर्वास मुनी ॥ अंतरीं परम कळवळोनी ॥ बोलतवाणी ते ऐका ॥ ७६ ॥

द्वादश्यां यत्कृतं सर्वमक्षय्यंतद्भवेदिह ॥ द्वादश्यामक्षयंदानं द्वादश्यामक्षयोजप: ॥ ५ ॥

दुर्वास वदे वासवा पाहीं ॥ द्वादशी ऐसें व्रत दुजें नाहीं ॥ जे आचरती सदां सर्वदाही ॥ त्या एवढा नाहीं पुण्यश्लोक ॥ ७७ ॥

अक्षयी स्वर्गवास तयातें ॥ प्राप्त होय जाण निरुतें ॥ द्वादशीये पुण्यव्रतातें ॥ साम्यता आन असेना ॥ ७८ ॥

अक्षयीतीर्थी स्नान केलें ॥ अथवा तपव्रत जरी केलें ॥ यज्ञयागादिही साधिलें ॥ उपासिलें ज्ञानयोग पै ॥ ७९ ॥

तरी नातुळे द्वादशी समता ॥ ऋषी देव गंधर्वादि तत्वता ॥ आचरलिया व्रता ॥ वंद्य सर्वथा ते जाले ॥ ८० ॥

व्रत आचरला चतुरानन ॥ कुबेरासहित सिद्धगण ॥ तयातें प्राप्त जालें पदनिर्वाण ॥ अक्षयी भानु तोंवरी पावे ॥ ८१ ॥

स्वयें वासवा तूंतें पाहीं ॥ इंद्रपद लाधलें पूर्ण कमाई ॥ याचि व्रत प्रभावें पाहीं ॥ अधिप सुरगणातें ॥ ८२ ॥

यमधर्म आचरे व्रत ॥ ते पद जालें तरी प्राप्त ॥ साधन द्वादशी कैलासनाथ ॥ स्वयें आचरे व्रताते ॥ ८३ ॥

ऐसे हे व्रत अति श्रेष्ठ ॥ आचरतसे नृपराव वरिष्ठ ॥ तया अपाय करावयाचे कष्ट ॥ कवण नष्ट करूं शके ॥ ८४ ॥

जयाते पुण्यसामोग्री ॥ पूर्ण असे हो पदरीं ॥ तयातें साह्य श्रीहरी ॥ व्रत निरंतरी चालतसे ॥ ८५ ॥

यालागीं अमरनाथा ॥ न प्रवर्ते ऐसिया घाता ॥ येणें दुरिताचि वार्ता ॥ आंगी सर्वथा बाणेल पै ॥ ८६ ॥

ऐकता ऋषीचे उत्तर ॥ देवेंद्रे केला नमस्कार ॥ उपाव न सुचे अणुमात्र ॥ पद स्वतंत्र नरा हेची ॥ ८७ ॥

यालागीं गुरुवर्या पाहीं ॥ एक वेळ तेथवर जाई ॥ कळेल तैसी करा नवाई ॥ पद अक्षयी राहे जेणें ॥ ८८ ॥

ऐसें ऐकतां वचनातें ॥ ऋशी विचारी अंतरातें ॥ म्हणे जाउनि पाहू नृपाते ॥ पुण्य पुरुषाचे दर्शन ॥ ८९ ॥

दुर्वासा ऐसा सत्पुरुष ॥ परी मतीतें तात्काळ भ्रंश ॥
जया संगती संगदोष ॥ धरिला हव्यास मानसीं ॥ ९०
॥

धीरवान ज्ञानवान पाहीं ॥ सुशीळ जरी जाहला देहीं ॥
तरी संगती संगदोष पाहीं ॥ मती पालटे तयाची ॥ ९१
॥

म्हणोनियां सत्संग धरावा ॥ दुर्जन संग तो त्यागावा ॥
जेणें विश्रांती पावे जीवा ॥ देवाधिदेवा प्रेमा चढे ॥ ९२
॥

आतां दुर्वास ऋषीरावो ॥ घेऊन शिष्य समुदावो ॥
नमूनियां वासवो ॥ निघता जाला तात्काळीं ॥ ९३ ॥

घेईल अंबऋषीची भेटी ॥ तेथें होईल जे राहटी ॥ तें
कथानक मराठी ॥ श्रोतियां कर्णपुटीं परिसवूं ॥ ९४ ॥

जें ऐकतां पाप झडे ॥ कलि कल्मष अवघें पळे ॥
श्रवण करितां रोकडें ॥ मलमहात्म समग्र हें ॥ ९५ ॥

पापकोटी सहस्राणि पापकोटि शतानिच ॥ विलयं
यांति देवेशि मलामासे तिथौमम ॥ ६ ॥

श्लोकाधरें वदली वाचा ॥ प्रबंध नव्हे माझे पदरचा ॥

न्यून पूर्ण करणे याचा ॥ अधिकार साचा तुम्हांतें ॥ ९६ ॥

मी तंव रामसंप्रदायी ॥ भिक्षा मागतो गृहींगृहीं ॥ ती भिक्षा एकत्र एक ठायीं ॥ पचवून अर्पावी द्विजातें ॥ ९७ ॥

ऐसी हे तव कविता जाण ॥ कवीश्वराचें भिक्षान्न ॥ अर्थावबोध एकत्र करून ॥ श्रोतियां लागुन वाटिलें ॥ ९८ ॥

इति श्रीमलमहात्म ग्रंथ ॥ पद्मपुराणींचें संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ त्रयोदशोध्याय गोड हा ॥ १३ ॥

ओव्या ९८ ॥ श्लोक ६ ॥

॥ इति त्रयोदशोऽध्यायः ॥

---------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय चौदावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीपांडुरंग रुक्मिणीरंगा ॥ मुनीमानस ह्रदयभृंगा ॥ नाम अनामातीत अभंगा ॥ नेई भंगा दुरितातें ॥ १ ॥

ऐका श्रोते सादर आतां ॥ मागील कथाभाग निरुता ॥ अनुमोदन देऊनि तत्वता ॥ परिसा आतां कथानक ॥ २ ॥

ऋषींमाजी शिरोमणी ॥ महाराज दुर्वासमुनी ॥ वासवाते विचारूनी ॥ निघता जाला तात्काळीक ॥ ३ ॥

साठसहस्त्र ऋषींचा मेळा ॥ घेऊन पातला भूतळा ॥ मार्गी चालतां तयाला ॥ विचार आठवला मानसीं ॥ ४ ॥

ते धन्याः कृतकृत्याश्चतैः प्राप्तं जन्मनः फलं ॥ सर्वार्थोधिगतस्तैस्तुयैर्दत्तंद्वादशीदिने ॥ १ ॥

कलायामपि द्वादशया मन्नदानं करोति यः ॥ सौभाग्यं वर्धतेतस्य तस्यायुर्नैवहीयते ॥ २ ॥

पापकोटि सहस्त्राणि पापकोटि शतानिच ॥ विलयं यांति देवेशि मलमासेतिथौमम ॥ ३ ॥

दुर्वास विचारी निजमनीं ॥ ते धन्य या त्रिभुवनीं ॥ जे अर्पिती द्विजा अन्नदानीं ॥ कृतकृत्य तयानें पै ॥ ५ ॥

सुफळ तयाचा जन्म पाहीं ॥ व्रत तपें दानें सर्वही ॥

तीर्थाटणें आदिकरूनही साधिली त्याणें द्वादशी ॥ ६ ॥

या अन्नदानें करुन पाहीं ॥ सकळ सौभाग्य तो लाही ॥ तयातें कधीं न घडे अपाई ॥ पापक्षय होय तेणें ॥ ७ ॥

कोटि पापें घडली तयासी ॥ तरी संहारी एक द्वादशी ॥ तयामाजीही मळमासीं ॥ विशेषाविशेषीं जाणिजे ॥ ८ ॥

या ऐसिया पर्वकाळातें ॥ जे करित नाहींत दानातें ॥ अन्नदान न घडे जयातें ॥ धिक् तयातें जन्मोनियां ॥ ९ ॥

जन्मा येवोनि केलें काई ॥ आचारविचार पाहिलाच नाहीं ॥ अन्नदान केलेंच नाहीं ॥ पुण्यलेश नाहीं गाठींसी ॥ १० ॥

जरी जाला श्रीमान बरवा ॥ तरी काय करावें तयाचे गौरवा ॥ जो विन्मुख झाला केशवा ॥ तो काय जाळावा स्मशानीं ॥ ११ ॥

ते धन्य आचरती व्रतातें ॥ अनुसरले अन्नातें ॥ तेचि प्रिय केले भगवंतें ॥ पापलेश तयातें नातळे ॥ १२ ॥

म्हणोनि धन्य तो अंबरिष ॥ जो दानामाजी दानाधीश ॥ सकळ भूसुरामाजी ईश ॥ नसे लवलेश पापाचा ॥ १३ ॥

त्यातें छळावया पाहीं ॥ आम्हीं जातसों लवलाहीं ॥ तया रक्षिता शेषशायी ॥ न चले नवाई आमची तेथें ॥ १४ ॥

पुण्यवंत तो भूपती जाण ॥ करूं तयाचें दर्शन ॥ मग अग्रभागीं जें कथन ॥ सुखें करूनि घडो तें ॥ १५ ॥

ऐसी चित्तीं विचारणा ॥ करूनि चालिला ऋषीराणा ॥ त्वरें पावला नृपभुवना ॥ केली गर्जना समस्तीं ॥ १६ ॥

जयजयकाराचेनि घोषें ॥ ऐकतां नृप संतोषें ॥ अतिउल्हासें निजमानसें ॥ सामोरा येत नृप तयातें ॥ १७ ॥

दंडप्राय लोटांगणीं ॥ समस्तातें नमूनी ॥ बद्धहस्तें प्रवर्ते स्तवनीं ॥ मधुर वचनीं आनंदें ॥ १८ ॥

ते धन्य या संसारीं नर ॥ ऐकतां आनंदती द्विजवर ॥ अर्पिती पूजा प्रकार ॥ आणि अग्रहार द्विजातें ॥ १९ ॥

भोजनातें इच्छिती पदार्थ ॥ वरी धनवस्त्रासहित ॥ तयावरी कृपाळु अनंत ॥ निवारी आघात निजांगें ॥ २० ॥

ब्राह्मण पातलिया निजगृहीं ॥ भ्रूलतेसी ग्रंथी घालिती पाही ॥ म्हणती आमुचा हात रिकामा नाहीं ॥ परता होई भटबावा ॥ २१ ॥

ऐसें जे ब्राह्मणातें ॥ धिःकार असो तयातें ॥ तैसा नव्हे अंबरीष नृपनाथ ॥ परम भावार्थ विनवीत ॥ २२ ॥

म्हणत धन्य आजिचा पर्वकाळ ॥ माझा भाग्योदय झाला सफळ ॥ घेऊनि समुदाय सकळ ॥ गृहा पातला न प्रार्थिता ॥ २३ ॥

कोटि पर्वकाळ एकवटले ॥ किंवा चंद्रसूर्य एकवटले ॥ तेंचि फल आजी लाधलें ॥ दर्शन दिधलें महाराजा ॥ २४ ॥

बोलोनि ऐसि मधुरवाणी ॥ आसन दिधलें समस्ता लागुनी ॥ पूजा प्रकार आणवूनीं ॥ पुरस्कार पूजनीं अनुसरला ॥ २५ ॥

तंव बोलता झाला ऋषि बोल ॥ पोटीं क्षुधेचा असे बंबाळ ॥ तेथें पूजा प्रकार न रुचे सकळ ॥ विषवत

सकळ गमताती ॥ २६ ॥

कालची असे एकादशी ॥ अवघा वेळ उपवासी ॥ संधी साधून द्वादशी ॥ पातलों ठायासी तूझिया ॥ २७ ॥

क्षुधा हे पापिणी दारुण ॥ सुचों नेदि संध्या-स्नान ॥ पोटीं पेटलिया जठरान्न ॥ अन्ना परान्ना नेणेची ॥ २८ ॥

यालागीं नृपनाथा वरिष्ठा ॥ समुदायासी बरवंटा ॥ अन्नवोगरीं धर्मिष्ठा ॥ आणिक वाटा नवजावें ॥ २९ ॥

तीन प्रहर जाहलीया निशी ॥ आम्हीं जातसों स्नानासी ॥ विलंब नाहीं स्नान संध्येसी ॥ सत्वर माघारें येतसों ॥ ३० ॥

ऐकून ऋषींचें उत्तर ॥ मनीं हर्षयुक्त नृपवर ॥ म्हणे कृतकृत्य जालों फार ॥ केला उद्धार महाराजा ॥ ३१ ॥

आजी साधन द्वादशी ॥ मी लाधलों परम सुकृतेसीं ॥ पार नाहीं माझ्या भाग्यासी ॥ समुदायासी पातलेती ॥ ३२ ॥

तरी स्वामींचे दयेकरून ॥ सकळ पदार्थ अनुकूल जाण ॥ परी असे एक विज्ञापन ॥ कृपाघना परिसीजे ॥ ३३ ॥

माझा तंव अलोट नेम ॥ जो हरिहरातें दुर्गम ॥ तो सिद्धी न्यावा जी सुगम ॥ कृपा करूनि दातारा ॥ ३४ ॥

तरी साधिजे साधन द्वादशी ॥ विलंब न लावावा स्नानासी ॥ न होता भानु उदयासी ॥ भोजनासीं बैसावें ॥ ३५ ॥

हेची विनंती परिसावी ॥ कृपाळुत्वें सिद्धी न्यावी ॥ तथास्तु म्हणे भट गोसावी ॥ समुदाय ऋषिरावो ॥ ३६ ॥

स्नानातें गेला ऋषींचा मेळा ॥ नृप पातला त्वरें पाकशाळा ॥ साठ खंडी अन्नगोळा ॥ एकला कवळी दुर्वासु ॥ ३७ ॥

इतर मंडळी साठ सहस्र ॥ अन्नें पचविली षड्रस ॥ रायें सावरून स्नान संध्येस ॥ देवार्चनासीं बैसला ॥ ३८ ॥

षोडशोपचारें पूजा ॥ अर्पूनियां गरुडध्वजा ॥ पंचमहायज्ञ महाराजा ॥ करूनि बैसला निवांत ॥ ३९

॥

राव बैसला मार्ग लक्षीत ॥ तंव दिनकर उदयो होऊं पाहत ॥ साधनवेळा तेणें साधीत ॥ राव मनांत गजबजला ॥ ४० ॥

म्हणोनियां लवडसवडी ॥ दूत धाडिले अति तांतडी ॥ ते लक्षूनियां गंगेची थडी ॥ ऋषिराया हाकारिलें ॥ ४१ ॥

येरीकडे गंगातीरी ॥ अघमर्षण ऋषी करी ॥ कोणी शिरोनि जळामाझारी ॥ स्नानें बरि सारिताती ॥ ४२ ॥

कोणी करिती स्तोत्रपाठ ॥ कोणाचे न हालती ओंठ ॥ जप करिती एकनिष्ठ ॥ कोणी नीळकंठ आराधिती ॥ ४३ ॥

ऐसें ब्राह्मण ठायींठायीं ॥ गुंतते जाले ते समयीं ॥ तंव राजदूत पाहोन ह्रदयीं ॥ घाबरेपणें बोलती ॥ ४४ ॥

म्हणती महाराजा सत्वर ॥ बाहात असेजी नृपवार ॥ भोजनातें होतसे उशीर ॥ चलावें सत्वर स्वामियां ॥ ४५ ॥

प्रत्युत्तर न देती बापुडीं ॥ एक धरून नासिक बोंडी ॥

एक उघडी करून शेंडी ॥ लवडसवडी झाडिती ॥ ४६ ॥

तंव करूनियां अघमर्षण ॥ दुर्वास बोले वचन ॥ अद्यापि झालें नाहीं ध्यान ॥ जपतर्पणीं विधियुक्त ॥ ४७ ॥

भानु उदय न होतां ॥ केवी अर्घ्य तर्पणाची वार्ता ॥ जाऊनि सांगा नृपनाथा ॥ विधि विधानता सारूनि येऊं ॥ ४८ ॥

आम्हीं ब्राह्मण नसों अन्नार्थी ॥ स्नान संध्या सारून परती ॥ बैसावें येऊन पंक्ति ॥ तैसी आमुची स्थिती नसेची ॥ ४९ ॥

जे न करिती संध्यास्नान ॥ विधियुक्त तिळतर्पण ॥ तैसेंची सारिती भोजन ॥ तरी ते ब्राह्मण नव्हेती ॥ ५० ॥

शूद्रवत ते नर जाण ॥ रवरवीं तयाचे पितृगण ॥ काय ब्राह्मण कुळीं जन्मोन ॥ सार्थक कवण जन्माचें ॥ ५१ ॥

तरी जाऊनि सांगा रायासीं ॥ क्षण एक अवकाश भोजनासी ॥ सारूनियां नित्य नेमासी समुदायासी

येतसो ॥ ५२ ॥

ऐसें ऋषीचें उत्तर ॥ ऐकून दूत परतले सत्वर ॥ जेथें असे नृपवर ॥ सांगती सत्वर वृत्तांत ॥ ५३ ॥

नृपें ऐकून वचनासी ॥ परम संकोचित मानसीं ॥ म्हणे विघ्न दिसे द्वादशी ॥ न साधे साधनासी आजी पै ॥ ५४ ॥

तरीं उपावो करावा कवण ॥ परम कोपिष्ठ दुर्वास जाण ॥ शाप देईल न लागतां क्षण ॥ परम विघ्न उदेलें हें ॥ ५५ ॥

आजपर्यंत साधनासी पाहीं ॥ अपायो घडला नसे कांहीं ॥ अहो देवा हें काई ॥ कैसी नवाई उदेली ॥ ५६ ॥

ऐसी चिंता करितां ह्रदयांत ॥ परम सचिंत नृपनाथ ॥ तंव संधी पातली त्वरित ॥ साधन वेळा द्वादशी ॥ ५७ ॥

मग नृपें विचारून मानसी ॥ करिता जाला महायज्ञासीं ॥ नैवेद्य अर्पूनि महाविष्णूसी ॥ देव तीर्थासी प्राशिलें ॥ ५८ ॥

सिद्ध करून आयती ॥ मार्ग लक्षीत नृपती ॥ स्वस्थ बैसलासे चित्तीं ॥ ऋषिमार्ग लक्षीतेस ॥ ५९ ॥

येरीकडे गंगातीरीं ॥ ऋषीतें जाणवलें अंतरीं ॥ मग उठता झाला झडकरी ॥ समुदायेसी ऋषिरावो ॥ ६० ॥

परम लगबगेंते अवसरीं ॥ पातले नृपाचिया महाद्वारीं ॥ करूनियां जयजयकारी ॥ म्हणे सत्वर सारीं यज्ञातें ॥ ६१ ॥

करूनि पंच महायज्ञातें ॥ नैवेद्य अर्पी देवातें ॥ उशीर जाहलासे भोजनातें ॥ तुझिया व्रतातें नृपवरा ॥ ६२ ॥

रायें ऐकूनियां वचन ॥ म्हणे सकळ विधि सारून ॥ करूनियां तीर्थग्रहण ॥ साधन वेळां साधिली ॥ ६३ ॥

आतां भोजन मात्र असे उरलें ॥ ऋषी म्हणे आहा काय केलें ॥ तूंतें तव भोजन घडलें ॥ शेष उरलें तें ब्राह्मणातें ॥ ६४ ॥

तीर्थ प्रसाद ग्रहण करितां ॥ तरी भोजना समानची तत्वतां ॥ आम्ही न सेवूचि आतां ॥ शेष अन्न नृपवर्या ॥ ६५ ॥

तूं तंव परम सूज्ञराया ॥ केवी आचरलासी हे क्रिया ॥ म्हणोन परम क्रोध ॠषिवर्या ॥ ह्रदयामाजी उपजला ॥ ६६ ॥

म्हणें चांडाळा पाही आतां ॥ मज ॠषीतें उपेक्षून तत्वतां ॥ माझा महिमा तुवां नेणतां ॥ केवीया व्रता साधिलें ॥ ६७ ॥

क्रोधें थरथरां कांपतसे ॥ दोन्ही अधरपुटीं हालतसे ॥ सर्वांगी क्रोधें लवतसे ॥ काय बोलतसे रायातें ॥ ६८ ॥

गर्व जाहला तुझिया मानसीं ॥ मीच साधितों द्वादशी ॥ तरीं स्वीकारी आतां शापासीं ॥ भोगीं गर्भवासीं शतजन्म ॥ ६९ ॥

ऐसा शाप ॠषीं वदतां ॥ घाबरा जाला नृपनाथा ॥ म्हणे केउता उदेला अनर्था ॥ म्हणोन कांपत थरथरां ॥ ७० ॥

पहा केवढा अनर्थ रायातें ॥ अभिमान वोढवला तयातें ॥ अभिमान न साहे भगवंतातें ॥ प्रिय तयाते निराभिमान ॥ ७१ ॥

निराभिमान कर्मकरितां ॥ तो परमप्रिय भगवंता ॥ यालागीं न धरीजे अहंता ॥ जाणते पुरुषांनीं ॥ ७२ ॥

पुण्यमार्ग आचरतां पाहाहो ॥ तेथें उत्पन्न झाला अपावो ॥ म्हणोनि नाचरावें हा हो ॥ झणी ऐसें न म्हणावे ॥ ७३ ॥

जें पुण्यकर्म आचरलें ॥ तें केवीं वाया गेलें ॥ ऐसें न म्हणावें वहिलें ॥ तें ऐका सावधान ॥ ७४ ॥

भावेवीण देवाधिदेवो ॥ केवी आतुडले पाहाहो ॥ परि केलिया कर्माचा निर्वाहो ॥ देवाधिदेवो संपादी ॥ ७५ ॥

जैसे उत्तम भूमीसी कण ॥ पेरितां होय वर्धमान ॥ जरी अपूर्ण जाला घन ॥ परी न जाय कण तेथीचे ॥ ७६ ॥

तेवी सत्पात्रीं दान देता ॥ ते वायां न जाय तत्वतां ॥ किंचित कृपाघन वोसरतां ॥ पीक हाता लागतसे ॥ ७७ ॥

म्हणोनियां अनन्यभावें ॥ निराभिमानें कर्म करावें ॥ तेंची प्रियकर रमाधवे ॥ भावार्थबळें करूनियां ॥ ७८ ॥

असो आतां हे समग्र ॥ कथा भाग राहिला दूर ॥ कर जोडुनियां नृपवर ॥ उभा समोर ऋषींच्या ॥ ७९ ॥

म्हणे स्वामिया महाराजा ॥ कवण अपराध देखिला माझा ॥ म्हणून शाप दिधला वोजा ॥ हें अधोक्षजा मानेना ॥ ८० ॥

ऋषी म्हणे ते समयीं ॥ तुवा तीर्थग्रहण करून पाहीं ॥ माझें वचन असत्य नाही ॥ भोजना बैसविसी आम्हातें ॥ ८१ ॥

पहा केवढे संकटीं नृपवर ॥ व्यसनीं पडला साचार ॥ परी कृपाळू तो सर्वेश्वर ॥ जाणें अंतर सकळांचें ॥ ८२ ॥

न पाचारिता ऋषिवरा ॥ आले समुदायासी मंदिरा ॥ तरी माघारे दवडितां नृपवरा ॥ अश्लाध्यवाणें दिसे कीं ॥ ८३ ॥

यालागीं गृहीं पातलियां भूसुर ॥ तयाचें आतिथ्य करावें फार ॥ तोषवून तयाचें अंतर ॥ आशीर्वचनातें घेईजे ॥ ८४ ॥

रिक्त हस्तें दवडितां पाहीं ॥ कठोर वचन बोलतां तेही ॥ तेणें तों संतापून ह्रदयीं ॥ अंतःकरणी शापितसे ॥ ८५ ॥

जरीं द्यावया नाहीं धन ॥ तरीं बरवा कीजे सन्मान ॥

परी वित्त असुनि न देववे दान ॥ हें विहितपण साजेना ॥ ८६ ॥

तरी थोडें अथवा फार ॥ देऊनि तोषवावें अंतर ॥ मग कृतज्ञता द्विजवर ॥ सहजची येऊं पाहे ॥ ८७ ॥

असंतुष्टा द्विजा नष्टा ॥ हे प्रतीपाद्य वेद प्रतिष्ठा ॥ यालागीं कर्म श्रेष्ठा ॥ विधिवाटा आचरिजे ॥ ८८ ॥

ऐसें कर्म अंबरीष ॥ करितां प्राप्त झाला नाश ॥ मग ह्रदयीं आठवी रमाविलास ॥ केला ध्यास बहु तेणें ॥ ८९ ॥

म्हणे वैकुंठवासी रमाधवा ॥ धाव कैवारिया ॥ केशवा मी तव अनुसरलों जीवभावा ॥ तुझिया सेवा जगदीशा ॥ ९० ॥

ब्राह्मण तंव तुझें मुख ॥ ऐसें जाणूनिया निष्टंक ॥ व्रत आचरलों एकनिष्ठ ॥ केवीं हें अरिष्ट उदेलें ॥ ९१ ॥

कवण पातकाची राशी ॥ म्हणोनि क्रोध आला तुजसी ॥ यालागीं शापितसे ऋषी ॥ कवण उपायासी करूं आतां ॥ ९२ ॥

तुझेंची मुख हे ब्राह्मण ॥ जाणोनि मांडिलें अन्नदान ॥

आणी तुझेची मुखें शापवचन ॥ उचितपण केवी देवा ॥ ९३ ॥

तरी कृपाळू तो दीनोद्धार ॥ ऐसें बोलती विधिहर ॥ तरी ऋषिवचनाचा वणवा थोर ॥ शांत करी कृपाघनें ॥ ९४ ॥

हे देवाधिदेवा कृपाघना ॥ दयाळुवा अघनाशना ॥ दीनोद्धारा पतितपावना ॥ असुरमर्दना दयानिधे ॥ ९५ ॥

तूं तव कृपेचा सागर ॥ ऐसें वदताती ऋषेश्वर ॥ तेथें ऐसी हे लहरी क्रूर ॥ पातली हरिहरा न लोटे ॥ ९६ ॥

कवण पातकाचा ठेवा ॥ मी तंव आचरलोंसे देवा ॥ म्हणोनि न येची करुणा ॥ ह्रदयीं केशवा तुझिया ॥ ९७ ॥

गर्भवासाचा चुकवावा पंथ ॥ यालागीं कीजे दान तपव्रत ॥ तेथेंही होतसे आघात ॥ तरी समूळ मात उडे कीं ॥ ९८ ॥

तरीं दीन वत्सलता ते कैसी ॥ केउती गेलीसे ऋषीकेशी ॥ सांग पां आम्हां दीनासी ॥ विचारून मानसीं गोविंदा ॥ ९९ ॥

पाहा करितां अन्नदान ॥ रायातें वोढवलें महाविघ्न ॥ तोची प्रत्यय मजलागून ॥ आला जाण तात्काळीं ॥ १०० ॥

ब्राह्मण भोजन केलें प्रथम दिवशीं ॥ प्रचीत देखिली प्रातःकाळासी ॥ न येतां न देतां दुर्जनासी ॥ गांठी पडली तात्काळीं ॥ १ ॥

तयानें वोढून नेलें ॥ राजद्वारीं उभे केलें ॥ कारागृहातें भोगिलें ॥ अस्तमीत अस्नात ॥ २ ॥

प्रभू न करी वचनान्याये ॥ खोट्याचें खरें केलें पाहे ॥ दंड पावलों लवलाहे ॥ रौप्य नाणें ऋषि संख्या ॥ ३ ॥

ऐसा पुण्यमार्गाचा प्रादुर्भावो ॥ तात्काळ फळला पाहा हो ॥ अंबरीषातें तोची न्यावो ॥ घडे पाहावो अनयासें ॥ ४ ॥

मग करुणास्वरें अनंत ॥ आळविता जाला नृपनाथ ॥ सर्वातरात्मा जगन्नाथ ॥ कळलें ह्रदयगत रायाचें ॥ ५ ॥

म्हणे धावणें न करितां ॥ ब्रीद बुडो पाहे तत्वता ॥ मग माझीही वत्सलता ॥ केवी शोभे भूमंडळीं ॥ ६ ॥

मग पवनातें टाकून मागें ॥ गरुडातें सोडून वेगें ॥ धांवणें केलें लागवेंगे ॥ उभाउभी अंतरंगीं उभा ठेला ॥ ७ ॥

येरीकडे नृप चक्रचूडामणी ॥ जोडूनियां द्वयबद्धपाणी ॥ उभा ठेलासे ऋषि सन्निधानी ॥ तों चक्रपाणी देखिला ॥ ८ ॥

सहस्र चपळेसमान ॥ तेज फांकलें देदीप्यमान ॥ एकाएकीं शेषशयन ॥ येऊन उभा ठाकला ॥ ९ ॥

रायें पाहातांच नयनीं ॥ दंडप्राय लोटांगणीं ॥ उभा ठेला बद्धपाणी ॥ स्तुती स्तवनीं अनुवादें ॥ १० ॥

दुर्वासें घातला नमस्कार ॥ उभा समुदायेंसीं सत्वर ॥ स्तुतिवादें जगदीश्वर ॥ ऋषेश्वर पूजितसे ॥ ११ ॥

ऐसें होतां तये वेळीं ॥ बोलतां जाला वनमाळी ॥ नृपवरा पाहून ते वेळीं ॥ मुख कोमाले दिसतसे ॥ १२ ॥

मग बोलतसे नृपवर ॥ कथिता जाला समाचार ॥ म्हणे परम कोपिष्ठ ऋषेश्वर ॥ निरर्थक शापिलें ॥ १३ ॥

ऋषी शापाचा वणवा ॥ जाळूं पाहे देह भावा ॥

कृपाळू तू मेघ केशवा ॥ शीतळ करीं वर्षोनी ॥ १४ ॥

ऐकून नृपाची करुणा ॥ बोले वैकुंठीचा राणा ॥ म्हणे दुर्वासें न करितां विचारणा ॥ शापिला राणा अंबरीष ॥ १५ ॥

आधींच मलमास विशेष ॥ वरी द्वादशी तिथी सरस ॥ नृप आचरतां निर्दोष ॥ तरी शापास आधार केउता ॥ १६ ॥

द्वादश्यां पारणयेस्तु तोयदानं करोतियः ॥ तत्तोयं सागरेस्तुल्यं सप्तभिः सागरात्मजे ॥ ४ ॥

द्वादश्यां योदिने प्राप्ते तर्पणं कुरुते प्रिये ॥ जलं तदमृती भूय पितृणामुपतिष्ठति ॥ ५ ॥

द्वादश्यामन्नदानं वै यः करोति सुमध्यमे ॥ तेनैव तारिताः सर्वे नरकाच्छत पूर्वजाः ॥ ६ ॥

द्वादशीतें ब्राह्मणातें ॥ उदक अर्पिलें जरी त्यातें ॥ तरी फळ लाभे यज्ञातें ॥ स्वर्गी पितरांतें संतोष ॥ १७ ॥

जयानें व्रत केलें द्वादशी ॥ पार नाही त्याचिया पुण्यासीं ॥ मी जनार्दन संतोषी ॥ केवी तयासीं अघातू ॥ १८ ॥

वरी केलिया अन्नदान ॥ तयाचे पूर्वजा होय उद्धरण ॥ न करि तरी रवरव दारुण ॥ पितृगण भोगिती ॥ १९ ॥

ऐसीजे पुण्यतिथीसी ॥ नृप आचरतां पुण्यराशी ॥ तरी केवी बाधिजे तयासी ॥ शापभये ऋषीच्या ॥ २० ॥

परी तपश्चर्ये आगळा मुनी ॥ नेणोनि वदले शापवाणी ॥ तरी स्वयें मी चक्रपाणी ॥ सोसीन जाचणी गर्भवास ॥ २१ ॥

ऐसें वचन केशवाचें ॥ ऐकून ऋषी बोले साचे ॥ शत जन्म गर्भवासाचे ॥ वचन आमचें निघालें ॥ २२ ॥

तरी उश्शाप वाणी ऐक ॥ वरिचें शून्य टाकीं एक ॥ शेष उरे जो दशक ॥ तो अवश्यक भोगिजे ॥ २३ ॥

त्याहीमाजी चतुर्भाग रीतीं ॥ दोन्ही जलचरें दोन्ही वनचरें तीं ॥ दोन विप्र दोन भूपती ॥ रामकृष्ण तरती जडमूढ ॥ २४ ॥

ऐसा उश्याप वदता वाचा ॥ संतोष स्वामी दीनाचा ॥ गर्भवास निरसील रायाचा ॥ स्वयें तयाचा अंगिकारी ॥ २५ ॥

मग आनंदोनियां नृपती ॥ ऋषीमेळासीं श्रीपती ॥

साधूनिया द्वादशी तिथी ॥ कौतुक रीतीं दावित ॥ २६ ॥

विमान आणून तात्काळीं ॥ नृप उद्धारिला ते वेळीं ॥ ऐशी द्वादशी नव्हाळी ॥ ऋषि मंडळी विलोकीत ॥ २७ ॥

समस्तीं करुनि जयजयकार ॥ नमिते झाले शारंगधर ॥ अदृश्य जाला सर्वेश्वर ॥ इतुका प्रकार पै जाला ॥ २८ ॥

कथाभाग परम ऐकिला ॥ म्हणोनि श्रोतियां सकळा ॥ श्रवणद्वारें परिसविला ॥ एवं संपला पंचपर्व ॥ १२९ ॥

इतिश्रीमलमास माहात्म ग्रंथ ॥ पद्मपुराणाचें संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ चतुर्दशोध्याय गोड हा ॥ १४ ॥

ओंव्या ॥ १२९ ॥ श्लोक ६ ॥

॥ इति चतुर्दशोध्यायः ॥

---------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय पंधरावा

श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी सद्‌गुरुनाथा ॥ अरूपरूपा गुणातीता ॥ तुमच्या चरणीं माझा माथा ॥ नमन समर्था तुम्हांतें ॥ १ ॥

तव कृपेची नौका थोर ॥ उतरसी जडमूढ पामर ॥ तेथें मी एक अर्भक किंकर ॥ उतरींपा दयाळुवा ॥ २ ॥

भाविक भोळे अज्ञान जन ॥ परपारातें नेशी तयालागून ॥ तरी मी एक अभाविक अज्ञान ॥ ठेवितां दूषण समर्था ॥ ३ ॥

मी तंव नेणें जपतप साधन कांहीं ॥ मतिमंद आळशी सदा सर्वदांही ॥ पीडिलों असें प्रपंचाचे ठायीं ॥ सोडवी आई माउलिये ॥ ४ ॥

व्यर्थ वेंचिले वयसा ॥ केधवां काळ घालील फासा ॥ नाहीं क्षणाचा भरवसा ॥ नसे धीवसा अंतरीं ॥ ५ ॥

संचय नसे धनासीं कांहीं ॥ करावीं दानव्रतें कांहीं ॥ हें तूं जाणसीं सर्वही ॥ ह्रदयगत माझें कृपाळा ॥ ६ ॥

असो आतां हा स्तुतिवाद ॥ परिसा कथानुसंवाद ॥ मगिले अध्यायीं विशद ॥ द्वादशी महिमा वर्णिला ॥ ७ ॥

तोची आतां पुढत पुढती ॥ परिसवूं श्रोतियांप्रती ॥
जेणें आंगीं बाणे विरक्ति ॥ धर्मरीती ठसावे पैं ॥ ८ ॥

जैसा कोणी एक कीर्तनीं जात ॥ तो दुजियातें भावार्थ सांगत ॥ मग तयाचा बैसे हेत ॥ जाय नित्य कीर्तनीं ॥ ९ ॥

तैसीच हेही गोष्ट असे ॥ ऐकतां परम जीव संतोषे ॥
भावार्थे प्रचीत अनयासें ॥ कळों येई आचरलिया ॥ १० ॥

स्मरणात्कीर्तनाद्यत्र प्राप्नोति पदमव्ययं ॥
स्त्रीराजबालघातीच यति विश्वासघातकः ॥ १ ॥

स्त्री बाळ अथवा प्रौढ ॥ किंवा अज्ञान जडमूढ ॥
पापी असलिया द्वाड ॥ ऐकतां सदृढ उद्धरे ॥ ११ ॥

पूर्वी पंच महापापें घडलीं ॥ तीं काय आपणा स्मरती ये वेळीं ॥ काय झालें कवणे काळीं ॥ केवीं नव्हाळी सांगवे ॥ १२ ॥

या लागीं पूर्व पापाचा क्षय व्हावा ॥ म्हणोनि कथाभाग ऐकावा ॥ तदनुसारेंची दानधर्म करावा ॥ सुटका करावी नरदेहाची ॥ १३ ॥

इतर असती जन्मयाती ॥ परी तेथें न घडे धर्मरीती ॥ यालागीं हातोहातीं श्रीपती ॥ यथानिगुती भजावें ॥ १४ ॥

म्हणोनि ऐकिजे सादर ॥ कथालाघव परम अपार ॥ मलमाहात्म अतिसुंदर ॥ लक्ष्मीनारायण संवाद ॥ १५ ॥

सूर्यवंशीं श्रीरामचंद्र ॥ आचरे द्वादशीपर्वथोर ॥ साधवा विधी प्रकार ॥ यथानिगुती संवादी ॥ १६ ॥

अवतार पुरुष तो दाशरथी ॥ सहकुळ निर्दाळिला लंकापती ॥ कुंभकर्णादि बळकीर्ती ॥ निवटिले पराक्रमें ॥ १७ ॥

परी त्या कुंभकर्णाची स्नुषा ॥ कुंभनिकुंभाची योषा ॥ शतमुखी रावणाची पीयूषा ॥ कन्या जाणा प्रीतिपात्र ॥ १८ ॥

तियेतें असे एक सुत ॥ नामे पुढरीक विख्यात ॥ लंकेशाची होतां वाताहत ॥ गेली धांवत पितया पैं ॥ १९ ॥

करूनियां साष्टांग नमन ॥ निवेदिलें सकळ वर्तमान ॥ येरू ऐकता खेदखिन्न ॥ म्हणे मूर्ख रावण केवढा ॥

२० ॥

आम्हां कळूं नेदीतां मात ॥ केला सकळ कुळाचा घात ॥ मी तंव एक क्षणात रघुनाथ ॥ सेनेसहित ग्रासितो ॥ २१ ॥

परी होणार तें न चुके सर्वथा ॥ होऊन गेलें ते जालें आतां ॥ सांप्रत लंकाधीप तत्वता ॥ बिभीषण केला श्रीरामें ॥ २२ ॥

तरी तया बिभीषणाची वार्ता ॥ मी जाऊन पाहीन आतां ॥ दवडूनिया आपुल्या नाता ॥ आपण स्वस्थता राज्य भोगी ॥ २३ ॥

ऐसें बोलोनिया वचन ॥ हांकारिलें सकळ सैन्य ॥ घाव निशाणी घालून ॥ केलें धावणें लंकेवरी ॥ २४ ॥

निशीमाजी एकाएकीं समग्र ॥ येऊन वेढिलें लंकानगर ॥ कळला बिभीषणा समाचार ॥ तोही सत्वर बाहेर निघे ॥ २५ ॥

दोन्ही सैन्या जाला मेळु ॥ घाई उठिला हलकल्लोळु ॥ परी दळे बळें प्रबळु ॥ आहे शतमुखी तो ॥ २६ ॥

बिभीषणातें पराभविले ॥ लंकेबाहेर घातलें ॥

पुंढरीकातें राज्यीं स्थापिलें ॥ गंतव्य केलें माघारी ॥ २७ ॥

इतुकें कृत्य करून देख ॥ परतला तो शतमुख ॥ येरीकडे तो भक्तनायक ॥ विचार करी निजमनीं ॥ २८ ॥

म्हणे आतां कवण उपाय करावा ॥ हानी झाली माझिया गौरवा ॥ केवीं मुख दाखवावें राघवा ॥ अपकीर्ती सर्व जगांत ॥ २९ ॥

परी होणार तें होऊन गेलें ॥ राज्य बुडलियाचें दुःख आगळें ॥ जगामाजी तोंड काळें ॥ जालें सर्वांपरी माझें ॥ ३० ॥

आतां होणार तें सुखें हो कां ॥ शरण जावें श्रीरघुनायका ॥ जेणें दिधली हे लंका ॥ करूनि विवेका निघाला ॥ ३१ ॥

कांहीं सेवक आणि प्रधान ॥ घेऊन निघाला बिभीषण ॥ त्वरें पावला अयोध्या पट्टण ॥ रघुनंदन जेथें असें ॥ ३२ ॥

दंडप्राय लोटांगण ॥ करूनि नमिला रघुनंदन ॥ रामें दिधलें आलिंगन ॥ परम भक्त जाणोनी ॥ ३३ ॥

स्वागत पुसोनि परस्परें ॥ सन्निध बैसविला आदरें ॥ मुखारविंद पाहतां रघुवीरें ॥ तंव वदनेंदु कोमाइला ॥ ३४ ॥

म्हणे बिभीषणा प्राणसखया ॥ शोकाकुलीत दिसे ह्रदया ॥ तरी निवेदीं महत्कार्या ॥ जें हरविधातिया अलोट ॥ ३५ ॥

ऐसें रघुपतीचें वचन ॥ ऐकोनि बोलें बिभीषण ॥ मग स्तुतिवादें रघुनंदन ॥ पूजिता जाला आदरेंसी ॥ ३६ ॥

जयजयाजी रघुनंदना ॥ कृपासागरा पतितपावना ॥ भक्तरक्षका दीनोद्धारणा ॥ कृपानिधाना रघुपती ॥ ३७ ॥

भक्तकैवारी रघुराया ॥ तव दर्शनें हरें सकळ माया ॥ नाम स्मरणें पापक्षया ॥ जाय विलया रघुपती ॥ ३८ ॥

तूं तव एकवचनीं एक बाण ॥ हा तव तुझा नेम रघुनंदन ॥ ऐसें असतां असत्यपण ॥ आलें दिसोन ये काळीं ॥ ३९ ॥

तरी तुवा निज कृपेंकरून ॥ लंकाराज्य दिधलें दान ॥ तेथें झालें महाविघ्न ॥ ऐकें कथन रघुराया ॥ ४० ॥

शतमुखीं रावण पाहीं ॥ तो तंव आमुचा असें व्याही ॥ तयाची कन्या स्नुषा होई ॥ भार्या पाहीं निकुंभाची ॥ ४१ ॥

तियेतें असे पुत्र एक ॥ नाम तयाचें पुंडरीक तयातें घेऊनियां देख ॥ स्नुषा गेली पितयां पैं ॥ ४२ ॥

लंकेचें आद्यंत वर्तमान ॥ तियेनें पितयातें केलें श्रवण ॥ मग तो सकळ सैन्य घेऊन ॥ आला चालून लंकेसी ॥ ४३ ॥

मातें समरीं पराभवून ॥ लंका राज्य घेतलें हिरून ॥ पुंडरीकातें राज्यीं स्थापून ॥ गेला निघोन मागुता ॥ ४४ ॥

म्हणोनिया रघुनंदना ॥ शरण आलों तंव चरणा ॥ सांगोनिया वर्तमाना ॥ निवांत स्थाना बैसला ॥ ४५ ॥

ऐकून बिभीषणाचें उत्तर ॥ निवांत बैसला रघुवीर ॥ आरक्त करूनि नेत्रे ॥ काय बोले ते समयीं ॥ ४६ ॥

म्हणे माझिया भक्तालागून ॥ कोण छळिता दुर्जन ॥ तयातें समूळीं निर्दाळीन ॥ मी रघुनंदन स्वयें कर्ता ॥ ४७ ॥

मी भक्तालागीं अवतार ॥ युगायुगीं घेतले साचार ॥ ऐसा कोण असे पामर ॥ दे तिरस्कार माझिया भक्ता ॥ ४८ ॥

तरी ऐक माझिया वचनासी ॥ आजी असे एकादशी ॥ मारूनिया शतमुखासी ॥ राज्यीं तुजसी स्थापीन ॥ ४९ ॥

इतुकें करूनियां कारण ॥ द्वादशीचें अयोध्येशी पारण ॥ करीन साधनीं व्रतपूर्ण ॥ तरीच रघुनंदन नाम माझें ॥ ५० ॥

ऐसें प्रतिज्ञा वचन ॥ श्रीरामाचें ऐकून जाण ॥ बोलता जाला बिभीषण ॥ अघटित वचन केवी घडे ॥ ५१ ॥

दधी समुद्राचे मध्य बेटीं ॥ तया असुराचें स्थान जगजेठी ॥ आदौ ऐकिजे ते गोष्टी ॥ सविस्तर सांगेन ॥ ५२ ॥

येथून पांच कोटी योजने दूर ॥ असे तो दधि सागर ॥ तेथील मध्य बेटाचा विस्तार ॥ लक्ष योजनें लांबी रुंदी ॥ ५३ ॥

तेथें वास्तव्य असुरातें ॥ संख्या नसेची सैन्यातें ॥ निवटून तया दुष्टातें ॥ केवी अयोध्ये घडे द्वादशी ॥ ५४

॥

ऐसें मनोमानसाचें वाक्यें ॥ आकर्णोनि अयोध्यानायकें ॥ स्तब्ध घटिका मुहूर्त एक ॥ न सुचे आणीक उपावो ॥ ५५ ॥

म्हणे हें तो अलोट कार्य दिसे ॥ आमचें नेमोत्तर घडे कैसे ॥ भक्त मनोरथ पुरतां न दिसे ॥ रविवंशीं दिसे दूषण ॥ ५६ ॥

मी तव भक्तकामकल्पद्रुम ॥ हें मिथ्यत्व दिसे परम ॥ भक्तमनोभिराम हें नाम ॥ साच न दिसे आमुतें ॥ ५७ ॥

राजाधिराज रघुनायक ॥ तो संकटीं पडला देख ॥ मग इतरांचा केउता लेख ॥ संकटार्थ विचारा ॥ ५८ ॥

परी भक्तालागीं संकटीं ॥ पडला असे रवीकिरिटी ॥ इतर जनाची राहटी ॥ होती कष्टी प्रपंचीं ॥ ५९ ॥

प्रपंचीं कष्टी होतां फार ॥ मग आठविती परमेश्वर ॥ तेवीं संकटीं पडतां रघुवीर ॥ स्मरे कुमरवायूचा ॥ ६० ॥

देव भक्तपण वेगळें न दिसे ॥ ते तंव एकमय वर्तती

ऐसें ॥ जेवी परिमळ पुष्पीं वसे ॥ तैसे देव भक्त एकरूप ॥ ६१ ॥

त्याहीवरी सांब आणि रघुनाथ ॥ वेगळेपण नाहीं उभयतांत ॥ तोचि अंश वायुसुत ॥ साक्षात अवतार शिवाचा ॥ ६२ ॥

म्हणोनि स्मरतां रघुनाथ ॥ तात्काळ उभा ठेला हनुमंत ॥ जोडूनियां दोन्ही हस्त ॥ विनवीत रघुराया ॥ ६३ ॥

म्हणे केउता संकटार्णव अपार ॥ मी तव सन्निध असतां वीर ॥ पडतीया आकाशा देऊं धीर ॥ तेथें तो असुर कायसा ॥ ६४ ॥

ऐसा उभयतांचा संवाद ॥ होतां तेथें प्रगटला नारद ॥ अर्पूनि पूजा प्रकार सद्य ॥ निजासनीं बैसविला ॥ ६५ ॥

मग नारद म्हणेजी रघुराया ॥ केवि खिन्न दिसती हे चर्या ॥ अवघा वृत्तांत रघुराया ॥ निवेदित ऋषीतें ॥ ६६ ॥

नारद म्हणे जी श्रीरामा ॥ अचाट वदलेती नेमा ॥ तो दैत्य नावरे जी तुम्हां ॥ दुर्धर संग्रामा ये काळीं ॥ ६७ ॥

परी मारुती ऐसा वीर जेठी ॥ हा तव साह्य राखील पाठी ॥ तरी सैन्य करा सिद्ध उठाउठी ॥ घ्यावी भेटी दैत्याची ॥ ६८ ॥

परी पंचाशत कोटी दूर ॥ ऐसें तया दैत्याचें नगर ॥ केवी साह्य हा तव प्रकार ॥ न कळे निर्धार राघवा ॥ ६९ ॥

ऐसें ऐकतां मुनिवचन ॥ आवेशला वायुनंदन ॥ सकळ सैन्य सिद्ध करून ॥ रघुनंदन उभा ठेला ॥ ७० ॥

मग काय करी अंजनीसुत ॥ रूप धरिले अति अद्भुत ॥ आकाशीं मुख पाद पाताळांत ॥ देखता रघुनाथ हर्षला ॥ ७१ ॥

मग पिंजारून रोमावळी ॥ वरी बैसविली सैन्य मंडळी ॥ राम लक्ष्मण स्कंध मौळीं ॥ कक्षेतळीं बिभीषण ॥ ७२ ॥

तंव नारद म्हणे जी स्वामी ॥ समागमें येतसों आम्हीं ॥ पाहू संग्रामाची उर्मी ॥ दैत्यधाम अवलोकूं ॥ ७३ ॥

अवश्य म्हणे जानकीवर ॥ तंव काय करी वायुकुमर ॥ दक्षण चरण उचलून सत्वर ॥ दैत्य नगर आक्रमिलें ॥ ७४ ॥

एक चरण अयोध्ये आंत ॥ दुजा ठेविला दैत्य नगरांत ॥ मग बोलें वायुसुत ॥ उतरा त्वरित पैं आतां ॥ ७५ ॥

शतमुखाची हेची नगरी ॥ वेढा घाला जी सत्वरी ॥ देखूनियां आश्चर्य करि ॥ मुनीसहीत राघव ॥ ७६ ॥

म्हणे निमिष्य न लोटतां जाण ॥ अठरा पद्में वानर सैन्य ॥ त्याहीवरी अयोध्येचे वीरगण ॥ संस्था जाण नसेची ॥ ७७ ॥

इतुकिया सहीत सत्वरी ॥ घेऊन आला कपीकेसरी ॥ म्हणूनि हर्ष न माय अंबरीं ॥ वेढिली नगरी दैत्याची ॥ ७८ ॥

सर्वत्रांचा एकचि कल्होळ ॥ ऐकूनियां दैत्यपाळ ॥ समाचार आणवीत सकळ ॥ कळलें ते वेळीं तयातें ॥ ७९ ॥

बिभीषणाच्या कैवारें ॥ धांवणें केलेंसे रघुवीरें ॥ म्हणूनियां आवेशें थोरें ॥ निघे बाहेर स्वसैन्येसीं ॥ ८० ॥

अचाट बळी दैत्य राणा ॥ वर्षता जाला अभितबाणा ॥ घाई जर्जर केली सकळसेना ॥ रघुनंदन देख तसे ॥ ८१ ॥

मग मारुतीस्कंदी रघुवीर ॥ वर्षत झाला बाणाचा पूर ॥ परी नाटोपे तो दैत्येश्वर ॥ वर्षे अपार बाणातें ॥ ८२ ॥

ऐसें युद्ध होता ते वेळीं ॥ तीन प्रहर रात्र होऊं आली ॥ श्रीरामें चिंताअनळीं ॥ वस्ती केली तेधवां ॥ ८३ ॥

म्हणें या दैत्यातें पराभवून ॥ बिभीषणातें राज्य देऊन ॥ न घडे अयोध्येसी गमन ॥ द्वादशी पूर्ण न घडे ते ॥ ८४ ॥

ऐशा विचारें मनांत ॥ तटस्थ ठेला रघुनाथ ॥ हें देखोनि नारद हसत ॥ केवी हे मात घडू शके ॥ ८५ ॥

तरी परिसीजे चापपाणी ॥ हा दैत्य शिववरदायिनी ॥ कदां नाटोपे तुम्हांलागुनी ॥ वृथा कहाणी मनाची ॥ ८६ ॥

तरी या विषयीचा उपाय एक असें ॥ मायाधीन हें जगत वसे ॥ तुम्ही तो सगुणत्व मायावेषें ॥ अकार आपैसें जालेती ॥ ८७ ॥

तरी ते माया आलियाविन ॥ हा दैत्य नाटोपें कवणालागून ॥ यालागीं जानकीते प्रार्थून ॥ आणी रघुनंदन कंदनानें ॥ ८८ ॥

मागुती पाहे रामराणा ॥ ऐकून मुनीच्या वचना ॥ तंव तो पुढें अंजनीसूता ॥ काय रघुनंदन बोलत ॥ ८९ ॥

म्हणे सखया संकटकाळीं ॥ आतां संभाळावें ये वेळीं ॥ सीतेतें आणून संकट टाळीं ॥ करी नव्हाळी इतुकीहे ॥ ९० ॥

ऐकून स्वामी वचनार्था ॥ थोर आवेश आला हनुमंता ॥ म्हणे चिंता न करीजे रघुनाथा ॥ जानकी आतां आणितों ॥ ९१ ॥

मग पुढील चरण मागे केला ॥ तो अयोध्येमाजी उभा ठेला ॥ अंतर मंदिरी प्रवेशला ॥ तंव देखतां झाला अपूर्व ॥ ९२ ॥

भूमीशायी जनकबाळा ॥ भोगी निद्रेचा सोहळा ॥ मारुती विचारी ते वेळां ॥ निद्रा भंगिता झगटे दोष ॥ ९३ ॥

मग पुच्छें गुंडाळून मंदीर ॥ उपटून घेतलें समग्र ॥ मागुता दक्षण चरण आवग्र ॥ रणभूमीं ठेविलासे ॥ ९४ ॥

क्षण न लागतां पैं तेथें ॥ न लवतां डोळियाचें पातें ॥ घेऊन आला जानकीते ॥ मंदिरासहित रणभूमी ॥ ९५

॥

मग म्हणजे रघुराया ॥ नमन माझें तुझीया पायां ॥ घेऊन आलों जनकतनया ॥ आदिमाया प्रणवरूपी ॥ ९६ ॥

ऐकून तयाचें उत्तर ॥ परमहर्षयुक्त रघुवीर ॥ मागें पाहे तंव समग्र मंदीर ॥ सीताचिद्रत्न भूमीशायी ॥ ९७ ॥

परम आश्चर्यातें पाहून ॥ म्हणे धन्य माऊली अंजनी निधान ॥ जी प्रसवली ऐसें रत्न ॥ बळिया निधान मारुती ॥ ९८ ॥

मग अंतर्गृहीं प्रवेशून ॥ खुणें जागृत करी सीतेलागून ॥ येरी उठली दचकून ॥ तंव रघुनंदन देखिला ॥ ९९ ॥

मनीं दचकली जनकबाळी ॥ म्हणे मी काय स्वप्न देखिलें येवेळीं ॥ श्रीराम गेले युद्धमेळीं ॥ हे तो नव्हाळी अनुपम्य ॥ १०० ॥

जाणूनि सीतेचें हृद्गत ॥ बोलत जाला रघुनाथ ॥ म्हणे स्वप्न नव्हे हे सत्यमात ॥ होईं जागृत शुभानने ॥ १ ॥

आम्हातें दैत्य नाटोपे युद्धीं ॥ म्हणोनि आणिलेंयें संधी ॥ आतां न लावीं अवधी ॥ त्वरें वधीं दैत्य अधमा ॥ २

॥

निशी उरली किंचित ॥ पुढें जाणें आहे अयोध्येत ॥ दादशी साधन असे तेथ ॥ त्वरित उठें ये काळीं ॥ ३ ॥

ऐसें ऐकतां वचनार्था ॥ चरणावरी ठेवीला माथा ॥ म्हणे द्याजी बाण भाता ॥ धनुष्यलता समवेत ॥ ४ ॥

थोर आवेशें ते काळीं ॥ बाणभाता पृष्ठमौळीं ॥ धनुष्य घेऊन करकमळीं ॥ दिधली आरोळी अटाहास्यें ॥ ५ ॥

ते साक्षात आदिशक्ति ॥ हांकें त्रिभुवन आंदोलती ॥ दैत्य परम दचकला चित्तीं ॥ म्हणे हे चिच्छक्ति प्रगटली ॥ ६ ॥

परी धैर्य मेंढा वाहन ॥ दैत्य आला चालून ॥ वर्षताजाला अमितबाण ॥ जेणें त्रिभुवन कोंदलें ॥ ७ ॥

मग म्हणेजी श्रीरामा ॥ अगाध तुझा महिमा ॥ स्त्रिये लाविलें संग्रामा ॥ अगाध महिमा देखिला ॥ ८ ॥

मी तंव दुर्धर वीर पाहें ॥ स्त्रियेतें संग्राम केवीं लाहे ॥ स्त्रीवरी शस्त्र धरिता पाहे ॥ कवण लाहे पुरुषार्था ॥ ९

॥

परी मी भीत नाहीं मरणातें ॥ अंतकाळीं देखिलें रघोत्तमातें ॥ तेणें सुखावलों अंतरातें ॥ पुढें होणार तें सुखें हो कां ॥ १० ॥

कालची असे हरिदिनी ॥ आतां उदेली द्वादशी साधनी ॥ ऐसें बोलून तेक्षणीं ॥ अमित बाणी वर्षत ॥ ११ ॥

येरीकडे त्रिभुवनजननी ॥ धनुष्यातें बाण लावुनी ॥ विंधिती झाली तत्क्षणीं ॥ निर्वाण बाणें विंधित ॥ १२ ॥

पातें लवतां अर्धघटी ॥ बाण मारिले लक्षकोटी ॥ परी तो दैत्येंद्र महाहट्टी ॥ तितुकेही निवटी बाणजाळ ॥ १३ ॥

हें देखून जनकतनया ॥ विचारून बाण घेतला लवलाह्या ॥ झांपडी पडली दैत्य डोळियां ॥ येऊन ह्रदया आदळत ॥ १४ ॥

एकाचि बाणें केला पूर्ण ॥ कांहीं न सुचे तया लागून ॥ जेवीं वृक्ष पडे उन्मळोन ॥ तेवी असुर पडियेला ॥ १५ ॥

धूड पडतांची मदिनी ॥ वितुळली असुरवाहिनी ॥
जयजयकाराची उठली ध्वनी ॥ वानरसेने आनंद ॥
१६ ॥

सेना विखुरली चहूंकडे ॥ नगर लुटविलें निवाटें ॥
बिभीषण हर्ष कोडें ॥ रामाकडे पाहत ॥ १७ ॥

यापरि निवटूनि असूर ॥ निशी उरली घटका चार ॥
मग युद्ध करूनियां स्थिर ॥ स्तवी रघुवीर जानकीतें ॥
१८ ॥

मागुती हनुमंतातें बोलत ॥ सखया बिभीषणा राज्यीं
स्थापीं त्वरिंत ॥ अवश्य म्हणोनि वायुसुत ॥ पुच्छाग्रीं
बैसवीत सैन्यातें ॥ १९ ॥

दक्षिण चरण उचलूनियां ॥ लंकेमाजी ठेविला
लवलाह्या ॥ मग म्हणेजे रघुराया ॥ उतरावें या लंकेसीं
॥ २० ॥

राज्य द्यावें बिभीषणातें ॥ अयोध्यें चलावें त्वरित ॥
ऐसी ऐकतांची मात ॥ थोर हरुष रामचंद्रा ॥ २१ ॥

मग लंकेमाजी वाद्यघोष ॥ होता झाला परम उल्हास
॥ राज्यीं स्थापून बिभीषणास ॥ अयोध्याधीश आज्ञा
मागे ॥ २२ ॥

मग बिभीषणें दंडप्राय नमस्कार ॥ करूनि स्तविला रघुवीर ॥ म्हणे भक्तपालना ब्रीद थोर ॥ केलें साचार स्वामीयां ॥ २३ ॥

तरीं साधन द्वादशी ॥ जाली पाहिजे लंकेसी ॥ सहपरिवारें स्वसैन्यासी ॥ विधियुक्त पै कीजे ॥ २४ ॥

मग बोले श्रीरघुवीर ॥ हातो येथें न घडे विचार ॥ वाट पाहत असे भरतवीर ॥ तयावीण प्रकार न घडे हा ॥ २५ ॥

धन्य तयाचें बंधुपण ॥ उभयतां ऐक्यत्व पूर्ण ॥ नाहीं तरी सापत्न जाण ॥ घेती प्राण एकमेकांचे ॥ २६ ॥

तैसा नव्हे श्रीरघुवीर ॥ भक्तपाळण समरंगधीर ॥ शांत करूनि लंकेश्वर ॥ निघे सत्वर तेथुनी ॥ २७ ॥

मागुता हनुमतातें ॥ स्तवूनि म्हणें तयातें ॥ सखया नेई त्वरें अयोध्येतें ॥ परिवारा तें काळीं ॥ २८ ॥

ऐकतां रघुवीर-वचन ॥ आवेषला वायुनंदन ॥ मागुता उचलून चरण ॥ अयोध्येमाजी ठेविला ॥ २९ ॥

परिवारासहीत ते वेळीं ॥ सकळसेना उतरली खालीं ॥ सकळ वाहिनी आनंदली ॥ जयजयकारें गर्जती ॥ ३०

॥

तों पूर्वीच पाकसिद्ध होत ॥ स्नानें सारूनियां समस्त ॥ तंव अरुणोदय होतां प्राप्त ॥ पात्रें विस्तारीत समग्र ॥ ३१ ॥

समस्तांसहीत सारूनि भोजनें ॥ द्वादशी साधिली रघुनंदनें ॥ ऐसें द्वादशीचें महिमान ॥ केलें कथन श्रोतियांतें ॥ ३२ ॥

म्हणोनी तिथीमाजी उत्तम ॥ द्वादशी पर्व उत्तमोत्तम ॥ व्रत करिता हें निःसीम ॥ विजयी संग्राम तो पावे ॥ ३३ ॥

आणि प्राप्त होय राजलक्ष्मी ॥ अंतीं पावे मोक्षधामीं ॥ हें अनुपम्य व्रतनेमीं ॥ प्रचीत नामीं असों द्या ॥ ३४ ॥

पदच्युत बिभीषण ॥ तो पावला राज्यासन॥ ऐसें व्रताचें महिमान ॥ व्रत संपूर्ण द्वादशी ॥ ३५ ॥

व्रत करितां शतमुखासी ॥ रामबाणें मुक्ती तयासी ॥ अंती गेला सायुज्यतेसी ॥ पुनरावृतीसी नागवे ॥ ३६ ॥

व्रत करितां रघुनंदन ॥ रणीं विजयी झाला पूर्ण ॥

मर्दूनियां शतमुखी रावण ॥ व्रत संपूर्ण साधिलें ॥ ३७ ॥

म्हणोनियां श्रोतें सज्जन ॥ हें व्रत करावें जाण ॥ जें आचरतां यशकल्याण ॥ मोक्षभुवन प्राप्त होय ॥ ३८ ॥

हे कथा गोड ऐकिली ॥ म्हणोनियां दृष्टांतीं योजिली ॥ श्रोतीं श्रवण कीजे सकळीं ॥ बद्धांजली प्रार्थितों ॥ ३९ ॥

कोणेही प्रकारें करून ॥ करावे भगवंत गुणवर्णन ॥ काळ सार्थक तेणें करून ॥ येत घडून आपैसा ॥ ४० ॥

मग केलें कर्म वायां जाय ॥ हें तो न घडे कालत्रय ॥ म्हणोनियां अति लवलाह्य ॥ वर्णावे गुण हरीचे ॥ ४१ ॥

ऐसें हें द्वादशी महिमान ॥ केलें अवघें कथन ॥ येथून पांच वर्षे संपूर्ण ॥ झाली पुढें अवधान असों द्या ॥ ४२ ॥

किंबहूक्ते न देवेशि न तिथि द्वार्दशसिमा ॥ यस्य मासस्ययो देवो द्वादश्यांतं प्रपूजयेत् ॥ २ ॥

दु:ख द्रारिद्र्य रोगाणामास्पदंसोभि जायते ॥ न द्वारका नोज्जयिनी न काशी-मथुरापिच ॥ ३ ॥

हें व्रत जे करिती नेमेसी ॥ दु:ख दारिद्र नव्हे त्यासी ॥ नको तीर्था यात्रेसी ॥ काशी उज्जनी द्वारके ॥ १४३ ॥

स्वस्ति श्रीअधिक माहात्म्य ग्रंथ ॥ नाटकाधार पद्मपुराणे संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ पंचदशोऽध्याय गोड हा

॥ १५ ॥ ओव्या ॥ १४३ ॥ श्लोक ३ ॥

॥ इति पंचदशोऽध्यायः ॥

------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय सोळावा

श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी रुक्मिणीरंगा ॥ भक्तमानसप्रियह्रदयभृंगा ॥ मुनिजन ध्याई ह्रदयरंगा ॥ ये अंतरंगा श्रीविठ्ठला ॥ १ ॥

सगुण स्वरूपा मेघश्यामा ॥ दीनबंधु आत्मयारामा ॥ सदांसर्वदां नामीं प्रेमा ॥ मनोभिरामा असों दे ॥ २ ॥

आतां ऐका श्रोतेजन ॥ मलमहात्म कथानुसंधान ॥
संवाद लक्ष्मी नारायण ॥ पुण्यपावन कथा हे ॥ ३ ॥

मागें द्वादशीमहिमा वर्णिला ॥ पुनः मागुतां लक्ष्मीनें
प्रश्न केला ॥ तोचि श्लोकार्थ पाहिजे परिसिला ॥
भावार्थ भला असो द्या ॥ ४ ॥

श्रीरुवाच ॥ भगवन् देवदेवेश भक्तानुग्रहकारक ॥
आश्चर्यकारिकथितमाख्यानं पुरुषोत्तम ॥ १ ॥

मासे मलिम्लुचे स्नानव्रतस्य फलमीदृशं ॥ विशेषेण
पुनर्ब्रूहि स्नानस्य फलमीश्वर ॥ २ ॥

क्षीराब्धिजा वदे तेव्हां ॥ ऐकिजे देवाधिदेवा ॥
अभिनव कथेचा ठेवा ॥ परिसिलाजी स्वामियां ॥ ५ ॥

परि स्नान आणि जप ॥ महिमा वर्णिला अमूप ॥ तरी
स्नान केलियानें निष्पाप ॥ पूर्वी कवण झालासे ॥ ६ ॥

कवण स्नानाचें तप ॥ कवण पुण्य जपला जप ॥
येविषयीं होऊन सकृप ॥ निवेदावें स्वामियां ॥ ७ ॥

मग बोले शेषशयन ॥ ऐक प्रिये प्रियवचन ॥ जें
आकर्णितां जाण ॥ होय क्षाळण महापापा ॥ ८ ॥

श्रीकृष्ण उवाच ॥ श्रृणु सुंदरि वक्ष्यामि मलिम्लुच

कृतस्यच ॥ स्नानस्य फलमत्युग्रं पापपंजरभेदकं ॥ ३ ॥

यमलोकं न पश्यंति स्नातामासिमलिम्लुचे ॥ सर्वकार्याणि सिद्धयंति परिपूर्णमनोरथाः ॥ ४ ॥

स्नान दान जप होम ॥ चालविता नेमानेम ॥ तरी पाय वंदी यम ॥ देती क्षेम रोग सर्व ॥ ९ ॥

सर्वारिष्टें ते शमती ॥ संसारी न घडे विपत्ती ॥ सर्व मनोरथ पुरती ॥ उद्धरागती तो पावे ॥ १० ॥

सर्व तीर्थी केलिया स्नान ॥ तयातें घडे तेंची पुण्य ॥ यदर्थी संशय नसे जाण ॥ सत्य जाण शुभानने ॥ ११ ॥

कुरुक्षेत्रादी गया श्राद्ध ॥ कोटि गोदानें प्रसिद्ध ॥ पुरश्चरण एकविध ॥ घडलें जरी प्राणियां ॥ १२ ॥

तरी समता नाहीं जाण ॥ मलमासीं केलिया स्नान ॥ परी भावार्थ परिपूर्ण ॥ धरि संपूर्ण मासवरी ॥ १३ ॥

सहस्र विप्रा इच्छित भोजन ॥ तरी घडे एक द्विज पूजन ॥ तो पावे सदां यश-कल्याण ॥ नेम जाण मासवरी ॥ १४ ॥

जन्म दारभ्य जें पाप केलें ॥ जाणोनि नेणुनि जे कां घडलें ॥ तें सर्व नासे एकचि वेळें ॥ जरीं घडलें स्नान एक ॥ १५ ॥

येच विषयीं इतिहास परम ॥ ऐकें होऊनि उत्तमोत्तम ॥ श्रवण केलिया सुगम ॥ उपरति तात्काळीके ॥ १६ ॥

इंद्रलोकीची अप्सरा कामिनी ॥ नाम तियेचें स्मृतिविलासिनी ॥ त्याहीमाजी ती प्रियमोहिनी ॥ कुबेरा घरीं सदां वसे ॥ १७ ॥

परम प्रीती पात्र ते धनदा ते ॥ स्वगुणें मोहिलें हो तया तें ॥ नृत्य गायनें देखता तयातें ॥ क्षणभरी तें न सोडी ॥ १८ ॥

स्वरूप परम लावण्य ॥ पाहतां होय वीर्य पतन ॥ कंठ जीचा कोकिळे समान ॥ ऐकतां सुरगण भुलती ॥ १९ ॥

असो ती देवलोकींची अप्सरा ॥ स्वरूप वर्णिता अपरंपार ॥ तुच्छ जियेपुढें शंकरदारा ॥ इतर सुंदरा त्या किती ॥ २० ॥

चतुर्दश लोकपाळ प्रार्थितां ॥ परी तेथें न जायची तत्वतां ॥ ऐसी हे लावण्यलता ॥ पुढें वृतांता

परिसीजें॥ २१ ॥

एकदां वनविहारार्थ ॥ सखिया घेऊन त्वरित ॥ निघती झाली क्रीडनार्थ ॥ लक्षुनी पंथ कुरुक्षेत्रीं ॥ २२ ॥

तंव तो पुरुषोत्तम मास ॥ हें तों नेंणें विशेष उद्देश ॥ सहज पातली तया स्थानास ॥ समुदायास तें काळीं ॥ २३ ॥

पांचजण अंध बोलिजेती ॥ ऐका ते कोणकोणती ॥ नेत्र असूनी अंध होती ॥ ऐका प्रचीती तयांची ॥ २४ ॥

एक तो विषयांध जाण ॥ दुजा तो द्रव्यांध पूर्ण ॥ मदिरांध तोची तिसरा जाण ॥ बळांध तोची चौथा पैं ॥ २५ ॥

पांचवा तो दुर्जन पाहे ॥ तंव तो गर्भांधची होय ॥ तयातें उपमाची न साहे ॥ ऐसे हे पांच अंध जाणिजे ॥ २६ ॥

इतुकियांचे वेगळे प्रकार ॥ ते किंचित परिसवूं साचार ॥ विषयांध जाला जो नर ॥ ऐका प्रकार तयाचा ॥ २७ ॥

चित्तीं काम उद्भवतां ॥ मग तो वोळखी न धरी तत्वतां

॥ तयासी धक्का देऊनि जातां ॥ देहावरुता तो नये ॥ २८ ॥

तैसाची मदिरा प्राशिला ॥ नेत्र असतांची अंध झाला ॥ श्रीमुखें जरी ताडिला ॥ परी ओळखिला न पुरे ॥ २९ ॥

आतां तिसरा तो धनांध ॥ द्रव्य मदें उन्माद ॥ स्वकीय येतां सन्निध ॥ ओळखीं न पुसें तयातें ॥ ३० ॥

एखादा तयाचा कोणी आप्त ॥ दरिद्रें गांजिला बहुत ॥ तो जरी भेटावया येत ॥ तयातें पुसत तुम्हीं कोण ॥ ३१ ॥

आतां बलोन्मत्त असती ॥ गजा ऐसें सदां डुल्लती ॥ तयांचे शेजारी हो येती जाती ॥ तरी ते न पाहाती तयातें ॥ ३२ ॥

पांचवा अंध तो दुर्जन ॥ सदां दुजियातें चिंती अकल्याण ॥ घातप्रयुक्त ज्याचें मन ॥ म्हणोनि जाण अंध तो ॥ ३३ ॥

म्हणोनिया पांच अंध ॥ श्रोतियातें केलें विशद ॥ पुढे ऐकिजे संवाद ॥ तया देवांगनेचा ॥ ३४ ॥

ऐसी ते विषयांध पाहीं ॥ सखिया समवेत पातली ठायीं ॥ पर्वकाळ धर्म नेणे कांहीं ॥ जळप्रवाहीं स्वइच्छा गमे ॥ ३५ ॥

संपूर्ण जळक्रीडा करून ॥ केलें नूतन वस्त्र परिधान ॥ तीरा समीप येऊन ॥ केलें अवलोकन चहूंदिशे ॥ ३६ ॥

तंव एकाएकीं नयनीं ॥ कुंजवना ऐसें ते क्षणीं ॥ वन देखती जाली कामिनी ॥ देखूनि मनीं संतोषें ॥ ३७ ॥

नानापरी पुष्पयाती ॥ सुवासे सुशोभती ॥ द्राक्षें फलभारें डोलती ॥ चंपक सेंवती ठायीं ठायीं ॥ ३८ ॥

जाईजुई आणि मालती ॥ बकुळ पुन्ना गरजती ॥ मांदार गुलाब केतकी ॥ कर्दळी डोलती फळभारें ॥ ३९ ॥

ऐसें अनुपम्य तें वन ॥ छाया सुशीतळ सघन ॥ पाहता आनंदली कामिन ॥ तोषलें मन सतीचें ॥ ४० ॥

मग सुवासिक पुष्पें तोडूनी ॥ माळा करीते चतुरकामिनी ॥ स्वकरें छेदितां ते क्षणीं ॥ कामोद्भव मनीं दाटला ॥ ४१ ॥

मग सकळ सखियातें बोले ॥ जरी पुरुष असतां ये वेळे ॥ तरी अरुवार पुष्यसेजे लीळे ॥ भोगित्यें सोहळे विषयाचे ॥ ४२ ॥

वयसा सुंदर सगुण ॥ वरी एकांत क्रीडावन ॥ नानापरी सुवास सुमन ॥ परी भ्रताराविण निर्फळ ते ॥ ४३ ॥

ऐसीं नानापरी कामचेष्टा ॥ करितसे ती वरिष्ठा ॥ तंव तिचें फिरलें अदृष्टा ॥ पातला श्रेष्ठ दुर्वासमुनी ॥ ४४ ॥

सवें शिष्य मेळा अपार ॥ लक्षुनि सरोवर तीर ॥ माध्यानीं आला दिनकर ॥ म्हणोनि समग्र उतरलें ॥ ४५ ॥

कोणी स्नानातें आदरिलें ॥ कोणी बहिर्दिशेसी गेलें ॥ कोणी स्वकर्मीं गुंतलें ॥ एकलें देखिलें दुर्वासा ॥ ४६ ॥

तंव हे देवांगना वहिली ॥ कामज्वरें ऋषीतें न्याहाळी ॥ एकाकीं धावून आली ॥ कंठीं सुदली पुष्पमाळा ॥ ४७ ॥

करीं होती पुष्पमाळा ॥ तेची घातली ऋषीचे गळा ॥ ऐसें देखता ते वेळा ॥ ऋषी आला कोपातें ॥ ४८ ॥

म्हणे नष्टे पापिष्टे पाही ॥ हें त्वा कर्म केलें काई ॥ हें तो आम्हां योग्य नाहीं ॥ आतां घेई शापातें ॥ ४९ ॥

कंठीं घातली माळा ॥ तो भ्रतारची केवळा ॥ तूं तव मदांध अबळा ॥ पिशाच तात्काळ होई का ॥ ५० ॥

ऐसें ऐकतां शापवचन ॥ येरी कंपित दीन वदन ॥ काममद गेला उतरून ॥ करुणा वचन बोलतसे ॥ ५१ ॥

उवाच दीनया वाचा कृतमेतत्क्षमस्व मे ॥ अजानंत्या कृतमिदं कुरुष्वानुग्रहं मयि ॥ ५ ॥

ऐके स्वामी ऋषिराया ॥ अज्ञानत्वें घडे क्रिया ॥ ते क्षमा कीजे स्वामिया ॥ म्हणोनिया पायां लागतसे ॥ ५२ ॥

चरण न सोडी सर्वथा ॥ चरणांवरी ठेविला माथा ॥ कृपाळुवा ऋषिनाथा ॥ शापव्यथा निवारी हे ॥ ५३ ॥

ब्राह्मण ह्रदय कोमळ ॥ कृपेनें द्रवला तात्काळ ॥ म्हणे माझें वाक्य असत्य केवळ ॥ नव्हे अबळे सर्वथा ॥ ५४ ॥

परी चतुर्युग प्रमाण ॥ सहस्र वेळ होय गणन ॥ तोंवरी

पिशाचत्व पावोन ॥ उपरी स्वस्थान पावसी ॥ ५५ ॥

पाहा तरी अन्याय केतुला ॥ पर्वतप्राय दंड तेथे जाला ॥ यालागीं सूज्ञानि ब्रह्मवृंदाला ॥ भिवोन त्याला वंदावें ॥ ५६ ॥

ब्राह्मण असो कैसा तरी ॥ परी चहूंवर्णीचा अधिकारी ॥ मुख्य गायत्री मंत्राधिकारी ॥ म्हणोन चतुरीं नमावें ॥ ५७ ॥

असो उश्शाप पावोनि सुंदरी ॥ ऋषि निघोन गेले ते अवसरी ॥ तात्काळ पिशाचते नारी ॥ पावली निर्धारी ऋषिशापें ॥ ५८ ॥

दुर्घट वना माझारी ॥ कंटक वृक्ष परोपरी ॥ उदक न मिळे निर्धारी ॥ हिंडे सुंदरी पै तेथें ॥ ५९ ॥

आळेपिळे वृक्षासी घेत ॥ श्वापदें नाठवें जीवघात ॥ सदां तळमळे क्षुधित ॥ ऐसे लोटत बहुकाळ ॥ ६० ॥

तंव अकस्मात एके काळीं ॥ याज्ञवल्कीची कन्या सुमेळीं ॥ कांची तपस्विनी नामें बाळी ॥ सखियामेळी पातलीसे ॥ ६१ ॥

तंव तो मलमास विशेष ॥ लक्षुनी तीर्थ यात्रा प्रदोष ॥

चाललीसे कुरुक्षेत्रास ॥ भेटी अनयासें पैं झाली ॥ ६२ ॥

येरी जाऊन लवलाह्या ॥ धरिती जाली तिचे पाया ॥ म्हणे तपस्विनी माया ॥ परिसे सये वृत्तांतु ॥ ६३ ॥

मग मुळापासून वृत्तांत समग्र ॥ कथिला तिये समाचार ॥ शापभय परम दुस्तर ॥ कर्म अघोर सुटेना ॥ ६४ ॥

माये परम उपकारिये ब्रह्मनंदिनी ॥ मुक्त करीं शापभयापासुनी ॥ ऐसें मधुर वचनें करूनी ॥ ऋषिकुमारी प्रार्थिली ॥ ६५ ॥

नम्र वचनें कार्यसिद्धी ॥ नम्र वचनें साधे नवविधी ॥ ते अपाय न पावे कधी ॥ क्रूरवचनीं अनर्थ पैं ॥ ६६ ॥

जयाची वाणी मधुर असे ॥ त्याचें कार्य कधींच न नासे ॥ जो सदां क्रूर बोलतसे ॥ कल्पांती नसे यश तया ॥ ६७ ॥

असो तैसी नव्हे याज्ञवल्की ॥ चतुर भामिनी परम निकी ॥ पिशाचनिचे बोल ऐकोनि की ॥ ह्रदय विवेकी अनुसरली ॥ ६८ ॥

मग बोले ऋषिकन्यका ॥ कीं पिता माझा याज्ञवल्की

देखा ॥ त्याणें मातें निवेदिलें व्रत एका ॥ अधिकमास निर्धारिं ॥ ६९ ॥

पुरुषोत्तम मास विशेष ॥ म्हणोन जातसों सागरसंगमास ॥ तेथें करूनि स्नानदानास ॥ तप विशेष जाणोनी ॥ ७० ॥

मासमात्र करून स्नान ॥ नक्त भोजन मौन्य धरून ॥ त्याहीवरी दीप दान जाण ॥ वरी ब्राह्मण संतर्पण यथाविधी ॥ ७१ ॥

ऐसें तूं तें पुण्य घडलें जरी ॥ कदाचित मुक्त होशी शरीरीं ॥ पिशाचत्व जाऊन निर्धारी ॥ स्वपदीं जाशील तूं ॥ ७२ ॥

ऐकोन तयेचें वचन ॥ येरी बोले दीनवदन ॥ माझा देह पिशाच जाण ॥ केवीं स्नान दान घडें पै ॥ ७३ ॥

तरीं माउलिये तूं माझी माता ॥ मी तंव तुझी धर्मदुहिता ॥ इतुका उपकार करीं आतां ॥ देहव्यथा निवारी हे ॥ ७४ ॥

कांहीं पुण्य तुवां आपुलें ॥ मदर्पण जरी माये केलें ॥ तरी कोटिगुणें आगळें ॥ पुण्य घडे जाणिजे ॥ ७५ ॥

परोपकारा ऐसें पुण्य ॥ दुजें नसेचि सखे जाण ॥ यालागीं माये कृपाकरून ॥ करीं कृपादान येवढें ॥ ७६ ॥

तरी एका दिवसाचें पुण्य ॥ मातें करशिल जरी अर्पण ॥ तरी मी उद्धरागती पावेन ॥ स्थान पावेन आपुलें ॥ ७७ ॥

चतुर्युग केधवां जाती ॥ तोंवरी भोगूं पिशाचगती ॥ यालागीं परिसें विनंती ॥ लागे पुढती पायांतें ॥ ७८ ॥

येरी ऐकून करुणा वचन ॥ कृपेनें द्रवलें अंत:करण ॥ तियेतें अवश्य म्हणवून ॥ दिधलें भाषदान त्रिवाचा ॥ ७९ ॥

म्हणे मी परतो येई तोंवरी पाहीं ॥ तूं येथेंचि राही ये ठाई ॥ चिंता न करीं ह्रदयीं कांहीं ॥ मासान्तीं लवलाहीं येतसें ॥ ८० ॥

ऐसें वदोनि ऋषिअबळा ॥ घेऊन सखियांचा मेळा ॥ सत्वर पावली सागर संगमाला ॥ करी सोहळा मन इच्छा ॥ ८१ ॥

स्नानदानादी यथविधी ॥ मासमास अवघे साधी ॥ पूर्ण करून व्रतविधी ॥ ब्राह्मणविधी परिपूर्ण ॥ ८२ ॥

ऐसी करूनि पुण्य क्रिया ॥ परतूनि आली तया ठायां ॥ तंव ती पिशाची ऊर्ध्व दृष्टी करूनियां ॥ निरखितसे मार्गातें ॥ ८३ ॥

तंव एकाएकीं स्त्रियांचा मेळा ॥ देखून आनंदली वेल्हाळा ॥ धावून धरी चरणकमळा ॥ केला आपुला साच बोला ॥ ८४ ॥

मग ते ऋषिकन्या पाही ॥ करीं उदक घेतलें लवलाहीं ॥ एके दिनीचें पुण्य पाहीं ॥ उदक करीं घातलेंसें ॥ ८५ ॥

पुण्यतोय पडतांच हस्तकीं ॥ तात्काळ देहें जाली निकी ॥ पूर्ववत पुण्यलोकी ॥ अप्सरादेही पावली ॥ ८६ ॥

मुखें करून जयजयकार ॥ करिती जाली नमस्कार ॥ म्हणे माये उपकार थोर ॥ केला माते मजवरी ॥ ८७ ॥

ऐसें वदोनि ते अवसरी ॥ स्वधामा पावली ते नारी ॥ एवढी पिशाची निर्धारी ॥ उद्धरागती पावली ॥ ८८ ॥

म्हणोन मलमासाचें महिमान ॥ स्वयें कथितसे जनार्दन ॥ यालागीं श्रोते सज्जन ॥ कीजे स्नानदान यथाविधीं ॥ ८९ ॥

आपुले स्वकुळीचें वंशी ॥ कवण पावले पिशाच्यत्वासी ॥ अथवा पूर्वीचे वंशोवंशी ॥ हे तो नेणवे आपणासी ॥ ९० ॥

किंवा आपण स्वदेहासी ॥ प्राप्त होऊं कवण ठायासी ॥ हे तो नेणवे आपणासी ॥ म्हणोन व्रतासीं आचरावें ॥ ९१ ॥

म्हणाल काय होतें ये दानें ॥ झणीं न म्हणा ऐसें वचन ॥ येथें लक्ष्मीनारायण संवाद जाण ॥ तरी अप्रमाण कवण म्हणें ॥ ९२ ॥

परि भावार्थ पाहिजे निका ॥ म्हणजे प्राप्तीं तात्काळ देखा ॥ यालागीं करून विवेका ॥ आचरा निका व्रत भावो ॥ ९३ ॥

पुरुषोत्तम मासा ऐसा दुजामास ॥ नाही नाही हो निःशेष ॥ साक्षात पुरुषोत्तमाचा अंश ॥ जाणा निःशेष भाविकहो ॥ ९४ ॥

जैसा पर्वतामाजी मेरु थोर ॥ ग्रहगणीं भानु अपार ॥ गंगेमाजी सरस्वती अपार ॥ बोले श्रीवर आदरें ॥ ९५ ॥

नक्षत्रांमाजी जैसा चंद्रमा ॥ चतुःपादामाजी कामधेनू

उत्तमा ॥ तैसा मासामाजी पुरुषोत्तम ॥ द्विपाद ब्राह्मण हा असे ॥ ९६ ॥

म्हणोन अति आदरें करून ॥ अगत्य कीजे स्नानदान ॥ म्हणोनि बोले जनार्दन ॥ तेंची कथन केले असे ॥ ९७ ॥

स्वस्ति श्रीमलमास माहात्म ॥ पद्मपुराणींचें संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ षोडशोऽध्याय गोड हा ॥ १६ ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ओव्या ९७ ॥ श्लोक ५ ॥ इति षोडशोऽध्यायः ॥

॥ इति षोडशोऽध्यायः ॥

---------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय सतरावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ जयजयाजी रघुराया ॥ अनाथ नाथाप्राणसखया ॥ दुर्धर हे तुझी माया ॥ निवारीं भयापासुनी ॥ १ ॥

मी तव अत्यंत दीन ॥ पदरीं नसे कांहीं धन ॥ जेणें

घडे दान पुण्य ॥ हें तो न घडे जाण सर्वथा ॥ २ ॥

परी विश्वास बैसला एके ठायीं ॥ नामाविण सार्थक नसे कांहीं ॥ म्हणोन भलत्या प्रकारें पाहीं ॥ नाम ह्रदयीं वसों दे ॥ ३ ॥

सकृदुच्चरितं येन हरिरित्यक्षरद्वयं ॥ बद्धः परिकरस्तेन मोक्षाय गमनं प्रति ॥ १ ॥

यालागीं नाही हेत धरिला ॥ दुसराही वाक्य आधार ऐकिला ॥ नारदाप्रति अनुवादला ॥ स्वयें जनार्दनरूपें ॥ ४ ॥

नाहं वसामि वैकुंठे योगिनां ह्रदयेरवौ ॥ मद्भक्ता यत्र गायंति तत्र तिष्ठामि नारद ॥ २ ॥

ऐसिया व्यासवचनें ॥ विश्वास धरिला जीवप्राणें ॥ कथा कुशळता कांहीं नेणें ॥ आणीक नेणे साधन ॥ ५ ॥

आतां कळें तैसें करीं ॥ तारीं अथवा मारीं ॥ उचित येईल तें करीं ॥ अयोध्यापुरवासिया ॥ ६ ॥

ऐका श्रोतेहो सादर ॥ मलमाहात्माचा विस्तार ॥ कथाभाग अपूर्व फार ॥ लक्ष्मीनारायण संवाद ॥ ७ ॥

श्रीभगवानुवाच ॥ श्रृणुदेवि प्रवक्ष्यामि कथामाश्चर्यकारिणीं ॥ मलिम्लुचस्य मासस्य क्रुतस्नानत्रयस्यच ॥ ३ ॥

लक्ष्मीतें वेद जनार्दन ॥ मलमासी करितां स्नान ॥ परि दिनत्रय करितां जाण ॥ तेंही महिमान अवधारा ॥ ८ ॥

जयातें शक्ति नाहीं शरीरीं ॥ स्नान करितां एकमास वरी ॥ तयानें त्रिरात्र बरविया परी ॥ स्नानविधि सारिजे ॥ ९ ॥

तरी येविषयींचा इतिहास ॥ अवधारी जे सावकाश ॥ श्रवणकरितां विशेष ॥ साधे यश तयातें ॥ १० ॥

पूर्वी दक्षिणदिशे पवित्र ॥ प्रतिष्ठान पुण्यक्षेत्र ॥ गंगाप्रवाह विचित्र ॥ ब्राह्मणवर्णी सुपात्र पैं ॥ ११ ॥

ब्रह्मवृंदांचा समुदावो ॥ ठायीं ठायीं वेदघोष पाहाहो ॥ चारीवर्ण स्वधर्म पाहा हो ॥ यथाचारें वर्तती ॥ १२ ॥

षट्कर्मिरत ब्राह्मण ॥ अध्ययन अध्यापन ॥ समयीं अतिथि आलिया जाण ॥ देती भोजन यथासुखें ॥ १३ ॥

श्रुतिस्मृति पुराणें ॥ घरोघरीं हरिकीर्तनें ॥ वेदघोष पारायणें ॥ सदांसर्वदा सारखीं ॥ १४ ॥

तंव तया नगरीं एक ब्राह्मण ॥ धर्मशर्मा नामाभिधान ॥ सदाचारें सुखसंपन्न ॥ सर्वज्ञ दयाळु तो ॥ १५ ॥

तयाची स्त्री परम पतिव्रता ॥ काशीनामें साध्वी विख्याता ॥ एकोमय वर्तती उभयतां ॥ वृद्ध अवस्था दोघातें ॥ १६ ॥

पोटीं संतान नसे कांहीं ॥ परी विद्याबळें मान्यता होई ॥ विशेष भाव सर्वाठायीं ॥ पूजासनीं श्रेष्ठता ॥ १७ ॥

उभयतां समान वयस ॥ तव पातलिया मळमास ॥ गौतमी तटी स्नानास ॥ नारी नर समस्त जाताती ॥ १८ ॥

ऐसें वर्ततां ते अवसरीं ॥ विप्रस्त्रियेनें देखिलें नेत्रीं ॥ मनामाजी विचार करी ॥ म्हणे कवण परी करावी ॥ १९ ॥

जन जाताती स्नानासी ॥ आचरताती पुण्याचरणासी ॥ शक्ति नाहीं माझिया शरिरासी ॥ कवण उपायासी करूं आता ॥ २० ॥

ऐसी चिंता करितां ह्रदयात ॥ तंव पति पातला गृहांत ॥ येरी पुसतसें वृत्तांत ॥ खेदयुक्त आजि कांहीं ॥ २१ ॥

येरू म्हणे स्वामीराजा ॥ वृथा जन्म हा पैं माझा ॥ नेमधर्म तपवोजा ॥ अधोक्षजा नेंणें मी ॥ २२ ॥

मलमास तो पुण्यागळा ॥ स्नानातें जाती विप्रमेळा ॥ स्त्री बाळ वृद्ध सकळां ॥ करिती सोहळा उपचारें ॥ २३ ॥

ते देखो न माझे जीवीं ॥ चिंता वाटतसे ह्रदयीं ॥ परी शरीरीं शक्ति नाहीं ॥ यालागीं पाहीं उद्विग्न मी ॥ २४ ॥

ऐकूनि स्त्रियेचें उत्तर ॥ कृपेनें द्रवलें विप्रअंतर ॥ काय बोले प्रत्युत्तर ॥ तें साचार परिसीजे ॥ २५ ॥

धन्य ते उभयतां पवित्र ॥ तयाचें दर्शने ॥ पवित्र गाव नाहींतरी चित्रविचित्र ॥ स्त्री पुरुष चरित्र अवधारा ॥ २६ ॥

स्त्रिया आचरती नेमधर्म ॥ भ्रतार क्षुधेनें तळमळे परम ॥ तयावरी क्रोधयुक्त अधम ॥ बोले काय कामिनीतें ॥ २७ ॥

म्हणे तुम्हांतें स्नान नाहीं संध्या नाहीं ॥ पाकसिद्धी जाली कीं नाहीं ॥ या विरहित आणीक कांहीं ॥ दूजा नाहीं व्यापार ॥ २८ ॥

स्वयें पुण्य करवेना ॥ दूजियाचें देखों शकेना ॥ आतां क्षणभरी निवांत बैसा ना ॥ मी येत्यें पुराणाहूनी ॥ २९ ॥

तंवतरी निद्रा करा स्वस्थ ॥ लवकरी जेवितां देह पोसत ॥ शेवटी मसणवटी होय प्राप्त ॥ ऐसें ज्ञान सांगत भ्रतारा ॥ ३० ॥

भ्रतारें बोधावें स्त्रियेसीं ॥ शास्त्ररीती आहे ऐसी ॥ सांप्रत स्त्रीधर्मासीं ॥ न भूतो भविष्यति ॥ ३१ ॥

असो ऐसी नव्हे विप्र ललना ॥ नुलंघी कधीं पतिवचना ॥ धन्य ते पतिव्रता अंगना ॥ विप्रराणा संतोषे ॥ ३२ ॥

मग स्त्रियेतें बोले उत्तर ॥ उभयतां जराभूत शरीर ॥ चालतां न ठाके गंगातीर ॥ तरी एक विचार अवधारीं ॥ ३३ ॥

संपूर्ण मासवरी करितां स्नान ॥ शरीरीं अवकाश न दिसे जाण ॥ तरीं त्रिरात्री व्रत संपूर्ण ॥ करूं आपण

उभयतां ॥ ३४ ॥

ऐसा विचार करूनियां ॥ त्रिरात्र जाती तटाकिया ॥ एकमेकाचा हस्त धरूनियां ॥ जाती लवहाह्या स्नानातें ॥ ३५ ॥

उष:कालीं करूनियां स्नान सारूनियां तीळतर्पण ॥ स्वगृहीं येती परतून ॥ देती दान द्विजातें ॥ ३६ ॥

शक्तिनुसार अपूप अन्न ॥ ते कांस्यपात्रीं निक्षेपून ॥ घृतासहित किंचित सुवर्ण ॥ देती दान सत्पात्रीं ॥ ३७ ॥

मग पाकसिद्धी करून ॥ स्वपंक्तीसीं-विप्र पाचारून ॥ यथारूचीं करीती भोजन ॥ आनंद मना उभयतांच्या ॥ ३८ ॥

ऐसे लोटले दोन दिवस ॥ तिसरें दिनीं चालिले गंगेस ॥ तंव अपूर्व वर्तलें त्या समयास ॥ सावकाश अवधारा ॥ ३९ ॥

एक याम उरली रजनी ॥ उभयतांचे निजध्यास असे मनीं ॥ म्हणोन अपरात्रीच उठोनी ॥ स्नानालागुनी चालिले ॥ ४० ॥

स्नानार्थं सर्वं सभारान् गृहीत्वा गौतमीप्रति ॥ गमनं कृत्वामागत्यमार्गे कश्चित् क्षुधाकुल: ॥ ४ ॥

तंव एकाएकीं समोर ॥ पिशाच उभा राहिला थोर ॥ लंबोदर दीर्घ शरीर ॥ क्षुधातुर उभा ठेला ॥ ४१ ॥

मस्तकीं केश विखुरले ॥ ते धूम्राकार आरक्त डोळे ॥ नखाचे गुंडाळे वळले ॥ जिव्हां आवाळें चाटित ॥ ४२ ॥

दंत विशाळ दीर्घ थोर ॥ केवळ अस्थींचा पंजर ॥ उभा ठेला नग्न दिगंबर ॥ देखून विप्र कांपतसे ॥ ४३ ॥

विप्र ललना भयभीत ॥ केउते उदलें अरिष्ट अद्भुत ॥ पुण्यक्रियेसी विघ्न प्राप्त ॥ अकस्मात उदेलें ॥ ४४ ॥

नेणों कर्माचें विंदान ॥ आम्हां पुण्य घडेल कोठून ॥ स्नानातें आजी तिसरा दिन ॥ निवारीं विघ्न केशवा ॥ ४५ ॥

तंव तो पिशाच वृक्षातें ॥ आळेपिळे असे घेत ॥ नयनीं देखून उभयातें ॥ धांवून येत सन्निध ॥ ४६ ॥

तद्दृष्ट्वा विकृतिं भूतं धर्मशर्मा द्विजोत्तमः ॥ उवाच वचनं सूक्ष्मं कोऽसित्वं भीमदर्शनः ॥ ५ ॥

विप्रें धैर्य धरून मनीं ॥ बोलता झाला तेच क्षणीं ॥ म्हणे तूं तव कोण या स्थानीं ॥ आलासि कोठूनीं सांगपां ॥ ४७ ॥

ऐकून विप्राचें उत्तर ॥ येरें घातला नमस्कार ॥ पूर्वस्मरण जालें साचार ॥ बोले उत्तर ब्राह्मणातें ॥ ४८ ॥

ऐक भूदेवा वहिलें ॥ तव दर्शनं पावन झालें ॥ करद्वय जोडून वहिलें ॥ विप्रालागीं तेधवा ॥ ४९ ॥

पिशाच जोडितां कर ॥ विप्र भीतीनें गेला दूर ॥ कांपतसे थरथर ॥ झाला स्थीर ते काळीं ॥ ५० ॥

मग तो पिशाच बोलें वचन ॥ मी पावन जालों तव दर्शन ॥ पूर्व स्मरण आठवलें जाण ॥ ऐकें कथन भूदेवा ॥ ५१ ॥

पूर्वी मी धनवंत सावकार ॥ सकळ वस्तूंचा रक्षणार ॥ माझियां धनासीं नाहीं पार ॥ सौख्य अपार भोगी मीं ॥ ५२ ॥

दासदासी स्वगृहीं ॥ गोमहिषी खिल्लारें पाहीं ॥ पुत्र कन्या स्नुषा सर्वही ॥ मिती नाहीं भाग्यातें ॥ ५३ ॥

परी स्वप्नींही नेणें धर्मदान ॥ मग कैचें पुराणश्रवण ॥ नेणें कधीं हरिकीर्तन ॥ नाही दर्शन संताचें ॥ ५४ ॥

सदां सर्वदां चित्त द्रव्यावरी ॥ विप्र भोजन न घडे तिळभरी ॥ तंव पातली महामारी ॥ जालों शरीरीं हतकाया ॥ ५५ ॥

यमदूतीं नेला मारित ॥ कुंभपाकादी जाचणी तेथ ॥ मज भोगविली अमित ॥ ते न सांगवत माझेनी ॥ ५६ ॥

यमजाचणी अपार ॥ सांगतां उलों पाहे अंतर ॥ शब्द न फुटे बाहेर ॥ बोलता उत्तर तुम्हांसीं ॥ ५७ ॥

ऐसें दुःख बहुत ॥ मज भोगविती यमदूत ॥ मग मज ढकलून देत ॥ चांडाळ योनींत जन्मलों ॥ ५८ ॥

तिसरे जन्मीं भिल्ल जालों ॥ चौरकर्म करूं लागलों ॥ वाट पाडूं लागलों ॥ मारूं लागलों प्राणियां ॥ ५९ ॥

जीवमात्राचा करीं घात ॥ पुराणिकातें जिवें मारित ॥ साधुसंताते द्वेषित ॥ नाहीं भीत पापातें ॥ ६० ॥

परद्वारातें मिती नाहीं ॥ ऐसें पाप वर्तलों देहीं ॥ तंव भगेंद्रें लिंग पाहीं ॥ पतन जालें शरीर ॥ ६१ ॥

मग लागला क्षयरोग ॥ मृत्यु पावलों सवेग ॥ तंव यमलोकींचा संग ॥ सांगता भोग उदेला ॥ ६२ ॥

माझें पाप अति दुस्तर ॥ जाणूनियां यमकिंकर ॥ असिपत्र नरक अघोर ॥ भोगविले फार मजलागीं ॥ ६३ ॥

ऐसे तीस सहस्र वर्षेंवरी ॥ क्लेश भोगविले शरीरीं ॥ मग पिशाच योनि निर्धारी ॥ प्राप्त जाली मजलागीं ॥ ६४ ॥

निवेदिलासे समस्त ॥ परि तव दर्शनें करुनि मुक्त ॥ होईन ऐसें वाटतें ॥ ६५ ॥

ऐसा माझा पूर्ववृत्तांत ॥ निवेदिलासे समस्त ॥ परी तव दर्शनें करूनि मुक्त ॥ होईन ऐसें वाटतें ॥ ६५ ॥

तरी ब्राह्मण ह्रदय कोमळ ॥ करी परोपकार अढळ ॥ जेणें निरसे पिशाचमळ ॥ होई दयाळ महाराजा ॥ ६६ ॥

परउपकारी द्विजवर्या ॥ आचरसी सद्‌वृत्ती सक्रिया ॥ तरीं मातें उपकार करूनियां ॥ निवारींया भयापासुनी ॥ ६७ ॥

ऐसी ग्लानी करून ते काळीं ॥ बोलतसे करुणा मेळीं ॥ विप्र द्रवला ह्रदयकमळीं ॥ अभयवाणीं बोलत ॥ ६८ ॥

म्हणे तो अकिंचन ब्राह्मण गांठीस नाही कांहीं धन ॥ जेणें करितां घडे धर्मदान ॥ तेंही साधन नेणें मी ॥ ६९ ॥

परी मळमास असे प्रस्तुत ॥ त्रिरात्री स्नानातें असे जात ॥ तयामाजी दोन दिवस जाले सतत ॥ उर्वरित दिन एक पैं ॥ ७० ॥

तरीं आम्ही स्नान करून मागुती येतां ॥ तोंवरी तूं स्थिर राहें आतां ॥ पुढें विचार सुचेल तत्वतां ॥ तोची व्यथा परिहारी ॥ ७१ ॥

ऐसा वदोनी प्रश्न तयासी ॥ उभयतां गेले स्नानासी ॥ येरू बैसला मार्गासी ॥ केधवां येती म्हणोनी ॥ ७२ ॥

जळो ही दुराशा पापीण ॥ इणें नाडिलें समग्रजन॥ न सोडी कवणा लागून ॥ दुरत्यय जाणे आशा हे ॥ ७३ ॥

तापसी होकां संन्यासी ॥ भूत अथवा पिशाचासी ॥ रंक हो कां रायासी ॥ आशा कवणासी सुटेना ॥ ७४ ॥

जेणें आशेचा त्याग केला ॥ तोचि जाणावा मुक्त जाला ॥ येर तो जगत्रय भला ॥ सर्वही गोंविला आशेनें ॥ ७५ ॥

असो तो पिशाच आशाबद्ध ॥ मार्ग लक्षीतसे सुबद्ध ॥ तों येरीकडे गंगाजळीं ब्रह्मवृंद ॥ स्नानें करिती अद्यमर्षणीं ॥ ७६ ॥

सारूनियां नित्य कर्म ॥ मागे परतला विप्रोत्तम ॥ तंव मार्गी तो अधम ॥ वाट पाहत बैसला ॥ ७७ ॥

केधवां येईल म्हणोनी ॥ आशाबद्ध निज मनीं ॥ मार्ग लक्षीत बैसला ध्यानीं ॥ जेवीं कामिनी जारातें ॥ ७८ ॥

कीं दाता लक्षीतसे याचक ॥ अन्नार्थी लक्षी अन्नोदक ॥ तृषार्थी लक्षी गंगोदक ॥ तेवीं देख पिशाचतो ॥ ७९ ॥

विप्रातें देखून नयनीं ॥ नमस्कार घातला धरणी ॥ म्हणे दयावंता मोक्षदानी ॥ दावी करणी आपुली पैं ॥ ८० ॥

करुणा शब्द ऐकून कानीं ॥ विप्र द्रवला अंतःकरणीं ॥ मग तयातें आश्वासुनी ॥ उदक करी घेतलेसें ॥ ८१ ॥

म्हणे महापुरुषा ऐक वचन ॥ त्रिरात्री स्नानाचें जे पुण्य

॥ तें तुज म्यां केलेंसे अर्पण ॥ होऊं उद्धरण पैं तुझें ॥ ८२ ॥

ऐसें वचन बोलुनी ॥ उदक घातलें ते चरणीं ॥ तंव नवल वर्तलें तें सज्जनीं ॥ सावधमनी परिसावें ॥ ८३ ॥

पूर्ण दयाळु दीननाथ ॥ दासाचें उणें पडो नेदी किंचित ॥ आपुली ब्रीदावळी सांभाळीत ॥ महिमा वाढवीत भक्ताचा ॥ ८४ ॥

मग स्वर्गींहूनी विमान ॥ उतरतें जालें तेच क्षण ॥ चतुर्भुज विष्णुगुण ॥ समान तेजस्वी ॥ ८५ ॥

परम रमणीय लखलखीत ॥ माजी घंटा घणघणित ॥ ऐसें विमान अकस्मात ॥ नयनीं देखत विप्र तो कां ॥ ८६ ॥

दिव्यदेही करून पिशाच तें ॥ विमानीं वाहिलें तयातें ॥ तंव तो स्तुतिवाद गर्जत ॥ भावें नमीत भूदेवा ॥ ८७ ॥

म्हणे करुणाकरा विप्रवर्या ॥ कृपासागरा परम उपकारिया ॥ वेंचून आपली पुण्यक्रिया ॥ केला मज पापिया उद्धार ॥ ८८ ॥

धन्य ते परोपकारी जन ॥ परकाजीं वेंचिती प्राण ॥ तयावरी संतुष्टे जनार्दन ॥ न लागे आन साधन पैं ॥ ८९ ॥

असो ऐसा पिशाच उद्धरिला ॥ तीन जन्मातें मुक्त जाला ॥ तीन स्नानानें पुण्यागळा ॥ तात्काळ पावला मोक्षातें ॥ ९० ॥

ऐसा प्रत्यय देखून मनीं ॥ पुनः नेम धरिला ब्राह्मणीं ॥ उभयतां गेलें उद्धरोनी ॥ ते वैकुंठ भुवनीं वास्तव्य ॥ ९१ ॥

हें महात्म स्नानाचें ॥ सांगितलें तीन दिवसांचें ॥ अगणित पुण्य एक मासाचें ॥ महिमान स्नानाचें आगळें ॥ ९२ ॥

ऐसा कथाभाग समग्र ॥ लक्ष्मीतें वदे शारंगधर ॥ तोची प्राकृतभाषे सविस्तर ॥ केला उद्धार श्रोतियांचा ॥ ९३ ॥

म्हणोनी भावार्थ धरोनी ॥ व्रत आचरावें सज्जनीं ॥ अमान्य न माना कोणी ॥ व्यासवाणी सत्य हे ॥ ९४ ॥

मी तंव संतांचा पाईक ॥ चातुर्य कळा नसे ठाऊक ॥ परी तेथें वदविता एक ॥ रघुनायक दाशरथी ॥ ९५ ॥

श्रोतियांवक्तियांचे अंतरीं ॥ तोचि व्यापक सर्वांतरी ॥ म्हणोनी प्रार्थनेची वैखरी ॥ कुंठित निर्धारी जालीसे ॥ ९६ ॥

इति श्रीअधिक माहात्म्य ग्रंथ ॥ पद्मपुराणींचे संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ सप्तदशोऽध्याय समाप्तः ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ओव्याची संख्या ॥ ९६ ॥ श्लोक ५ ॥

॥ इति सप्तदशोध्यायः ॥

---------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय अठरावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ जयजयाजी मंगलधामा ॥ मंगलनाम तुझें आत्मयारामा ॥ चराचर फलांकितद्रुमा ॥ नामाअनामातीत तूं ॥ १ ॥

अमंगळ हे माझी काया ॥ मंगलनाम तुझें हे रघुराया ॥ मंगल जननी दुहिता प्रिया ॥ करी छाया कृपेची ॥ २ ॥

तंव कृपाबळें समस्त ॥ वदेन म्हणतों समग्र ग्रंथ ॥ तो सिद्धि पाववीं समस्त ॥ ठेवीं वरदहस्त शिरीं माझ्या ॥

३ ॥

ऐका श्रोते जन सादर ॥ मलमहात्म परिकर ॥ लक्ष्मीनारायण संवाद थोर ॥ भावें साचार परिसीजे ॥ ४ ॥

पूर्वी मेरुगिरीचे दक्षिणपारीं ॥ विंध्याद्री पर्वत निर्धारी ॥ नर्मदा वाहे अमृतमय नीरीं ॥ वृक्षतीरीं शोभती ॥ ५ ॥

नानावृक्ष सुशोभित ॥ नारीकेळीं फळभारें लवत ॥ ताडमाड खर्जुरी शोभत ॥ वृक्ष शोभती नानापरी ॥ ६ ॥

तेथें हंस कारंडव चक्रवाकें ॥ मयोर चातक बदकें ॥ मूषक नकुळ बिडाळकें ॥ आनंदें देखें खेळती ॥ ७ ॥

तेथें ऋषिसमुदावो बरवा ॥ स्नानसंध्यें आराधिती उमाधवा ॥ यक्षगण गंधर्वातें तेधवा ॥ आराम रमवी सर्वातें ॥ ८ ॥

तेथें भवानी सहित शूळपाणी ॥ क्रीडार्थ येताती तये वनीं ॥ ऐसी ते परम शोभीत स्थानीं ॥ अनुपम्य न वदवे ॥ ९ ॥

तेथें भृगुनामे एकनगरी ॥ परम रमणीय परी ॥ सदां वास्तव्य अमरपुरीं ॥ तप आदरें करिताती ॥ १० ॥

तंव तया नगरीं एक ब्राह्मण ॥ भृगुवंशज सकुलीन ॥ वेदाध्यायी परम निपुण ॥ ज्योतिषी पूर्णसिद्धांतीं ॥ ११ ॥

नामतया कुळशर्मा ॥ जाणे सर्व धर्म अधर्मा ॥ तयाची भार्या उपरमा ॥ कुशावती नाम तियेचें ॥ १२ ॥

तिच्या उदरीं कन्यारत्न ॥ प्रसवली ते गुणनिधान ॥ रूपें परम लावण्य ॥ नाम जाण मेधावती ॥ १३ ॥

एकुलती एक वंशस्थळीं ॥ अतिसुंदर रूपागळी ॥ उणी तिजपुढे नैषधबाळी ॥ बहु आगळी चतुरपणें ॥ १४ ॥

ओठ जिचें अति आरक्त ॥ गौरांगीं शोभिवंत ॥ सिंहाकृति कटि शोभत ॥ मृगनेत्री गजगामिनी ॥ १५ ॥

प्राप्त होतां षौडशवर्षे ॥ कुच चमकती जंबीरा ऐसें ॥ पीतवर्ण साजिरे सरसे ॥ देखतां मानस संतोषे ॥ १६ ॥

तपीये विसरले तपा ॥ जपीये विसरले जपा ॥ पाहतां जियेचे स्वरूपा ॥ वीर्य ढळे क्षणार्धे ॥ १७ ॥

ऐसी ते लावण्याची ज्योती ॥ पहातां नेत्र तटस्थ होती ॥ पिता अवलोकितां तये प्रती ॥ जाली उपरती मृगांक ॥ १८ ॥

मग पितयानें वर विचार ॥ करितां जाला साचार ॥ पद्मनाभ एक द्विजकुमर ॥ अतिसुंदर सुलक्षणी ॥ १९ ॥

वेद्शास्त्रसंपन्न होती ॥ मान्यता विशेष सर्वाठायीं ॥ घटितार्थ पाहून ते समयीं ॥ तिथिनिश्चयो पैं केला ॥ २० ॥

सालंकृत कन्यादान ॥ करून अर्पिलें कन्यारत्न ॥ चारी दिवस सोहळा संपूर्ण ॥ ब्राह्मण भोजन यथाविधी ॥ २१ ॥

कांहीं एक दिवस श्वशुरमंदिरी ॥ राहिलीसे ते सुंदरी ॥ उभयतां प्रीति पडिभारी ॥ न सोडिती एकमेकां ॥ २२ ॥

क्षण एक वियोगे व्यथा ॥ सहन होईना उभयतां ॥ तंव दैवयोग विचित्रता ॥ न सोडी सर्वथा कवणातें ॥ २३

॥

एकदां नर्मदा तीरीं विप्रकुमर ॥ जलक्रीडा करितां निर्भर ॥ सन्निध पातला एक मगर ॥ नेला ओढूनी पाताळा ॥ २४ ॥

तीरीं होता जो समुदाव ॥ हाहाःकार करिती जों सर्व ॥ ग्रामवासियांनी घेतली धांव ॥ मात जाणविली पितयातें ॥ २५ ॥

वक्षस्थळ ताडिती मातापिता ॥ श्वशुरासहीत धांवली कांता ॥ शोक करिती मातापिता ॥ हा हा जगन्नाथा केलें काय ॥ २६ ॥

मृत्तिका घेऊन वदनीं ॥ घालीतसे ते कामिनी ॥ शोकवर्णितां उलों पाहे धरणी ॥ कवीची वाणी कुंठित ॥ २७ ॥

म्हणें आहा देवा जगन्नाथा ॥ कोठवरी भोगूं वैधव्यव्यथा ॥ जन म्हणती हे ललना आतां ॥ करिल काई नेणवे ॥ २८ ॥

म्हणे बुडालें माझें जहाज ॥ वोस पडली माझी सेज ॥ सौभाग्य दग्ध झालें आज ॥ बोलूं गुज कवणातें ॥ २९ ॥

ऐसा विलाप करितां ते कांता ॥ पिता सांवरी तियेतें तत्वतां ॥ परि न सोसवे दुःख अवस्था ॥ सांवरून पिता धरी बळें ॥ ३० ॥

पाहा नाहीं कोणी कोणाची ॥ अवघीं सांगाती सुखाची ॥ वेळ येतां मृत्युकाळींचीं ॥ अंती एकलाची जातसे ॥ ३१ ॥

यालागीं सज्ञान जनीं ॥ प्रवर्तावें आत्मसाधनीं ॥ सुटे काळ भयापासूनी ॥ ऐसें जनीं वर्तावें ॥ ३२ ॥

कवणाची माता कवणाचा पिता ॥ कवणाची कांता कवण दुहिता ॥ बंधु भगिनी हे तत्वता ॥ आप्त सोयरे समग्र ॥ ३३ ॥

कवण नाहीं कोणाचे ॥ अंतीं जाणें लागें नेमाचें ॥ यालागीं सार्थक जन्माचें ॥ करा साचें बापानो ॥ ३४ ॥

पहा प्रवाहीं बुडाला विप्रकुमर ॥ तया तें टाकून परिवार ॥ परत ते जाले येरायेर ॥ लहान थोर सर्वही ॥ ३५ ॥

ऐसे लोटतां बहुत दिवस ॥ वैधव्य दशा सतीस ॥ जिताचि मृत्यु स्त्रियेस ॥ भोगितां वैधव्यास जाण पां ॥

३६ ॥

दिवस न लोटेची सर्वथा ॥ न सरे वैधव्याची व्यथा ॥
आयुष्यही न सरेचि तत्वता ॥ मरणावस्था सतीतें ॥
३७ ॥

तंव एके काळीं ते सुंदरी ॥ स्नानार्थ पातली नर्मदातीरीं
॥ तेथें पुराणश्रवणीं क्षणभरी ॥ अवकाशें बैसली असे
॥ ३८ ॥

तेथें निरोपण निघालें ॥ मळमाहात्म पुण्यागळे ॥
स्नान दान करितां एक वेळें ॥ प्राप्त सोहळे वैकुंठीं ॥
३९ ॥

ऐसा विश्वास धरून अंतरीं ॥ गृही पातली ते सुंदरी ॥
मग मृदुवचने प्रार्थना करी ॥ ते अवसरीं पितयाची ॥
४० ॥

म्हणे ताता ऐक वचन ॥ वैधव्य व्यथा न लोटे जाण ॥
तरी उपाव करूं कवण ॥ सांगा मज लागून स्वामियां
॥ ४१ ॥

तिये तें पाहून दुःखभरित ॥ पितानेत्री अश्रु स्रवत ॥
म्हणे बाई एक मात ॥ करी व्रत मलमाहात्म ॥ ४२ ॥

परी संपूर्ण भरत आला मास ॥ उर्वरित राहिला एक दिवस ॥ तरी तूं आचरें स्नानदानास ॥ मौन नक्तास आचरावे ॥ ४३ ॥

उपरी करूं उद्यापन ॥ यथाविधि ब्राह्मण संतर्पण ॥ केलिया घडे महापुण्य ॥ सत्य जाण शुभानने ॥ ४४ ॥

जैसा संपूर्ण ग्रंथ न ऐकतां ॥ शेवटील अध्याय ऐकतां ॥ फळ लाधे हो तत्वता ॥ संपूर्णता प्राप्त होय ॥ ४५ ॥

तैसेंचि हेंही व्रत जाण ॥ करीं तूं एकची दिन ॥ मनोरथ पुरविता भगवान् ॥ श्रीजनार्दन दयाळु ॥ ४६ ॥

ऐसी ऐकता पितयाची वार्ता ॥ बहुत हर्षभरित ते दुहिता ॥ प्रातःकाळीं स्नानार्थ तत्वता ॥ नर्मदा तीरीं पातली ॥ ४७ ॥

संकल्पयुक्त स्नान सारुनी ॥ परतली स्वगृहा कामिनी ॥ मग सत्पात्र विप्र बोलावूनी ॥ बैसे भामिनी पूजेतें ॥ ४८ ॥

त्रयत्रीणिदशक देख ॥ अपूप केले सुरेख ॥ घृतसहीत शर्करामिश्रित ॥ कांस्यपात्रीं संपादी ॥ ४९ ॥

कुंभघट स्थापूनियां ॥ पूजन करीं लवलाह्या ॥ चित्ती भावार्थ धरूनियां ॥ विप्रवर्या अर्पितसे ॥ ५० ॥

दक्षिणेसहीत वस्त्र अलंकार ॥ द्विजा पूजीते सुंदरा ॥ मग मौन्य करूनि नक्त विचारा ॥ सर्वेश्वरा भजतसे ॥ ५१ ॥

स्वपंक्ती विप्र भोजना ॥ सारिती जाली ते ललना ॥ प्रातःकाळी उद्यापना ॥ पिता जाण करवीतसे ॥ ५२ ॥

षड्रस अन्नें निपजवूनीं ॥ घृतपाचित पायसान्नीं ॥ द्विजा बैसवून भोजनीं ॥ दक्षिणादानीं विधियुक्त ॥ ५३ ॥

यथाकाळें फळें आणुनी ॥ ब्राह्मणातें अर्पी दक्षिणादानीं ॥ ओंटी भरून सुवासिनी ॥ नमस्कारूनि बोळवीत ॥ ५४ ॥

ऐसें उद्यापन करूनी ॥ भावार्थबळें प्रसन्न शूळपाणी ॥ विमान आले स्वर्गीहूनी ॥ शिवगणीं मंडित पैं ॥ ५५ ॥

घंटारव होता अपार ॥ माजी शिवगण आणि किन्नर ॥ वाद्यें वाजती अपार ॥ सुरवर तटस्थ ठेले ॥ ५६ ॥

ऐसें विमान उतरतां भूतळीं ॥ दिव्यरूप केली ते बाळी ॥ सर्वां देखता उद्धरोन गेली ॥ आश्चर्य सकळीं पै केलें ॥ ५७ ॥

म्हणती एक दिनीचा व्रत प्रभावो ॥ तात्काळ उद्धरली पहाहो ॥ ऐसा कृपाळू लक्ष्मीनाहो ॥ लीला लाघवो दाखवीतसे ॥ ५८ ॥

असो ते विप्रसुता ॥ शिवाजवळी नेली तत्वतां ॥ येरी चरणी ठेवून माथा ॥ विश्वनाथा नमियेलें ॥ ५९ ॥

नमस्कारून पार्वतीतें ॥ स्तुतिवादें प्रवर्ते स्तवनातें ॥ जोडूनियां बद्धहस्तें ॥ मुखीं गर्जे नामघोष ॥ ६० ॥

जय शंकर सदाशिवा ॥ कर्पूरगौरा उमाधवा ॥ भक्तवरदायक प्रियमाधवा ॥ सोडविले भवापासुनी ॥ ६१ ॥

म्हणे उदारा त्रिनयना ॥ खट्वांगधरा व्याळभूषणा ॥ वृषभध्वजा भक्तपाळणा ॥ दानवनिक्रंदना दयानिधे ॥ ६२ ॥

मी तंव मतिमंद अपराधी ॥ कृपासागर तूं दयानिधी ॥ देऊन पूर्ण कृपा औषधी ॥ भवभयव्याधी निवारिली ॥ ६३ ॥

ऐसा स्तुतिवाद करूनी ॥ मस्तक ठेविला शिवचरणीं ॥ संतोषयुक्त झाली भवानी ॥ देखून नयनीं तियेतें ॥ ६४ ॥

निरखून पाहे भवानी ॥ तंव कुंकुमही न वदनीं ॥ म्हणे धवरहित हे कामिनी ॥ जाणवलें मनीं जगन्मातें ॥ ६५ ॥

मग आश्वासुनी तियेतें ॥ सन्निध बैसविली निरुतें ॥ नाना उपभोग सयोचितें ॥ पुरवी तियेतें भवानी ॥ ६६ ॥

ऐसे लोटले कित्येक दिवस ॥ तंव एके दिवशीं श्रीनिवास ॥ शिवभेटीस अनयास ॥ कैलासा पैं आले ॥ ६७ ॥

नमूनियां कैलासराणा ॥ येरायेर करूनि हास्यवदना ॥ देऊनियां अभ्युत्थाना ॥ रमारमणा बैसविलें ॥ ६८ ॥

स्वागत पुसोनि सकळ ॥ वाराणशी चालले तात्काळ ॥ विमानरूढ ते वेळे ॥ भवानीसहित निघाले ॥ ६९ ॥

सवें घेतली मेधावती ॥ काशीपुरा पावली त्वरित गती ॥ अनुपम्य रचना तये स्थिती ॥ देखून मनीं आनंद ॥ ७० ॥

म्हणोन आनंदवन म्हणती ॥ अमृतवाहिनी भागीरथी ॥ जे त्रिपथगामिनी विख्याती ॥ जन तरती बिंदुमात्रें ॥ ७१ ॥

तेथें वास्तव्य नीलकंठ ॥ करिता जाला वरिष्ठ ॥ केशवराज दैवत श्रेष्ठ ॥ स्थापी नीलकंठ आदरें ॥ ७२ ॥

तंव तेथें अकस्मात मेधावती ॥ देखती जाली पार्वती ॥ खेद खिन्न वैधव्य सती ॥ म्लान वदनें देखिली ॥ ७३ ॥

मग प्रार्थूनि विश्वनाथा ॥ म्हणे हे सती वैधव्यव्यथा ॥ न साहेची सर्वथा ॥ निवारीं कृपावंता हे ॥ ७४ ॥

भोळा उदार कर्पूरगौर ॥ देता झाला अक्षई वर ॥ अक्षई सौभाग्य अपार ॥ होऊं शंकर बोलिला ॥ ७५ ॥

तैं पासुनी नाम जाण ॥ मंगळागौरी ठेवी त्रिनयन ॥ दिधलें अक्षई भुवन ॥ स्थापिली जाण वारणशीये ॥ ७६ ॥

तैं पासूनी नाम विख्यात ॥ म्हणती मंगळागौरी सत्य ॥ जनयात्रेसी जाती नित्य ॥ घेती दर्शन आदरें ॥ ७७ ॥

इतर देशींचे यात्रेकरी ॥ जाती ते नमिती मंगळागौरी ॥ हे प्रचीती अद्याप वरी ॥ सर्वत्र नेत्रीं देखती ॥ ७८ ॥

ऐसीते मेधावती विप्रदुहिता ॥ एक दिनी व्रत आचरतां ॥ वैधव्याची निवारूनि व्यथा ॥ अक्षयी सौभाग्यता ते जाली ॥ ७९ ॥

ऐसें हें मलमाहात्म जाण ॥ लक्ष्मीतें सांगे जनार्दन ॥ तेची प्राकृत भाषा श्रोते सज्जन ॥ करोत श्रवण आदरें ॥ ८० ॥

शास्त्र प्रचीती साक्षीभूत ॥ मनीं धरूनि शुद्ध भावार्थ ॥ भावें आचरावे हे व्रत ॥ सर्व आघात न सोहे ॥ ८१ ॥

शिव पुराणींची हे कथा ॥ पद्मपुराणीं असे तत्वता ॥ तेची प्राकृत भाषे तुम्हां आतां ॥ श्रवण पंथा निवेदिली ॥ ८२ ॥

तया मंगळागौरीचे दर्शन ॥ मंगळ होती सर्वही जन ॥ शंकरगौरी तुष्टमान ॥ होय कल्याण सर्वां ठायीं ॥ ८३ ॥

तरी नर अथवा नारी ॥ बाळ अथवा वृद्ध सुंदरी ॥ लाभ सारिखा सर्वां परी ॥ व्रत निर्धारीं आचरतां ॥ ८४ ॥

इति श्रीमलमहात्म ग्रंथ ॥ पद्मपुराणींचे संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ अष्टादशोऽध्याय गोड हा ॥ १८ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ओव्या ॥ ८४ ॥

॥ इति अष्टादशोऽध्यायः ॥

--------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय एकोणिसावा

श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी श्रीगुरुसमर्था ॥ भाविकांते मोक्षदाता ॥ अनाथनाथा कृपावंता ॥ करुणाकरा दीनबंधो ॥ १ ॥

अगाध भक्तीचा महिमा ॥ भक्तप्रिय सर्वोत्तमा ॥ भक्तिवीण निरर्थक जन्मा ॥ प्राणियांचा निर्धारें ॥ २ ॥

यालागीं भाव धरून अंतरीं ॥ प्रचीत घ्यावी शरीरीं ॥ आत्मप्रचीत गुरुप्रचीतवरी ॥ शास्त्रप्रचीत तिसरी जाणिजे ॥ ३ ॥

म्हणोन दृष्टांतीं कथाभाग सत्य ॥ स्वयें बोलिला श्रीअनंत ॥ ही जाणिजे शास्त्रप्रचीत ॥ ऐका दृष्टांत दुसरा ॥ ४ ॥

वक्ता वदेल अर्थांतर ॥ तो जाणिजे गुरुकृपा साचार ॥ भाव धरूनि उकलावें अंतर ॥ मग साक्षात्कार आत्मप्रचीती ॥ ५ ॥

एवं तिन्ही प्रचीती घेऊनी ॥ प्रवर्तावें श्रोतेजनीं ॥ याउपरी मलमास कथनीं ॥ श्रोतेजनीं परिसावी ॥ ६ ॥

लक्ष्मी नारायण संवाद ॥ तोची श्रोतियां करूं विशद ॥ ऐका विचक्षण सावध ॥ जेणें हरेल वेध मानसीं ॥ ७ ॥

क्षीराब्धिजा वदे पुरुषोत्तमा ॥ अनुपम्य ऐकिला जी महिमा ॥ तरी पुढील परिसावें नेमा ॥ कवणे परी आचरावें ॥ ८ ॥

कवण उद्धरोनि गेला ॥ कवणें नेम असा साधिला ॥ हा तंव विस्तार आगळा ॥ कृपा करून वदावा ॥ ९ ॥

ऐकून लक्ष्मीची वाणी ॥ बोलता जाला चक्रपाणी ॥ म्हणे ऐकहो शुभकल्याणी ॥ एकाग्र करून मानस ॥ १० ॥

मेरु सिंधौतु नगरी वर्तते बहुविस्तरा ॥ नाम्ना शिवपुरी ख्याता शिवस्याति प्रिया सदा ॥ १ ॥

गोकर्णस्य गिरेः प्रार्श्वे प्रासादाट्टलभूषिता ॥
बव्हाश्चर्यवतीरम्या रम्यचत्वर शोभिता ॥ २ ॥

नाना ब्राह्मणसंयुक्ता क्षत्रियैश्च विराजिता ॥ वैश्यैः शूद्रै
स्तथान्यैश्च संयुक्ता सत्यवादिभिः ॥ ३ ॥

तस्यामासीत्सदाचारः शूद्रः कश्चिद्द्वरोगृही ॥ नाम्नापि
विप्रदासोसौ कमर्णापि तथाविधः ॥ ४ ॥

तस्य पत्नी विप्रदासीसा नाम्ना शुभलक्षणा ॥ साध्वी
पतिपरापत्युराज्ञासन्निता सदा ॥ ५ ॥

मेरु तळाचिया ठायीं जाण ॥ शिवकांची नगरी
विस्तीर्ण ॥ ब्रह्मसमुदावो परिपूर्ण ॥ अध्ययन घरोघरीं
॥ ११ ॥

गोकर्णाचे पश्चिमदिशे ॥ अपूर्व नगरी ते असे ॥ क्षुद्र
क्षेत्री सर्व धर्म वसे ॥ वेदमार्गे वर्तती पैं ॥ १२ ॥

वेदमर्यादा नुलंघिती कोणी ॥ ब्राह्मणा पूजिती वर्ण
तिन्ही ॥ श्रौतस्मार्त अवग्रहणीं ॥ सदाचारें ब्राह्मण
वर्तती जे ॥ १३ ॥

नगराची रचना अतिअद्भुत ॥ पाहून जननयन तटस्थ
होत ॥ रम्य गोपुरें लखलखीत ॥ बरवी झळकत

रविकिरणें ॥ १४ ॥

तया नगरीं एक शूद्र जाण ॥ नाम तयाचें विप्रदास म्हणोन ॥ बाहाताती सर्वही जन ॥ सेवाधारी पूर्ण ब्राह्मणाचा ॥ १५ ॥

एका विप्राचिया घरीं ॥ करून सेवा चाकरी ॥ निरंतर वर्ते सदाचारी ॥ विश्वास पूर्ण ब्राह्मणाचा ॥ १६ ॥

तयाची भार्या पतिव्रता पूर्ण ॥ नुलंघी कदा पतिवचन ॥ तेही विप्रसेवा करूनि जाण ॥ कुटुंब रक्षण करिताती ॥ १७ ॥

याउपरी एके दिनी ॥ मलमासे संधी जाणुनी ॥ विप्रमेळा तये क्षणीं ॥ स्नानालागुनी चालिले ॥ १८ ॥

तंव ते शुद्रकामिनी ॥ विनवी भ्रताराला‌गुनी ॥ समस्त जग मिळोनी ॥ स्नानालागुनी जाताती ॥ १९ ॥

तरी आपण वर्णहीन याती ॥ केवी न घडेल पुण्यप्राप्ती ॥ द्रव्यही नाहीं संचितीं ॥ जे दान पद्धती करावी ॥ २० ॥

यालागीं प्राणनाथा पाहीं ॥ विप्रा सांगातें चला सर्वही ॥ दानधर्मातें धन तें नाहीं ॥ परी करूं देह पवित्र ॥

२१ ॥

स्नानें करून पवित्रता ॥ ऐसी वदतसे जनवार्ता ॥ यालागीं विप्रातें प्रार्था ॥ न्यावे तत्वता समागमें ॥ २२ ॥

ऐसें ऐकून उत्तर ॥ द्रवलें शूद्राचें अंतर ॥ मग प्रार्थूनिया द्विजवर ॥ निघाला सत्वर कुटुंबेंसि ॥ २३ ॥

यात्रेचा समुदावो पातला ॥ गोकर्ण क्षेत्राप्रति आला ॥ पाहोन तेथीच्या गंगाजळा ॥ तटस्थ जाला समुदावो ॥ २४ ॥

गंगा पाहतांच नयनीं ॥ तात्काळ पातका होय धुणी ॥ समग्र जन स्नानालागुनीं ॥ तये स्थानीं उतरले ॥ २५ ॥

नित्य करिती स्नानदानास ॥ यात्रा राहिली एक मास ॥ विप्रासवें शूद्रही स्नानास ॥ स्त्रियेसहीत जातसे ॥ २६ ॥

नित्य स्नान-विधीसारूनी ॥ मग पुष्पबिल्वादी आणुनी ॥ नित्य पूजितसे शिवभवानी ॥ भावार्थ मनी आगळा ॥ २७ ॥

उभयतां जाऊनि वनांत ॥ काष्ठभारा आणिती नित्य ॥

त्याचा विक्रय करून सत्य ॥ द्रव्य संचय करिताती ॥ २८॥

मौन्य न बोलती कवणासी ॥ नक्त राहती उपवासी ॥ सायंकाळीं सारिती भोजनासी ॥ नित्यनेमेसी वर्तत ॥ २९ ॥

ऐसे व्रत संपूर्ण एकमास ॥ उभयतां आचरली निर्दोष ॥ पाप जळालें निःशेष ॥ नाहीं लवलेश तिळभरी ॥ ३० ॥

मग संचयो जो धनाचा ॥ नित्य विक्रय काष्ठाचा ॥ तो काढुनियां तयाचा ॥ व्यय करिते पैं जाले ॥ ३१ ॥

यथायुक्त ब्राह्मण भोजन ॥ करिते जाले उद्यापन ॥ त्रयचि दशक अपूप अन्न ॥ केलें अर्पण द्विजातें ॥ ३२ ॥

मग शेवटीं ते उभयतां ॥ भोजनीं बैसलें तत्वता ॥ घेऊन विप्रांची मंत्राक्षता ॥ बिराडमार्गी चालिले ॥ ३३ ॥

तंव नवल वर्तलें तये क्षणीं ॥ रात्र जाली एक यामिनी ॥ तंव एक पिशाच मार्गस्थानीं ॥ उभां येऊनि ठाकला ॥ ३४ ॥

विक्राळ वदन भयंकर ॥ लंबबाहो विशाळ शरीर ॥ मुख पसरूनि क्षुधातुर ॥ धांवला समोर ग्रासावया ॥ ३५ ॥

तयातें पाहून उभयांनीं ॥ तटस्थ ठेले तयास्थानीं ॥ तंव दैवयोगें करूनीं ॥ अपूर्व काहाणीं पैं जाली ॥ ३६ ॥

पुण्यशरिरी शूद्रदंपत्य ॥ पाहूनी पिशाच प्रेत ॥ क्रूर भावना निरसून तेथें ॥ जाला बोलतां शूद्रातें ॥ ३७ ॥

म्हणे महापुरुषां तू कोण ॥ येथें यावया काय कारण ॥ मी तंव क्षुधीत पिशाच जाण ॥ करावया भक्षण आलों तुम्हां ॥ ३८ ॥

परी तंव दर्शनें समाधान ॥ पावन जालें माझें मन ॥ तूंतें करितां संभाषण ॥ वाटे पावन होईन मी ॥ ३९ ॥

आजवरी या पर्वतशिखरीं ॥ मी फिरत होतों वनांतरी ॥ वृकव्याघ्र नानापरी ॥ क्षुधाहारीं हिंडतसे ॥ ४० ॥

परि क्षुधा न धाय सर्वथा ॥ या क्षुधेंत फिरे मी तत्वता ॥ तंव दृष्टीस देखिलें अवचिता ॥ विप्रदासा तुजलागी ॥ ४१ ॥

तरी कृपावंता दयानिधी ॥ निरसी माझी भवव्याधी ॥

देऊनियां पुण्य औषधी ॥ भवभयव्याधी हरावी ॥ ४२ ॥

ऐकून तयाचें उत्तर ॥ शूद्र वदे तेव्हां प्रत्युत्तर ॥ म्हणें तूं पूर्वी होतासि थोर ॥ ते सविस्तर निवेदी ॥ ४३ ॥

कवण पापास्तव पाहें ॥ पिशाच देह लाधला आहे ॥ तो सांगे लवलाहें ॥ पुढें उपाय विचारू ॥ ४४ ॥

येरू म्हणे ऐकें स्वामिराजा ॥ पूर्वी मीं क्षेत्रज वंशी राजा ॥ होतों पराक्रमीं तेजःपुंजा ॥ शत्रु सहज पायातळी ॥ ४५ ॥

सर्वांवरी दरारा पाहें ॥ कापती सर्वही राये ॥ यवन मंडळी पाळीं निर्भय ॥ नाहीं भयपापाचें ॥ ४६ ॥

पुण्य लेश नाहीं सर्वथा ॥ स्वप्नीं नेणें धर्मवार्ता ॥ मार्ग पाडून तत्वता ॥ वस्तु हरीं मार्गस्थांच्या ॥ ४७ ॥

परद्वार असंख्यात ॥ मज घडले अपरमित ॥ माझिया पापा नाहीं गणित ॥ सौख्या अमीत भोगिलें ॥ ४८ ॥

आपपर नेणें सर्वथा ॥ प्रजेतें नागवीं तत्वता ॥ त्यांचिया शापें मज ताता ॥ क्षयरोग लागला पैं ॥ ४९ ॥

त्यायोगें मृत्यु पावलों सवेग ॥ यमदूतीं कर्शूनियां आंग ॥ दुर्धर माझा पापभोग ॥ जाणुनि जाचिती मजलागीं ॥ ५० ॥

मी दानधर्म केलाच नाहीं ॥ अतीत अभ्यागत नेणें कांहीं ॥ तीर्थ पर्वणी स्वप्नीही ॥ पाहिलीं नाहीं पापिष्टें ॥ ५१ ॥

द्रव्य असूनि माझे पदरीं ॥ मी तव तीर्थ दान न करीं ॥ सरली आयुष्याची दोरी ॥ नरक अघोरी टाकिलें मज ॥ ५२ ॥

मग तेथें बहु पस्तावलों ॥ अहा देवा स्वधर्म आंचरलों ॥ पापातें मी नाहीं भ्यालों ॥ मदबळें करूनियां ॥ ५३ ॥

मग तेथें उपाव नसे काहीं ॥ हिंपुटी जालों स्वदेहीं ॥ द्रव्य जोडिलें तेंही ॥ राहिलें जेथिचें तेथेंची ॥ ५४ ॥

व्यर्थ गेलीं माझी वयसा ॥ पापबळें जोडिला पैसा ॥ संसारकारणीं सर्व आशा ॥ शेवटीं नाशा पावलों ॥ ५५ ॥

मिळोनीं काका मामा आत्या ॥ बंधुभगिनी आणि चुलत्या ॥ मिळूनियां मज भोंवत्या ॥ वाटोळे केलें

द्रव्याचें ॥ ५६ ॥

सासूसासरा विहिणी ॥ सुना जावई काकी मामी ॥ आपा आबा सर्वांनीं ॥ वेढिले मजलागी धनलोभें ॥ ५७ ॥

शेवटीं अंतकाळ आला ॥ सकळ जालीं सभोंवती गोळा ॥ हात देऊनी कपाळा ॥ रडती खळखळा धनासाठीं ॥ ५८ ॥

म्हणती छत्र गेलें आमुचें ॥ कोण रक्षण करील कुटुंबाचें ॥ शेवटीं नाहीं कोणी कोणाचें ॥ सर्वही जायाचें सर्व लेणें ॥ ५९ ॥

ऐसी गती माझी झालीं ॥ शेवटीं यमयातना प्राप्त झाली ॥ सर्व आटलें तये काळीं ॥ सोडविता बळी न दिसे पैं ॥ ६० ॥

काळाचे मुखींहूनी सर्वथा ॥ न देखों कोणी सोडविता ॥ यालागीं विचक्षण जनीं तत्वता ॥ मोक्षपंथा स्मरावें ॥ ६१ ॥

एका सद्‌गुरू वांचुनी ॥ उपाव नाहींच त्रिभुवनीं ॥ तोची सोडवी काळापासुनी ॥ इतरांची कहाणी न चलेची ॥ ६२ ॥

ऐसा मी फार पस्तावलों ॥ शेवटीं रवरवीं पडता जालों ॥ तेथें बहुत जाजावलों ॥ कुसमुसलों अंतरीं ॥ ६३ ॥

तेथें कुंभपाक कुंड ॥ तळीं विस्तीर्ण लहान तोंड ॥ तयामाजी नरक भरला उदंड ॥ तोचि दंड प्राणियातें ॥ ६४ ॥

त्यामाजी नेउनी टाकिती ॥ एकावरी एक रिचविती ॥ उसंत नाहीं निघावयाप्रती ॥ बुचकळ्या घेती एकाएक ॥ ६५ ॥

तंव टोले देती यमदूत ॥ मागुते आंत लोटीत ॥ नाकीं तोंडीं भरत नरक तो ॥ ६६ ॥

ऐसो जाचणी दिवस बहुत ॥ भोगिली सहस्र वर्षे परियंत ॥ शेवटी मज काढूनि देत ॥ पिशाच योनींत टाकिलें ॥ ६७ ॥

तेथे क्षुधा लागतां बहुत ॥ परी संकीर्ण रंध्रमुखांत ॥ कवळमध्यें अडकत ॥ क्षुधा शांत न होय ॥ ६८ ॥

उदक प्राशनासी नाहीं ॥ संवदनीचें किंवा अशौच्य देहीं ॥ निर्मळ पाहतातें नाहीं ॥ ऐसी देहीं दुःखयातना ॥ ६९ ॥

वस्त्र नाहीं दिगंबर ॥ वृक्षावरी आमुचें घर ॥ ऐसा भोग तीस हजार ॥ संवत्सर भोगावा ॥ ७० ॥

यालागीं भाकितों करुणा ॥ कृपाळू तू तापसी राणा ॥ देऊन कांहीं पुण्यदाना ॥ निवारी यातना माझी हे ॥ ७१ ॥

अवघे गेले सुखाचे सांगाती ॥ शेवटी झाली हे माझी गती ॥ कृपासागरा दयामूर्ति ॥ करीं निवृत्ती पापाची ॥ ७२ ॥

येवढा उपकार करीं ॥ सुकृत बांधीं आपुले पदरीं ॥ चुकवीं माझी जन्ममरण फेरी ॥ थोर उपकारीं बुडेन मी ॥ ७३ ॥

ऐसी करुणादीन वाणी ॥ ऐकून शूद्र द्रवला अंतःकरणी ॥ मग उदक करीं घेऊनी ॥ संकल्पुनी सोडित ॥ ७४ ॥

म्हणे महापुरुषा ऐक ॥ तूं तंव कर्मपातकी देख ॥ तूं तें पाहूनि अधिक ॥ दया मातें उपजली ॥ ७५ ॥

तरी सप्तदिन स्नानाचें फळ ॥ मी आचरी जो केवळ ॥ मलमाहात्माचें निर्मळ ॥ तें हें जळ असे पैं ॥ ७६ ॥

या सप्तदिनाचे पुण्येकरून ॥ तुझें पापक्षाळण ॥ तात्काळ जाई उद्धरून ॥ ऐसें म्हणोन उदक सोडिलें ॥ ७७ ॥

तें उदक पडतां प्रेतहस्तीं ॥ तेथें आश्चर्य झाले श्रोतीं ॥ अवधाराहो परमप्रीती ॥ महापातकी उद्धरला ॥ ७८ ॥

तात्काळ दिव्य देह पावला ॥ प्रेतभाव सर्व लोपला ॥ तंव अकस्मात देखिला ॥ घंटारव स्वर्गींचा ॥ ७९ ॥

दिव्य विमान स्वर्गींहून ॥ तात्काळ उतरलें तयेक्षण ॥ लखलखीत देवगण ॥ उभे येऊन ठाकले ॥ ८० ॥

पिशाच उद्धरला तात्काळ ॥ विमानीं बैसवोनि गेला ते वेळ ॥ नेत्रीं पाहते जाले सकळ ॥ म्हणती धन्य फळ स्नानाचें ॥ ८१ ॥

मलस्नान अगाध महिमा ॥ कृपाळु तो सर्वोत्तमा ॥ धन्य या शूद्राच्या नेमा ॥ केलें कर्म अघटित ॥ ८२ ॥

स्वयें पुण्याचें दान केलें ॥ ऐसें कधी देखिलें ना ऐकिलें ॥ ऐसिया पापिया तें उद्धरिलें ॥ अनुपम्य केलें या शूद्रें ॥ ८३ ॥

आश्चर्य करून सर्वांनी ॥ येऊन लागती शूद्रचरणीं ॥

जयजयकार गोकर्णी ॥ प्रवर्तला आदरें ॥ ८४ ॥

मग नानापरी दिव्यान्न ॥ ठायीं ठायीं विप्रभोजन ॥ होता पुराणकथा श्रवण ॥ आनंद पूर सर्वांतें ॥ ८५ ॥

ऐसा मलमास स्नानमहिमा ॥ निवेदिला श्रोतयां तुम्हां ॥ जो कथिला सार्वभौमा ॥ श्रीविष्णु लक्ष्मीते ॥ ८६ ॥

तोचि प्राकृत भाषे वैखरीं ॥ भरविला श्रोतियांचे कर्णद्वारीं ॥ न्यून पूर्ण तो चतुरीं ॥ क्षमा मजवरी पैं कीजे ॥ ८७ ॥

मलमहात्म अगाध महिमा ॥ जेणें संतोष पुरुषोत्तमा ॥ म्हणोनि धरिजे अतिनेमा ॥ अनुक्रमें संपादावा ॥ ८८ ॥

कांहीं धन न लागतां बहुत ॥ फुकाचें पुण्य असे जोडत ॥ यालागीं साधावें हिताहित ॥ हेची विहित सर्वदां ॥ ८९ ॥

शेवट कोणी कोणाचें नाहीं ॥ एकटें पडणें लागे प्रवाहीं ॥ धनधान्यतें सर्वही राही ॥ जेथील तेथेंची ॥ ९० ॥

यालागीं करा काढाकाढी ॥ साधा बापानों लवडसवडी ॥ जेणें सुटे काळाची वोढी ॥ ऐसी

तांतडी करावी ॥ ९१ ॥

इति श्रीमलमासमहात्म ग्रंथ ॥ पद्मपुराणाचे संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ एकोनविंशोध्याय गोड हा ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ओव्याः ९१ ॥

श्लोक ५ ॥ इति एकोनविंशोऽध्यायः ॥

--------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय विसावा

श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी सद्‍गुरुमूर्ती ॥ अनुपम्य तुझी अगाध कीर्ति ॥ चुकवी जन्ममरणांती ॥ हे ख्याती अनुपम्य ॥ १ ॥

भावार्थ पाहिजे निका ॥ व्यर्थ नको हे लापणिका ॥ जेवी गंगा मनकर्णिका ॥ क्षय करी पापातें ॥ २ ॥

जेवी अग्नि स्फुलिंग पाही ॥ भस्म करी सर्व तृणवळई ॥ तैसा सद्‍गुरु मंत्र पाहीं ॥ भस्म होई पापसमूहो ॥ ३ ॥

असो ऐसे जे सद्‍गुरु ॥ तया माझा नमस्कारु ॥ शिरीं ठेवा वरद करु ॥ जेणें भवपारु होय माझा ॥ ४ ॥

आतां ऐका भाविकजन ॥ कथेसीं द्यावें अवधान ॥ येथींचे ग्राहिक कोणकोण ॥ त्यांचें श्रवण करावें ॥ ५ ॥

येर अभाविका चाड नाहीं ॥ व्यर्थ न पडावें प्रवाहीं ॥ जें जें असेल जयाचे दैवीं ॥ तेची नवाई भोगूत ॥ ६ ॥

तोची भावार्थ निका ॥ प्राकृत भाषेंत टीका ॥ भावार्थ बळें ऐकां ॥ म्हणे दासानुदास ॥ ७ ॥

श्रीकृष्ण उवाच ॥ भूय एव प्रवक्ष्यामि श्रुणु सर्वांगसुंदरि ॥ मलिम्लुचकृतं स्नानं फलमद्भुतकारणं ॥ १ ॥

सौराष्ट्रे सुजने देशे वृक्षछाया विवर्जिते ॥ खेटखर्वट संयुक्ते श्वखरौघसमन्विते ॥ २ ॥

विष्णू वदे लक्ष्मीतें ॥ मलमहात्म अति अद्भुत ॥ जें सुखदायक सर्वांतें ॥ श्रवण करी यथार्थ ॥ ८ ॥

सौराष्ट्र देशाचिये ठायीं ॥ जाली असे अपूर्व नवाई ॥ तेची कथा तूंतें सर्वही ॥ ऐक एकाग्र ते शुभानने ॥ ९ ॥

तो देश परम कंटक ॥ कोठें वृक्ष न मिळे एक ॥ छाया

नाहींच कोठे देख ॥ बैसावया पांथस्था ॥ १० ॥

वस्तीसी ग्राम न मिळे सर्वथा ॥ तेथें पक्षी श्वापदांची कोण वार्ता ॥ ऋषि समुदावो पाहातां ॥ तोचि तत्वता न दिसे ॥ ११ ॥

ऐसा तो देश कुलक्षण ॥ तेथील एक नगर विस्तीर्ण ॥ नाम तयाचें प्रभास पूर्ण ॥ चर्या संपूर्ण रविसम ॥ १२ ॥

प्राकार गोपुरें परिपूर्ण ॥ स्वधर्माचारें सकळजन ॥ वर्णाश्रम धर्मचारी वर्ण ॥ शास्त्राधारें वर्तती ॥ १३ ॥

राजा तेथील परम धर्मिष्ट ॥ आडकाठी नाहीं कोठे ॥ उदारपणें अतिधारिष्टे ॥ पुरवी मनोरथ याचकाचे ॥ १४ ॥

ब्राह्मण सदाचारें वर्तती ॥ सदां वेदाध्ययन करिताती ॥ नित्य नैमित्य साधिती ॥ सदां करिती वेदघोष ॥ १५ ॥

जपतप होमहवन ॥ मंत्रतंत्र प्रातःस्नान ॥ सदां आचरतां ब्राह्मण ॥ वेदसंपन्न सदाचारी ॥ १६ ॥

जनसारिती प्रातःस्नान ॥ तेणे म्हणविती ब्राह्मण ॥ स्नान करी तोंवरी जाण ॥ शुद्ध ऐसें जाण शास्त्र वदे ॥

१७ ॥

स्नानाविणें वर्तती विप्र ॥ कोणी न पाहाती त्यांचें वक्त्र ॥ म्हणती भेटला अपवित्र ॥ म्हणोनी फिरती माघारे ॥ १८ ॥

यालागीं नेमें करूनी ॥ नित्यनेमें प्रवर्तावें प्रातःस्नानीं ॥ ऐसें पुण्य करितां जनीं ॥ ते पुण्यनिदानीं कामाये ॥ १९ ॥

ऐसे शुचिर्भूत ब्राह्मण ॥ नित्य करिती प्रातःस्नान ॥ करूनियां पंचमहायज्ञ ॥ अतिथी सन्मान समयासी ॥ २० ॥

ऐसे तया नगराचे भूदेव ॥ मिळोन सकळ समुदाव ॥ मलमास लक्षुन पाहाहो ॥ चालिला समुदावो स्नानातें ॥ २१ ॥

नित्य गंगातिरीं पाहीं ॥ जाती नरनारी सर्वही ॥ तीर्थदान जपतप सर्वही ॥ शास्त्राधारें आचरती ॥ २२ ॥

उठोनी पंचपंच उषःकालीं ॥ स्नानें सारिती गंगाजळीं ॥ दानें देताती विप्रमंडळी ॥ अति सुमेळीं विप्रांतें ॥ २३ ॥

कोणी करिती दीपदान ॥ कोणी करिती तांबूलदान ॥ कोणी अर्पिती उपान दान ॥ छत्रदान ब्राह्मणातें ॥ २४ ॥

कोणी कुंभदान करिती ॥ कोणी अपूपान्नें अर्पिती ॥ घृतपात्रासहित देती ॥ विप्राप्रति सुवर्ण ॥ २५ ॥

ऐसी दानें अर्पून विप्रातें ॥ मग स्वगृहीं ब्राह्मण पंक्तीतें ॥ घेऊन षड्रस अन्नातें ॥ देती विप्रातें भोजन ॥ २६ ॥

ऐसा सारितां नित्य नेमास ॥ संपूर्ण होऊं सरला मास ॥ तव अपूर्व वर्तलें तया समयास ॥ ते सावकाश अवधारा ॥ २७ ॥

सोमशर्मा नामे एक ब्राह्मण ॥ असे तो वेदशास्त्रसंपन्न ॥ नाना तीर्थी तपदान ॥ केलें संपूर्ण ब्राह्मणें तें ॥ २८ ॥

यज्ञदानादि क्रिया सर्वही ॥ जाणता विप्र तो प्रत्यही ॥ स्नानातें जातां एके समयीं ॥ गंगातीरी पावला तो ॥ २९ ॥

मार्गी जातां स्नानासी ॥ तंव एक राक्षस त्यासी ॥ भेटता जाला वाटेसी ॥ अति भयंकर रूपें ॥ ३० ॥

अक्राळ विक्राळ दीर्घ वदन ॥ लंब बाहो विशाळ नयन ॥ धूम्राकार जटापूर्ण ॥ आरक्तवर्ण ओष्ठ पैं ॥ ३१ ॥

स्थूलोदर गर्तेसमान ॥ उंच ग्रीवा हस्तासमान ॥ लिंग त्याचें लंबायमान ॥ सदां नग्न ब्रह्मचारी ॥ ३२ ॥

शुभ्र लव अंगावरुते ॥ तेंही लंबायमान कंटक ते ॥ ऐसें देखून तयातें ॥ विप्र दचकला मानसीं ॥ ३३ ॥

म्हणे हें विघ्न केऊतें आलें ॥ मज भोवतें उभे ठेलें ॥ स्नानालागीं आडवें ठाकलें ॥ पूर्वकर्म माझे आतां ॥ ३४ ॥

मग ह्रदयीं स्मरोन भगवान् ॥ नारसिंह मंत्र जपे ब्राह्मण ॥ तेणें भीती गेली निघोन ॥ मग बोले वचन तयासीं ॥ ३५ ॥

आधींच ब्राह्मण दैदीप्यमान ॥ वरी शुचिर्भूत संध्यास्नान ॥ त्यावरी नारसिंह जप पूर्ण ॥ जपे ब्राह्मण आदरें ॥ ३६ ॥

ऐसा विप्र अग्निवत ॥ राक्षस पाहूनि भीत ॥ म्हणे हातो न भिये किंचित ॥ मी तंव क्षुधित पातलों ॥ ३७ ॥

मग म्हणे हो द्विजवर्या ॥ साधु ह्रदय सकोमळ सदया ॥ मी तंव पापिष्ट क्रूर ह्रदया ॥ करी दया दीनबंधो ॥ ३८ ॥

नाना जीव हिंसाधारी ॥ नाना जीव वधिले अघोरी ॥ पाप भोगिलें नानापरी ॥ राक्षस देहधारी पै मी ॥ ३९ ॥

ऐकून तयाचें करुण उत्तर ॥ द्रवलें तेव्हां विप्र अंतर ॥ कोमळ ह्रदय द्विजवर ॥ नवनीता परि असे ॥ ४० ॥

जयाचे ह्रदयीं नाहीं कोमळता ॥ तो विप्रदेह नव्हे तत्वता ॥ असो द्विज राक्षस पाहतां ॥ जाला बोलता पैं त्यासी ॥ ४१ ॥

म्हणे तूं पूर्वी होतास कोण ॥ कोण्या पापास्तव हा देह जाण ॥ प्राप्त जाला तुजलागून ॥ तें करीं श्रवण सर्वही ॥ ४२ ॥

मग राक्षस म्हणे विप्रातें ॥ ऐक माझियां वृत्तांतातें ॥ मी पूर्वी वैश्य धनवंत ॥ असे विख्यात भूमंडळीं ॥ ४३ ॥

नाना वस्तूंचा रक्षक जाण ॥ क्रयविक्रय करीं पूर्ण ॥ गृहीं संपत्तीस नसे न्यून ॥ पुत्रसुना परिवार ॥ ४४ ॥

गाईम्हशी खिल्लारें अपार ॥ हस्ती वाजी शकट थोर ॥ दासदासी अपार ॥ ऐसा परिवार अपरिमित ॥ ४५ ॥

तंव एक अग्निहोत्री ब्राह्मण ॥ सहकुटुंबी सत्पात्र जाण ॥ वेदाध्यायीं असे निपुण ॥ परिपूर्ण धनेसीं ॥ ४६ ॥

तंव तो विप्र शिरोमणी ॥ चालिला महायात्रा लागुनी ॥ तयानें द्रव्य घट भरूनि ॥ ठेविला आणूनी गृहीं माझ्या ॥ ४७ ॥

सुवर्ण नाणें दहा सहस्र जाण ॥ द्रव्य घट भरिला परिपूर्ण ॥ मजपुढे ठेविला आणून ॥ गेला ब्राह्मण वाराणसी ॥ ४८ ॥

सहकुटुंबेसीं विप्र गेला ॥ तिकडेची द्वादश वर्षे त्याला ॥ यात्रा करितां दिवस गेला ॥ तों इकडे स्मरण मजला झालें ॥ ४९ ॥

काहीं कार्या निमित्य तयाचें ॥ मी द्रव्य घट खर्चिला साचें ॥ तो विप्र यात्रा करून साचें ॥ परतोनि आला माघारी ॥ ५० ॥

यात्रा करून संपूर्ण ॥ द्रव्य घट मागे मजलागुन ॥ तंव अडचणीस्तव जाण ॥ नाहीं म्हणोन बोलिलों मी ॥ ५१ ॥

तूं द्रव्य आणून ठेविलें कधी ॥ यातें साक्ष कोणती दावीं आधीं ॥ आमुचें घर घेतो हा मंदबुद्धी ॥ मिळाली मांदी जनाची ॥ ५२ ॥

वेव्हारी गेला राजद्वारीं ॥ जो तो ब्राह्मणातें धिक्कारी ॥ म्हणती हा जन्मदरिद्री ॥ द्रव्य कैचें पदरी याच्या ॥ ५३ ॥

ऐसा न्याय तेथें जाला ॥ द्रव्य घट म्यां अभिलाषिला ॥ देखत देखत ग्रासिला ॥ पातक गोळा धन लोभे ॥ ५४ ॥

मग तो विप्र तळमळत गेला ॥ तळतळोनी मज शाप दिधला ॥ म्हणे पापिष्टा चांडाळा ॥ अभिलाषिला द्रव्य घट ॥ ५५ ॥

पृथ्वी तेज वायु आकाश ॥ तुज मज साक्ष आहे चंडांश ॥ तरी शाप घेई निःशेष ॥ होई ब्रह्म राक्षस पै आतां ॥ ५६ ॥

माझें वचन असत्य होईल ॥ तरीं माझी यात्रा निर्फळ हो सकळ ॥ ऐसा बोलिला करून तळमळ ॥ विप्रें प्राण त्यागिला ॥ ५७ ॥

धनलोभें मेला द्विजवर ॥ मी राक्षस जालों साचार ॥

ऐसा माझा प्रकार ॥ जाला साचार द्विजवरा ॥ ५८ ॥

परक्याचे द्रव्य अभिलाषिलें ॥ तें आप्तवर्ग खाऊन गेलें ॥ शेवटीं मज व्यसन प्राप्त झालें ॥ भोगणें लागलें दैत्यदशे ॥ ५९ ॥

यालागीं दुसर्याचें अभिलाषितां ॥ सौख्य नाहीं तत्वतां ॥ शेवटीं भोगणें लागे अवस्था ॥ न सुटे सर्वथा निर्धारिं ॥ ६० ॥

आतां प्रार्थना ऐका ॥ परोपकार करी निका ॥ मज धाडी परलोका ॥ तारक नौका तूं होई ॥ ६१ ॥

ऐसें म्हणतां ते क्षणी ॥ द्विज बोले प्रसादवाणी ॥ म्हणे मलमास स्नानदानीं ॥ मास एक नेम केला ॥ ६२ ॥

तया मी सप्तदिनाचें ॥ उदक तूं तें अर्पितों साचें ॥ तें पुण्य प्राप्त होईल नेमाचें ॥ घडो त्याचें फळ तुजलागीं ॥ ६३ ॥

ऐसें वदोन तये वेळीं ॥ उदक भरलेंसे अंजुळीं ॥ म्हणे तुज सुफळी हो तात्काळीं ॥ होऊ उद्धार ये वेळीं ॥ ६४ ॥

वदोन घातलें उदक ॥ तंव नवल वर्तले एक ॥ विमान

आलें तात्काळीक ॥ अति लखलखीत तेजस्वी ॥ ६५ ॥

माजी बैसले विष्णुदूत पाहीं ॥ राक्षस केला दिव्यदेही ॥ तात्काळ विमानीं बैसविला तोही ॥ उद्धरोनि नेला वैकुंठा ॥ ६६ ॥

तंव तो राक्षस जाणा ॥ स्तविता जाला विप्रराणा ॥ वारंवार लागे चरणा ॥ केली उद्धरणा दयानिधे ॥ ६७ ॥

जयजयाजी विप्रमूर्ती ॥ अगाध अनुपम्य तुझी कीर्ती ॥ पुण्य वेचून मजप्रती ॥ गुरुमूर्ति उद्धरिले ॥ ६८ ॥

ऐसा स्तुति वाद करूनी ॥ तात्काळ गेला विष्णुभुवनी ॥ ऐसें मलमाहात्म कथनीं ॥ घातले श्रवणी श्रोतियांचे ॥ ६९ ॥

म्हणोन मलमहात्म अगाध थोर ॥ भावें आचरो नारीनर ॥ करा आपुल्या जन्माचा उद्धार ॥ विनवी किंकर संताचा ॥ ७० ॥

स्वस्ति श्रीमलमहात्म ग्रंथ ॥ पद्मपुराणींचे संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ विंशतितमोऽध्याय गोड हा ॥ २० ॥

ओव्याः ॥ ७० ॥ श्लोक २ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ इति विशंतितमोऽध्यायः ॥

-------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय एकविसावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ जयजयाजी सद्‍गुरु उदारा ॥ करुणार्णवा कृपासागरा ॥ तुजवीण मज आसरा ॥ नसे दुसरा कृपाळुवा ॥ १ ॥

कृपाकटाक्षे निरखावें ॥ भक्तजन प्रतिपाळावें ॥ अर्भकापरी पुरवावे ॥ लळे माझे स्वामियां ॥ २ ॥

जी जी आळ घेतसे बाळक ॥ ते ते पिता पुरवीत देख ॥ तेवीं मी रंकानुरंक ॥ घ्यावी भाक महाराजा ॥ ३ ॥

ऐका श्रोतेजन चतुर ॥ मलमहिमा परिकर ॥ जो ऐकतां भव दुस्तर ॥ निरसें साचार अनायासें ॥ ४ ॥

सायास न करितां अनायासें ॥ सांपडे निधीचा सारांश ॥ कवडी देऊनि सांपडे परिस ॥ केवीं अव्हेरावा चतुरें ॥ ५ ॥

तैसेंचि हें मलमहात्म जाण ॥ लक्ष्मी नारायण संवाद पूर्ण ॥ अगाध येथींचे पुण्याचरण ॥ करा साधन येवढें ॥ ६ ॥

श्रीरुवाच ॥ वदब्राह्मणसेवायाः फलं किं स्याद्दयानिधे ॥ तस्सेवयाकस्य पुनः संजातं सम्यगीहितं ॥ १ ॥

लक्ष्मी वदे जी कृपावंता ॥ मागें निवेदिली जे कथा ॥ ते आकर्णिली श्रवणपंथा ॥ परी संशय तत्वता निरसिजे ॥ ७ ॥

ब्राह्मणसेवा केलियाचें फळ ॥ अथवा दान केलिया पुष्कळ ॥ याचें कवण असे हो फळ ॥ करिता सफळ कवण जाले ॥ ८ ॥

हें सविस्तर निवेदावें ॥ कृपाळुत्वें परिसवावें ॥ जेवीं बाळकालागीं स्वभावें ॥ मुखीं घाली कवळातें ॥ ९ ॥

ऐकून लक्ष्मीची वाणी ॥ बोलता जाला शारंगपाणी ॥ म्हणे ऐके हो चतुर भामिनी ॥ परोपकारणीं बोल तुझे ॥ १० ॥

विष्णुरुवाच ॥ श्रुणुसुंदरी वक्ष्यामि द्विजसेवा महोदयं ॥ इतिहासं महापुण्यं दुःखदारिद्र्यनाशनं ॥ २ ॥

ऐके हो सागर तनये ॥ द्विजसेवा पुण्यमहोदये ॥ जे आचरलिया पापक्षय ॥ तात्काळ होय शुभानने ॥ ११ ॥

अस्तिदेशो विराटख्यो महाधनजनावृतः ॥
पुण्यवज्जनपुण्यात्मा पुण्यतीर्थशतावृतः ॥ ३ ॥

न दुर्भिक्षं कदाप्यस्मिन्कस्यचिद्पुण्ययोगतः ॥
राजवर्यस्य देवस्य वरदानप्रभावतः ॥ ४ ॥

विराट देशाचिये ठायीं ॥ एक आश्चर्य वर्तलें पाही ॥ तें परिसवूं सर्वही ॥ श्रवण करीं एकभावें ॥ १२ ॥

हें सकळ श्रवण केलियाचें फळ ॥ दुःख नासुनि जाय सकळ ॥ तरी देशी एक नगर विशाळ माहुरनाम तयाचे ॥ १३ ॥

तेथील जन समस्त पाही ॥ स्वधर्माचारी सर्वही ॥ धनवान पुत्र कलत्र पाहीं ॥ व्याधी नाहीं तिळभरी ॥ १४ ॥

दुःख दरिद्र रोग चिंता ॥ नसे कोठें तयासीं वार्ता ॥ रिक्त हस्ते न दवडिती अतीथा ॥ कथावार्ता घरोघरी ॥ १५ ॥

तेथील देवी परम दारुण ॥ रेणुका तीते नामाभिधान ॥ परशुराम जननीपूर्ण ॥ ख्याती जाण त्रिभुवनीं ॥ १६ ॥

ते जमदग्नीची भार्या पाहीं ॥ जगत्रयीं पूजिती सर्वही ॥ कामना पुरवितसे तेही ॥ भक्तजनाची आदरें ॥ १७ ॥

अनसूयामाजी महासती ॥ तें स्थानीं वसे पुण्यमूर्ती ॥ जियेची कीर्ती वाखाणिती ॥ पुराणें गाती अद्भुत ॥ १८ ॥

तेथें वसती ऋषी समुदावो ॥ जे पापा वेगळे महानुभावो ॥ केवळ अपरसूर्य पाहो ॥ वसती ते ठायी सकलही ॥ १९ ॥

तंव तेथील शूद्र असे एक ॥ साधु परम भावार्थी निष्कपट देख ॥ धनवान परम धार्मिक ॥ विप्रसेवनीं देख सादरु ॥ २० ॥

प्रतिदिनी विप्रसेवा करी ॥ भावार्थे तयाचे चरण चुरी ॥ पादप्रक्षाळपणातें उष्ण वारी ॥ स्वकरें आणून ठेवीत ॥ २१ ॥

स्वकरें चर्ची चंदनातें ॥ आंग मर्दितसे भावार्थे ॥

पुष्पमाळा गुंफोनि हाते ॥ सुवासयुक्त घालीतसे ॥ २२ ॥

शय्यावस्त्रे अलंकार ॥ देऊन तोषवी धरामर ॥ कोणी आलिया दारासमोर ॥ रिक्त हस्तें दवडीना ॥ २३ ॥

आवडे तया तेंची भोजन ॥ षड्रस घृतासहित अन्न ॥ इच्छित पदार्थ पुरवी आणून ॥ परी कदा उद्विग्न नोहेची ॥ २४ ॥

अतिथ आलिया द्वारीं ॥ श्वानापरी गुरगुरी ॥ भार्याही वर्ते तयाचि परी ॥ म्हणती लंडभिकारी केवढा हा ॥ २५ ॥

पाठ पुरविली मागणारी ॥ उसंत नाही क्षणभरी ॥ नित्यानित्य कोठून वारी ॥ घालावीं साचार तयातें ॥ २६ ॥

ऐसा तो नसेची शूद्र रावो ॥ धन पाळना मत याचें पाहाहो ॥ नांवासारखी करणी पाहावो ॥ नित्यानित्य आचरे ॥ २७ ॥

भार्या तयाची पतिव्रता ॥ एकोमय वर्तती उभयतां ॥ नुलंघी कधी पतिवचनार्था धर्मपंथातेही वर्ततसे ॥ २८ ॥

तेही स्वअंगें नित्यानित्य ॥ विप्र स्त्रियांची सेवा करित ॥ जे मागती प्रियवस्तू ती पुरवीत ॥ नाहीं न म्हणत कदापिही ॥ २९ ॥

ऐसीं दंपत्यें उभयतां ॥ विप्रकाजीं धन वेचितां ॥ वाचें नाणितीच सर्वथा ॥ अगर्विता दोघेही ॥ ३० ॥

सेवाकरितां दोघेंही ॥ खेद न मानितीच कांहीं ॥ उल्हासयुक्त सदांसर्वदांही ॥ गर्व नाहीं तिळभरी ॥ ३१ ॥

पदरीं असलिया धन ॥ जो अगर्वित सुखसंपन्न ॥ तो ईश्वरी अंश जाण ॥ म्हणती सज्ञान विवेकी ॥ ३२ ॥

विद्या असोन विनयता ॥ धन असूनि लीनता ॥ शक्ति असूनी गर्वरहितता ॥ तो ईश्वरी अंश जाणिजे ॥ ३३ ॥

धन किती वेंचिले धर्मकार्या ॥ हें स्मरणची नाहीं तया ॥ सदां करी शास्त्रचर्चा ॥ तो ईश्वरी अंश जाणिजे ॥ ३४ ॥

केलें सुकृत बोले वाचें ॥ भय मानिलें लोकनिंदेचें ॥ उणें बोले दुर्जनाचें ॥ तो ईश्वरी अंश जाणिजे ॥ ३५ ॥

परोपकारीं लावी वयसा ॥ धर्मकारणीं वेचितसे पैसा

॥ संसार करी वैराग्यें ऐसा ॥ तो ईश्वरी अंश जाणिजे ॥ ३६ ॥

परस्त्री देखतां अंधनयनीं ॥ परनिंदा बोलतां मुका वदनीं ॥ आत्मस्तुती ऐकतां बधीर कर्णी ॥ तो ईश्वरी अंश जाणिजे ॥ ३७ ॥

गेलियाचा नाहीं खेद ॥ प्राप्त जाहलिया नाहीं आनंद ॥ झगटें नेदीं अष्टमद ॥ तो ईश्वरी अंश जाणिजे ॥ ३८ ॥

ऐसिये चिन्हीं तो वर्तता ॥ शूद्र आणि त्याची कांता ॥ सन्मार्गे वर्तती उभयतां ॥ पुण्यवार्ता पूर्वीची ॥ ३९ ॥

तंव तेथें एक विपरीत ॥ वर्तलें श्रवण करीं यथार्थ ॥ शूद्राचे देहीं कुष्ट भरत ॥ अकस्मात दैवयोग ॥ ४० ॥

रक्त पू गळे रात्रंदिवस ॥ उदास झाले मानस ॥ म्हणे आचरतां स्वधर्मास ॥ केवी नाश शरीरीं ॥ ४१ ॥

आतां विप्रसेवा कैची मज ॥ क्षीणता प्राप्त जाली सहज ॥ जगीं जाली थोर काज ॥ कवण काज वांचलिया ॥ ४२ ॥

नेणों कवण पापाचा ठेवा ॥ आतां मरण दे गा देवा ॥

ऐसा उदास जाला जिवा ॥ परी आयुष्य ठेवा सरेना ॥ ४३ ॥

कैची सेवा तया विप्राची ॥ व्यथा अधिकाधिक त्याची ॥ तंव भार्या सगुण तयाची ॥ सत्य साची पतिव्रता ॥ ४४ ॥

एकदां प्रार्थी भ्रतारास ॥ म्हणे स्वामी व्यथा दिवसेंदिवस ॥ अधिक जाली तेणें मानस ॥ खेदरूप जाण सर्वदा ॥ ४५ ॥

तरी आतां प्राप्त झाला मलमास ॥ समग्र जाती तीर्थस्नानास ॥ तुम्हीं तों चित्तीं उदास ॥ सोडा आस प्रपंचाची ॥ ४६ ॥

धन्य तेची पतिव्रता ॥ उपदेशितसे तो भर्ता ॥ लावी मोक्षाचिया पंथा ॥ देह अवस्था जाणोनी ॥ ४७ ॥

नाहीं तरी इतर ज्या कांता ॥ रडती आपुल्या सुखस्वार्था ॥ म्हणती तुम्हीं मेलिया सर्वथा ॥ आमुची अवस्था केवी होय ॥ ४८ ॥

लेंकरेंबाळें धाकुटीं सकळ ॥ कोण करील यांचा प्रतिपाळ ॥ अहो देवा वोखटी वेळ ॥ फुटकें कपाळ आमुचें ॥ ४९ ॥

ऐसें म्हणूनी सकळ रडती ॥ परी तयाची न जाणती गति ॥ जिता द्रव्या नाश करिती ॥ मेल्या रडती सुख स्वार्थी ॥ ५० ॥

हा तो अनुभव सकळांमागे ॥ अंती एकलें जाणे लागे ॥ कोणी न येती कोणा मागें ॥ प्रचीत आंगें पाहावीं ॥ ५१ ॥

तयाचें सार्थक करितां ॥ धन नवे चित्तीं सर्वथा ॥ म्हणती हे सरलिया आतां ॥ लेकुरें केउता जगती हे ॥ ५२ ॥

जन्मवरी जें धन सांचलें ॥ ते धर्मकाजीं नाहीं लविलें ॥ शेवटीही कामा नाहीं आलें ॥ सार्थकावीण गेले प्राणी ते ॥ ५३ ॥

सार्थकावीण प्राणियासि ॥ सुटका नाहीं मृत्युपुरीसी ॥ हें न जाणून मानसीं ॥ शेवटीं कासाविसी होताती ॥ ५४ ॥

यालागीं चतुर जे ज्ञानी ॥ सार्थकाविण वय न घालावें कोणी ॥ एका चक्रपाणीवांचुनी ॥ सोडविता नसे सर्वथा ॥ ५५ ॥

म्हणाल द्रव्याविण सार्थक न घडे ॥ तरीं शरीर

झिजवावें रोकडें ॥ यासी तो नाहीं अवघड ॥ नामस्मरण घडे जिव्हेसीं ॥ ५६ ॥

नामस्मरणातें उसंत नाहीं ॥ रिकामीं बडबड सर्वांठायीं ॥ पुराणीं जातां अवसर नाहीं ॥ रिकामा ठाईं अनुसरत ॥ ५७ ॥

ऐसे जे व्यर्थ घालिती वय ॥ तयातें केउता तरुणोपाय ॥ कांहीं तरीं धरीं सोय ॥ आतां तूं या कर्माची ॥ ५८ ॥

दुर्लभ नरदेह लाधला ॥ बहुतां सुकृतें प्राप्त जाला ॥ तो कवडीचे बदला नाहीं आला ॥ घात केला आपुला आपण ॥ ५९ ॥

असो हा पाल्हाळ बहुसाळ ॥ श्रोते म्हणती उठलें कपाळ ॥ कथा टाकूनि पाल्हाळ ॥ व्यर्थ लाविला कवीनें ॥ ६० ॥

दृष्टांतीं बोलणें लागे ॥ म्हणोनि न याहो रागें ॥ कथा राहिली जी मागें ॥ परिसा आंगें सर्वही ॥ ६१ ॥

इतर स्त्रिया परियेसी ॥ ते शूद्र वनिता नव्हे तैसी ॥ उपदेशितसे भ्रतारासी ॥ जावें तीर्थासी म्हणोनी ॥ ६२॥

तयासीं मानलें उत्तर ॥ बुद्धीतव कर्मानुसार ॥ पूर्व सुकृत घडले साचार ॥ उभें ठाकलें येऊनी ॥ ६३ ॥

आजवरी विप्रसेवा केली ॥ तेची आतां कामा आली ॥ वासना तयाची फिरली ॥ वृत्ती मुरडली सुखस्वार्था ॥ ६४ ॥

यालागीं पहिलेंचि असावें दृढपण ॥ वेळेची कामा न पडे आठवण ॥ म्हणोनी नित्यानित्य मन ॥ व्हावें अनन्य भगवंतीं ॥ ६५ ॥

तंव तो शूद्र काय करिता जाला ॥ आकर्णोनि कांतेच्या बोला ॥ धनाचा संचय होता केला ॥ तो यथा भागें विभागिता जाला ॥ ६६ ॥

एक भाग कांतेंलागिं देत ॥ दो भाग स्वपुत्रातें देत ॥ एक आपणा पैं ठेवित ॥ तीर्थयात्रा निमित्य धर्मातें ॥ ६७ ॥

ऐसा सकळ धनाचा व्यय केला ॥ मग परिवारेंसीं निघतां जाला ॥ समागमें विप्रांचा मेळा ॥ सवें चालिला अपार ॥ ६८ ॥

मार्गी जातां सकळांचा ॥ सेवका हातीं समाचार त्यांचा ॥ घेतसे पदार्थांनी साचा ॥ करि स्वधनाचा व्यय पैं ॥

६९ ॥

ऐसें करितां तयातें ॥ प्राप्त जाले गौतमी तें ॥ वास्तव्य केलें तेथें ॥ मास परियंत ते ठायीं ॥ ७० ॥

तंव तो पुरुषोत्तम मास ॥ सकळ जाणूनी जन जाती स्नानास ॥ आपणही उठत बैसत जातसे ॥ सर्वांमागे स्नानासीं ॥ ७१ ॥

आधींच गौतमी पवित्रता ॥ वरी मलमास प्राप्त होतां ॥ तें पुण्य न भूतो न भविष्यता ॥ वरी प्राप्तता सत्संग ॥ ७२ ॥

एक गंगाबिंदु झगटतां शरीरीं ॥ तात्काळ होय पापाची बोहरी ॥ संत ब्राह्मण सेवा तयावरी ॥ हे तो अधिकाधिक होय पैं ॥ ७३ ॥

एतत्तालतमालसलसरलव्यालोलवल्लीलता ॥ छन्नं सूरकरप्रतापरहितं शंखेंदु कुंदोज्वलं ॥ ५ ॥

गंधर्वामर सिद्धकिन्नरवधूतुंगस्तनस्फालितं ॥ स्नानाय प्रतिवासरं भवतु मे गांगं जलं निर्मलं ॥ ६ ॥

ऐसा शूद्र स्नान करितसे ॥ वरी ब्राह्मणांचे चरणतीर्थ प्राशीतसे ॥ तेंची स्वयें शरीरा लावितसे ॥ तें तीर्थ

गंगोदकेंसी ॥ ७४ ॥

ऐसा नेम एक मासवरी पूर्ण ॥ आचरला तो शूद्र जाण ॥ तंव नवल जालें तेच क्षण ॥ मासगणना संपूर्ण होतां ॥ ७५ ॥

तयाचा कुष्ट जाऊनि पाहे ॥ शरीरीं जाला दिव्य देहे ॥ मना चोज मानिताहे ॥ म्हणे नवल काय हें जालें ॥ ७६ ॥

या व्याधीमुळे बहुत ॥ द्रव्य वेंचलें अपरिमित ॥ परी व्याधी नव्हे शांत ॥ तो स्नानेंच निःपात जाहला ॥ ७७ ॥

चमत्कार पाहोनि अद्भुत ॥ मग तेथेंच बैसला हेत ॥ मग हर्षभरित होऊन तेथे ॥ उद्यापनातें करितसे ॥ ७८ ॥

ब्राह्मण संतर्पण यथाविधीं ॥ घृतपाचित अन्नें संपादी ॥ नानास्नानदानाचा विधी ॥ विप्रा करीं अर्पितसे ॥ ७९ ॥

त्रैत्रीणिदशक ॥ अपूप करून घृतपाक ॥ ते कांस्यपात्री निक्षेपून देख ॥ वायन देत विप्रातें ॥ ८० ॥

सआज्येंसी तें तंव वाण ॥ वरी शक्तिनुसार घालुनि सुवर्ण ॥ दक्षिणेसहित देतसे दान ॥ भावें जनार्दन स्मरोनी ॥ ८१ ॥

ऐसें उद्यापन करूनिया ॥ उल्हासेसी राहिला त्याच ठायां ॥ नित्य स्मरोनि केशवराया ॥ स्नान सारी गंगोदकीं ॥ ८२ ॥

समूळ पाप लेश झडला ॥ आणि कुष्टही समूळ गेला ॥ तंव तो समीप काळ पातला ॥ विप्र देखतां तयातें ॥ ८३ ॥

ते विष्णुदूत येऊनि ॥ तात्काळ वाहिला विमानीं ॥ ऐसी स्नानाची अगाध करणी ॥ पावला निर्वाणीं मोक्षातें ॥ ८४ ॥

कोटि पापाचा क्षय करूनीं ॥ काया कष्टविली तीर्थसेवनीं ॥ ऐसें पुण्य आचरोनी ॥ पावला निर्वाणीं मोक्षातें ॥ ८५ ॥

आधीं अर्पावें मग पावावें ॥ जैसें द्यावें तैसें घ्यावें ॥ शरीरीं कष्ट भोगावे ॥ मग पावावें सुखातें ॥ ८६ ॥

जैसें वेव्हारी देता धन ॥ अथवा सवाईसी धान्य ॥ तें व्याजासहित येत परतून ॥ तेवी जाण हे गोष्टी ॥ ८७

॥

भक्तिभावें अर्पितां आडका ॥ मी कदां न घेई फुका ॥ वश्य जालो भावा एका ॥ स्वपदीं निका नेईं तयातें ॥ ८८ ॥

ऐसें पुरुषोत्तम बोलिला ॥ तो लक्ष्मीनें आकर्णिला ॥ तोचि तुम्हां श्रोतियांतें कथिला ॥ प्राकृत भाषेकरूनी ॥ ८९ ॥

आतां पुढें लक्ष्मी करील प्रश्न ॥ त्याचें उत्तर देईल जनार्दन ॥ तें परिसा श्रोतेजन ॥ अति आदरें करूनिया ॥ ९० ॥

श्रोता असलिया सादर ॥ तरी वक्तृत्वा हर्षनिर्भर ॥ म्हणोनि जोडूनियां कर ॥ वारंवार प्रार्थितो ॥ ९१ ॥

जैसे वृक्षमुळी घालितां उदक ॥ मग तो फोफावे अधिकाधिक ॥ तैसा श्रोतियां असलिया नेटक ॥ फोंफावें देखवाग्वल्ली ॥ ९२ ॥

इति स्वस्ति श्रीमलमहात्म ग्रंथ ॥ पद्मपुराणींचें संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ एकविंशतितमोऽध्याय गोड हा ॥ २१ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ओव्याः ९२ ॥ श्लोकः ६ ॥

॥ इति एकविंशतितमोऽध्यायः ॥

----------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय बाविसावा

श्रीगणेशाय नमः ॥ जय त्रिभुवनसुंदरी आदिमाये ॥ वाग्देविके कविमांदुसरत्नहृदये ॥ तुजविण रिता ठाव पाहे ॥ नसे माये सर्वथा ॥ १ ॥

तरी बैसून माझीये जिव्हाग्रीं ॥ ग्रंथ पाववा शेवटावरी तरीच धन्य संसारीं ॥ नाहीं तरी वृथा वैखरीं माझी हे ॥ २ ॥

ऐका श्रोते भाविकजन ॥ येथींचे ग्राहीक कोण कोण ॥ तयानें लाधलें कोण ॥ इतरां लाजिरवणें अभागिया ॥ ३ ॥

मलमास अति पावन ॥ लक्ष्मी-नारायण संवाद पूर्ण ॥ भावें ऐकतांच श्रवण ॥ तो पावे सदन मोक्षाचें ॥ ४ ॥

श्रीरुवाच ॥ दामोदर दयासिंधो वद दानफलाफलं ॥ मलिम्लुचे विशेषेण कैः कैः कि किं फलं व्रतं ॥ १ ॥

लक्ष्मी वदे हो दामोदरा ॥ दयासिंधो परम उदारा ॥

दान महत्माचिया प्रकारा ॥ वदा साचार स्वामियां ॥ ५ ॥

कवण दाने कवण पुण्य जोडे ॥ सार्थकता कैसेनि घडे ॥ हें वेगळालें फळ निवाडें॥ सांगावें रोकडें स्वामियां ॥ ६ ॥

श्रीविष्णुरुवाच व श्रुणु सुंदरि वक्ष्यामि लोकानुग्रहहेतवे ॥ प्रविधानंतु दानानां फलानि मलमासकं ॥ २ ॥

ऐक भामिनी चतुर देख ॥ तुझे बोल तंव परोपकारक ॥ तरीं दान फळ वेगळालें ऐक ॥ या मलमासा निके अवधारीं ॥ ७ ॥

सुवर्णदान शक्तिनुसार ॥ द्विजाते देती जे देणार ॥ तयावरीं तुष्टें मी सर्वेश्वर ॥ करीं परिहार दरिद्राचा ॥ ८ ॥

तयातें दरिद्राची व्यथा ॥ होऊं नेदीं मी सर्वथा ॥ अंतीं पाववीं मोक्षपंथा ॥ नव्हे अन्यथा हे वाणी ॥ ९ ॥

आतां रौप्यदानाचें फळ ॥ तेंही ऐकहो सकळ ॥ तेणें तुष्टे जाश्वनीळ ॥ आणि सकळ पितृव्याजें ॥ १० ॥

रजतं श्रद्धयोपेतो द्विजेभ्यो वितरत्यणु ॥ पितरस्तस्य

संतुष्टा भवंति निखिलेष्टदाः ॥ ३ ॥

आतां मुक्ताफळें आणि पोंवळीं ॥ तेंही ऐक सांगतों बाळी ॥ तयाचीं फळें वेगळालीं ॥ परिसऊं तूंतें जाण पां ॥ ११ ॥

पोंवळीं अर्पितां पावे भुक्ति ॥ मुक्ताफळें लाभें मुक्ती ॥ एवं भुक्ति आणि सुक्ती ॥ लाभरीती जाण पां ॥ १२ ॥

कांस्यपात्र अथवा ताम्रपात्र ॥ विप्रातें अर्चितां विचित्र ॥ तरी भवानीसहित पंचवक्त्र ॥ कृपा करी तयावरी ॥ १३ ॥

वस्त्रदानें संतुष्टे चंद्र ॥ अपूपदानें पाप संहार ॥ अन्नदानें सर्वेश्वर ॥ तुष्टमान सर्वदां ॥ १४ ॥

उदकदान करितां जाण ॥ संतुष्टमान तया वरुण ॥ तयानें प्राप्त करी जीवन ॥ होय अन्नवृद्धीतें ॥ १५ ॥

अन्नदान सर्वात सार ॥ चाले सकळ व्यापार ॥ क्षणभरी अन्न नसलें जर ॥ केवीं व्यापार चालूं शके ॥ १६ ॥

आतां उपानह दान देतां ॥ यम तुष्टमान तयावरुता ॥ पदर्थी भगवंत वचनार्था ॥ आणा सर्वदां मानसीं ॥ १७

॥

उपानह दान देतां ब्राह्मणातें ॥ मार्गी यम दे सुख तयातें ॥ अश्व दिधलिया दानातें ॥ अश्वरूढ स्वर्गी जाय ॥ १८ ॥

भुकेलियां अन्नदान ॥ तृषार्थि उदकपान ॥ देतां स्वर्गी सुखसंपन्न ॥ यमरावो नेतसे तयातें ॥ १९ ॥

मार्गी जातां ठायीं ॥ अन्न उदक पुरवी सर्वही ॥ यमलोकीं तयाते पाहीं ॥ पुरवी सर्वही अन्नोदक ॥ २० ॥

प्राणी निवर्तलियावरी ॥ द्वादशदिन लागती मार्गावरी ॥ चालतां तेथें यातना भारी ॥ ते गरुडपुराणीं वर्णिलीसे ॥ २१ ॥

म्हणोन येथें जें अर्पावें ॥ तेंची तेथें लागे पावावें ॥ दिधल्याविण तो न पावे ॥ हा निर्धार जाणिजे ॥ २२ ॥

नादत्तमुपतिष्ठतु ॥ ऐसा तो वेद बोलतु ॥ दिधल्याविण नव्हे प्राप्तु ॥ स्वयें बोलतु जनार्दन ॥ २३ ॥

घृताचें दान विप्रालागीं देतां ॥ सूर्य संतुष्टमान तयावरुता ॥ नसे ताप ज्वराची वार्ता ॥ अन्न शांतता

तो करी ॥ २४ ॥

तिलपात्राप्रदानेन रुद्रलोके महीयते ॥ ताम्रं वा ताम्रपात्रं वा यो ददाति मलिम्लुचे ॥ ४ ॥

तिळपात्र दान करी जो नर ॥ स्वर्गी सुखावती पितर ॥ न बाधी तया शनैश्चर ॥ पावे सत्वर रुद्र कैलासा ॥ २५ ॥

कमंडलु तोय ताम्रपात्रीं ॥ देतां भावार्थे विप्राप्रती ॥ तेणें तुष्टमान वरुण भूपति ॥ नेत तयाप्रती वरुणलोका ॥ २६ ॥

तेथें बहुत सौख्य तया जना ॥ कांहीं एक नसे यातना ॥ दंपत्यातें करितां वस्त्रदाना ॥ कैलासभुवना तो पावे ॥ २७ ॥

घृतदानात्परंदानं पृथिव्यां नैव विद्यते ॥ सप्त धान्यं द्विजे देयं सह दक्षिणया शुभे ॥ ५ ॥

सप्त धान्य अर्पितां द्विजातें ॥ तेणें पूजिलें सप्तऋषीतें ॥ अरुंधतीसहितयातें ॥ दंपत्य पूजा घडली पैं ॥ २८ ॥

ऐसे नाना दानाचे प्रकार ॥ सांगतां वाढो पाहे विस्तार

॥ परी किंचित गोदानातें तत्पर ॥ होऊन कथा विस्तारिजे ॥ २९ ॥

आणीक आठवलें मजलागोनी ॥ सच्छीद्र अनरसे दानीं ॥ त्रितीनदशक विप्रालागोनी ॥ प्रतिदिनीं अर्पावे ॥ ३० ॥

संपूर्ण जया न घडे एकमास ॥ तरी सायासें अर्पी पांचपर्वास ॥ द्वादशी पौर्णिमा अमावास्येस ॥ व्यतीपात आणि वैधृती ॥ ३१ ॥

हीं मुख्य पर्वें बोलिजे ॥ मागें तूं तें निवेदिलें कमळजे ॥ हे मुख्य आवडीचें खाद्य माझें ॥ तेणें संतुष्टें मी तयावरी ॥ ३२ ॥

आतां गोदान केलियाचा प्रकार ॥ सांगतों ऐका सविस्तर ॥ पूर्वी दक्षिणेस महीस्मृती नगर ॥ असो थोर प्रसिद्ध पैं ॥ ३३ ॥

चारी वर्ण सभोग साधन ॥ शास्त्राधारीं वर्णती जन ॥ नित्य आचरती दानपुण्य ॥ वेदाध्ययन विप्र करिती ॥ ३४ ॥

आधीव्याधी दरिद्र पाहीं ॥ नगरीं धुंडितां न दिसे कांहीं ॥ अपमृत्युची वार्ता नाहीं ॥ जन सर्वही आनंदमय ॥

३५ ॥

प्रभु तेथीचा धार्मिकरत ॥ पुत्र ऐसी प्रजा पाळीत ॥ लांच न घे न्याय करीत ॥ तोची धन्य भूपती ॥ ३६ ॥

असो ऐसा त्या नगरीचा महिमा ॥ तेथील विप्र एक द्विजशर्मा ॥ वेगळा जो कर्म अकर्मा ॥ चालवी नेम शास्त्राधारें ॥ ३७ ॥

घरीं सदां अग्निहोत्र ॥ कांता भामिनी सुपात्र ॥ पोटीं नाहीं पुत्रकलव ॥ भिक्षान्नें गात्र संरक्षितसे ॥ ३८ ॥

ऐसा तो सत्पात्र विप्रराणा ॥ प्रसंगीं अतीत आलिया जाणा ॥ गृहीं निपजेल जें अन्न ॥ तया लागून अर्पितसे ॥ ३९ ॥

ऐसें करितां बहुत काळवरी ॥ तों कोणी एक ब्राह्मण पुत्र करी ॥ फिरत फिरत तया नगरीं ॥ येऊनियां राहिला ॥ ४० ॥

परी माध्याह्न काळींची वेळा ॥ पोटा पाहिजे अन्नाचा गोळा ॥ म्हणोनिया शोधित चालिला ॥ ग्रामामाजी ते समयीं ॥ ४१ ॥

तंव पुसतसे ग्रामस्थासीं ॥ कोण अन्न अर्पी पांथस्थासी

॥ तयानें गृह दाखवितां त्यासी ॥ द्विजशर्म्यासी भेटला ॥ ४२ ॥

म्हणे माध्यान्ह समयीं क्षुधित ॥ समयीं पातलों मी अतीत ॥ ऐसी ऐकतांची विप्र मात ॥ आला धावत द्विजशर्मा ॥ ४३ ॥

बद्धहस्तें नमिला ब्राह्मण ॥ येरू काय बोले वचन ॥ तोची श्लोक अवधारा पूर्ण ॥ काय वचन बोलिला ॥ ४४ ॥

विप्र उवाच ॥ क्षुधानलेन तप्तानां विषवत्स कलार्चनं ॥ अन्नाद्यौषधमात्राणां दातावश्यं भवेधुना ॥ ६ ॥

म्हणे क्षुधानळें तप्तदेहीं ॥ विषवत् वाटे उपचार सर्वही ॥ तरी अन्न औषधातें दाता होई ॥ आहे किंवा नाहीं दाता तया वदें ॥ ४५ ॥

तथास्तु म्हणोनि आसनीं बैसविला ॥ भोजन देऊनी तृप्त केला ॥ मग स्वागत पुसता झाला ॥ कोठूनि आला परिवार केउता ॥ ४६ ॥

येरू म्हणे तीर्थ भ्रमण करित स्वयें मी एकला फिरत ॥ मातापिता बंधु दुहिता आप्त ॥ पुत्र ना कांतामज लागीं ॥ ४७ ॥

जरी मातें अपंगाल गृहीं ॥ तरीं सेवा करून मी राहीं ॥ कदां वंचनार्थ करून देही ॥ अंतर नेदीं विप्रराया ॥ ४८ ॥

जाणूनि निर्मळ अंतरीं ॥ म्हणे स्वस्थ राहें माझे घरीं ॥ कांहीं न सांगें चाकरी ॥ पुत्रापरी वर्तावे ॥ ४९ ॥

ठेऊन घेतला तयालागून ॥ नाम तयाचें नारायण ॥ सेवा करी न कंटाळे मन ॥ पडिलें कार्य संपादी ॥ ५० ॥

आधीच तीर्थवासी पवित्र ॥ वरी ब्राह्मण तो अग्निहोत्र ॥ निःकपटे सेवा चित्रविचित्र ॥ सेवी गात्र तयाचें ॥ ५१ ॥

ऐसे वर्ततां बहुकाळावरीं ॥ तंव नवल वर्तले परी ॥ विप्रस्त्री होती म्हातारी ॥ जाली गरोदरीं त्यापुण्यें ॥ ५२ ॥

तंव विप्र मनीं बहुत हर्षला ॥ म्हणें संतान न होतें मजला ॥ याचा पायगुण मज लाभला ॥ गर्भ राहिला साठवर्षी ॥ ५३ ॥

ऐसे मानुनियां हर्षास ॥ तंव गर्भा आले पूर्णदिवस ॥ प्रसूत होता विप्रस्त्रियेस ॥ पुत्र तियेस पै जाला ॥ ५४

॥

मग तो विप्र आनंदें नाचें उडे ॥ म्हणे पाहा आश्चर्य केवढे ॥ आजवरी न पाहिले निवाडें ॥ पुत्रमुख जन्मवरी ॥ ५५ ॥

म्हणोन बहुत सोहळाकरी ॥ साहित्य मेळवाया परोपरी ॥ परंतु दुसरें कोणी नाहीं घरी ॥ रक्षण द्वारीं बैसावया ॥ ५६ ॥

मग नारायणातें म्हणें तेव्हा ॥ द्वारीं रक्षण बैसें सदैवा ॥ मी जातों पारखे गावां ॥ साहित्यालागुनी पैं आतां ॥ ५७ ॥

तरीं उदयीक पांचवा दिन ॥ सटवी पूजा लागे करणें ॥ यालागीं बैसे सावधान ॥ द्वारीं रक्षण विप्रराया ॥ ५८ ॥

ऐसें निवेदुनी तयासी ॥ आपण जाय पारखे ग्रामासीं ॥ मागें द्वारा समीप देशी ॥ बैसे रक्षणासी नारायण ॥ ५९ ॥

रात्र झाली यामिनी दोन ॥ तंव तो पंचमीचा दिवस लक्षून ॥ देवी येती झाली चालून ॥ पुत्राक्षरालागी पाहावया ॥ ६० ॥

सुंदर देदीप्यमान केवळ ॥ परीधान वस्त्र केलें सकळ ॥ त्वरित निरखुनियां बाळ ॥ माघारें तात्काळ परतली ॥ ६१ ॥

इतकें कृत्य तये क्षणीं ॥ नारायण देखून नयनीं ॥ हा तंव पुण्यवंत प्राणी ॥ जाहलें म्हणोन दर्शन ॥ ६२ ॥

मग तियेतें पदरी धरिलें ॥ म्हणे तूं कवण पातलीस ये वेळे ॥ यक्षिणी कीं पिशाच्च बाळें ॥ सांग वहिले मजलागीं ॥ ६३ ॥

येरी झिडकावी तयातें ॥ दूर होई म्हणें ब्राह्मणातें ॥ काय कारण तुज पुसावयातें ॥ सर परता माघारा ॥ ६४ ॥

येरू म्हणे तूं ते सर्वथा ॥ जाऊं नेदी मी तत्वता ॥ तू कवण हे सांग वार्ता ॥ मग आलिया पंथा जाईजे ॥ ६५ ॥

ऐसा दुराग्रह पाहोनी ॥ बोलती जालीते भामिनी ॥ म्हणे तूं पुण्यवान म्हणोनी ॥ दर्शन तुज लागुनी दिधलें ॥ ६६ ॥

मी तंव यक्षिणी देवी ॥ मातें म्हणताती सटवी ॥ पुत्राक्षरें आम्हीं निरखावी ॥ ब्रह्मवरदें करूनियां ॥ ६७

॥

आतां सोडीं जाऊंदे मातें ॥ येरू म्हणे न घडे निरुतें ॥ काय अक्षर याचिया बाळातें ॥ तें मातें निवेदून सुखीं होई ॥ ६८ ॥

ऐकून तयाचें वचन ॥ देवी वदे तूं ते काय प्रयोजन ॥ जें होणार तें सुखें होतसे जाण ॥ ब्रह्माक्षर कोण टाळूं शके ॥ ६९ ॥

तंव विप्र लागतसे चरणीं ॥ सांग इतुके कृपेंकरूनी ॥ मग आणीक पुसें काहाणी ॥ तंव ते यक्षिणी बोलत ॥ ७० ॥

म्हणे हा विप्रकुमार पाहीं ॥ धनधान्य नसे याचे दैवी ॥ कांता पुत्र तेही नाहीं ॥ उदर निर्वाह केउता ॥ ७१ ॥

तरी तक्रविक्रय करून ॥ चालेल याचें उदरपोषण ॥ शतायुषी असे हा पूर्ण ॥ मरण अकाळी ॥ ७२ ॥

ऐसे वचन ऐकतां ते वेळीं ॥ येरे नमस्कारूनि बोळविली ॥ मनीं म्हणे हे नाथ चंद्रमौळी ॥ केवी कुळीं पुत्र ऐसा ॥ ७३ ॥

केवढा पवित्र विप्रराणा ॥ ऐसा पुत्र तया लागून ॥

काय ऐसें संतान होऊन ॥ निसंतान परी भलें ॥ ७४ ॥

केवढा हर्ष विप्राचे मनीं ॥ जन्मदारभ्य सोहळा देखुनी ॥ प्राण देईल हा ऐकतां क्षणीं ॥ म्हणोन मौनीं न बोलावें ॥ ७५ ॥

गोष्ट ठेविली जीवींचे जीवीं ॥ कोणातें न वदे काळत्रयीं ॥ असो विप्र येऊन स्वगृहीं ॥ सोहळा संपादिला आनंदें ॥ ७६ ॥

द्वादश दिनीं जातकर्म ॥ करिता झाला विप्रोतम ॥ संभ्रमें ठेविलें नाम ॥ बहुत लळा पुत्रावरी ॥ ७७ ॥

ऐसे लोटले बहुत दिन ॥ तों पंचम वर्षी पुत्रनिधान ॥ वाढता झाला तो मागुतेन ॥ कांता जाली प्रसूती ॥ ७८ ॥

ते समयीं कन्ये तें प्रसवली ॥ देखून विप्र आनंदमेळी ॥ म्हणे कृतकृत्य जालों येकाळीं ॥ जालें कुळीं कन्यापुत्र ॥ ७९ ॥

नारायण हा भाग्यें आगळा ॥ याचा पायगुण लाभला भला ॥ ऐसें सौख्य मानिता जाला ॥ परी चिंता नारायणा मानसीं ॥ ८० ॥

म्हणे आतां ही रक्षण पुढती ॥ मी बैसेन द्वार दिशेप्रती ॥ मागुती येतां यक्षिणी सती ॥ पुसेन तिजप्रती वृत्तांतु ॥ ८१ ॥

ऐसा निश्चय निजमनीं केला ॥ मागुती गुरू आज्ञेनें रक्षण बैसला ॥ तों पांचवे दिनीं यक्षिणी तेच वेळा ॥ लक्षून तात्काळ प्रगटली ॥ ८२ ॥

अक्षरें निरखून कन्येचे भाळीं ॥ निघती जाली ते क्षणीं बाळी ॥ तंव येरें पदरीं दृढ धरिली ॥ नमस्कारी भावार्थे ॥ ८३ ॥

म्हणे माते कृपाकरून मजसीं ॥ सांग कन्याक्षरें ती कैसीं ॥ येरी म्हणे वारंवार कां पुससी ॥ मूर्ख होसीरें ब्राह्मणा ॥ ८४ ॥

येरू मागुता चरणीं लागे ॥ कृपा करूनि मजला सांगें ॥ आणीक न मागें कांहीं आंगें ॥ जाण शुभांगें यक्षिणी ॥ ८५ ॥

मग भिडेस्तव यक्षिणी पाहीं ॥ बोलती झाली ते समयीं ॥ म्हणे विवाह तंव दैवीं नाहीं ॥ इचिया विप्रवर्या जाणपा ॥ ८६ ॥

मातापिता आप्तवर्ग ॥ न करिता इचा संसर्ग ॥ ही

जारकर्मी विचरोन मार्ग ॥ उदर निर्वाहाते करील ॥ ८७ ॥

त्याहीवरी पूर्ण आयुषी ॥ रोगव्याधी नाहीं शरीरासी ॥ शतवर्षे इचिया कर्मासीं ॥ प्रवर्तती निश्चयेसी जाणपां ॥ ८८ ॥

ऐसे वदोन ते वेळीं ॥ यक्षिणी देवी गुप्त झाली ॥ ऐकोन जीवीं तळमळी ॥ नारायण विप्र ते वेळां ॥ ८९ ॥

म्हणे आहा देवा हें काय ॥ दैवापुढे नाहीं उपाय ॥ केवढा पवित्र विप्रराय ॥ संतान लाहे केवि ऐसे ॥ ९० ॥

असो होणार ते होऊन जात ॥ परी कोणाते न वदेची मात ॥ मनींच ठेविलीसे गुप्त ॥ साधी कार्यार्थ वरीवरी ॥ ९१ ॥

ऐसे कांहीं दिवस क्रमिले ॥ सातवर्षी उपनयन केले ॥ पंच वर्षी कन्यारत्न जालें ॥ ऐसें उभयतांतें ॥ ९२ ॥

तंव द्विज शर्मा पावला निधन ॥ कांता करी सहगमन ॥ धन्य ते पतिव्रता सतीरत्न ॥ टाकून लहान मुलें दोनीं ॥ ९३ ॥

असो ऐसें वर्तमान जालें ॥ नारायणें उत्तर कार्य सांग केलें ॥ म्हणे आतां येथें राहतां नव्हे भलें ॥ आचरती बाळें ती न देखें मी ॥ ९४ ॥

ऐसा निश्चयी मानसीं केला ॥ उपरी मास चार क्रमिता झाल ॥ मग ग्रामवासी जना सकळा ॥ निरविता जाला कन्यापुत्र ॥ ९५ ॥

आपण प्रयाण आरंभिलें ॥ तंव ती कन्या पुत्र कोल्हाळें ॥ आरडून गळां पडूं लागलें ॥ देखते जाले आबाल वृद्ध ॥ ९६ ॥

देखून तयांची करुणा ॥ अश्रू आले जनाचिया नयना ॥ म्हणती हे भगवान् जनार्दना ॥ ही बाळके केवी जगतील ॥ ९७ ॥

नाहीं तयातें पाळिता पोसिता ॥ नाहीं माता आणि पिता ॥ नाहीं द्रव्याची वार्ता ॥ केवी भगवंता हे केलें ॥ ९८ ॥

ऐसा जनाचा कोल्हाळ ॥ टपटपां अश्रू गाळिती सकळ ॥ नारायण ह्रदयींचा कोमळ ॥ परी फुटके कपाळ पैं यांचें ॥ ९९ ॥

बाळपणीं मेली मातापिता ॥ तारुण्यपणीं दरिद्र

अवस्था ॥ त्याहीवरी जारकर्म तत्वतां ॥ जाणून निघता तो जाला ॥ १०० ॥

नारायण गेला निघोनीं ॥ तळमळों लागलीं बाळें दोन्ही ॥ मग जन समुदाय आश्वासुनी ॥ मुनी ॥ प्रतिपाळ दिनरजनी करिताती ॥ १०१ ॥

परी होणार तें न टळेची निश्चित ॥ कोण टाळूं शके ब्रह्मालिखित ॥ तें अनायासें होत जात ॥ न चाले तेथें उपाय ॥ २ ॥

नारायण निघोन गेल्यावरी ॥ एक धेनु असे त्याचें घरीं ॥ तिची सेवा निरंतरीं ॥ विप्रकुमर करीतसे ॥ ३ ॥

जाऊन रानांत पाहीं ॥ तृण आणीतसे लवलाहीं ॥ निजकरें तिचा पैसा सांचवी ॥ क्रय विक्रय लावी तक्रातें ॥ ४ ॥

भगिनीते वय पंच वर्षी ॥ आपण स्वयें दशवर्षा ॥ परी उदर निर्वाह परियेसी ॥ उभयतां सरसी लोटीत ॥ ५ ॥

कन्या मृत्तिका पात्र घेऊनी ॥ उदक आणीतसे प्रतिदिनीं ॥ येरु स्वकरें दह्याची कथली घेऊनी ॥ दधी मथुन करी तक्र ॥ ६ ॥

तयाचा विक्रय करून ॥ लागेल तें आणुनी धान्य ॥ तें उभयतां पचवून ॥ उदर पोषण करिताती ॥ ७ ॥

ऐशी लोटली वर्षे दोन ॥ तो पुढें प्राप्त झालें व्यसन ॥ कोणी एक सभाग्य वेश्या जाण ॥ उतरली येऊन नदीतीरीं ॥ ८ ॥

समागमें गज अश्वरथ ॥ दास दासीही ते बहुत ॥ स्वयें हेही स्वरूपवंत ॥ अप्सरा भासत इंद्राची ॥ ९ ॥

ऐसी ते येतां नदीतीरीं ॥ विप्रकन्या देखिली नेत्रीं ॥ मृन्मयपात्र घेऊन शिरीं ॥ तेही घाबरी पाहातसे ॥ १० ॥

कधींच पाहिला नाहीं समुदाय ॥ म्हणोन तेथें उभी राहे ॥ तंव वेश्येनें लवलाहें ॥ पाचारिलें आपणा पैं ॥ ११ ॥

मग पुसती झाली वर्तमान ॥ म्हणें तूं कवणाची कोण ॥ स्वरूपें दिससी सुंदर पूर्ण ॥ वस्त्र मळीण फाटके ॥ १२ ॥

तूं तें ऐशी दशा प्राप्त जाली ॥ कवणें दुर्जनें तूं तें गांजिली ॥ वर्तमान सांग मजजवळी ॥ मग तें विप्रबाळी बोलत ॥ १३ ॥

मायबापें गेलीं मरून ॥ एक बंधु तोही लहान ॥ मी ब्रह्मकुमारी पतिहीन ॥ दरिद्रें पूर्ण पीडिलेंसे ॥ १४ ॥

ऐसें वर्तमान ऐकूनी ॥ वैश्या द्रवली अंतःकरणीं ॥ मग काहीं एक पदार्थ तिजलागूनी ॥ दिधले काढूनि भक्षावया ॥ १५ ॥

पदार्थी भुलली विप्रकुमारी ॥ मग तैसीच बसली रथावरी ॥ वेश्या निघोन गेली सत्वरी ॥ हें जगनेत्रीं पाहाताती ॥ १६ ॥

परी कोणी न बोलती बोला ॥ म्हणती कन्येचा पांग फिटला ॥ न्यूनता नाहीं अन्नवस्त्राला ॥ पुढें होणाराला कोण पाहे ॥ १७ ॥

तों येरीकडे विप्रकुमारगृहीं ॥ तृण घेऊनि आला लवलाहीं ॥ तों भगिनी न देखे गृहाच्या ठायीं ॥ म्हणोन पाही चहूंकडे ॥ १८ ॥

भगिनीचा वृत्तांत ऐसा झाला ॥ हें ठाऊकें नसेची तयाला ॥ मग ग्रामवासियें पाहिला ॥ तयांनीं कथिला समाचार ॥ १९ ॥

मग अतिक्षीण अंतरीं ॥ होऊन आठवी श्रीहरी ॥ म्हणे माझी पूर्वदशा खरी ॥ फळा आली ये काळीं ॥ २० ॥

मातापितयांचें निधान ॥ पदरीं नाहीं कांहीधन ॥ आम्हीं उभयतां बाळें दीन ॥ अनाथ होऊन पडलों असो ॥ २१ ॥

त्यामाजी हा विघड पडिला ॥ आतां कोणी नसेकीं मजला ॥ ऐसा विलाप करिता जाला ॥ रडों लागला अटाहास्यें ॥ २२ ॥

ऐसें कर्म तया घडोनी आलें ॥ पुढे काय असे वर्तले ॥ तें पाहिजे श्रवण केले ॥ म्हणे पुढली प्रसंगीं ॥ २३ ॥

आतां धेनुसेवा फळली कैसी ॥ तेही श्रवण करा सावकाशी ॥ मुक्ती जाली त्या उभयतांसी ॥ ते सावकाश परिसीजे ॥ २४ ॥

इति श्रीमलमाहात्म ग्रंथ ॥ पद्मपुराणींचे संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ द्वाविंशतितमोध्याय गोड हा ॥ २२ ॥ ओव्या १२४ ॥ श्लोक ६ ॥

॥ इति द्वाविंशतितमोऽध्यायः ॥

-------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय तेविसावा

श्रीगणेशाय नमः ॥ ऐका श्रोते संतसज्जन मलमहात्म पुण्याख्यान ॥ मागिले प्रसंगीचे निरूपण ॥ धरा आठवण मानसीं ॥ १ ॥

विप्रनंदाची भगिनी ॥ वेश्या गेलीसे घेऊनी ॥ ते वार्ता ऐकूनि कानीं ॥ बंधु शोकसदनीं पडियेला ॥ २ ॥

इतुका वृत्तांत मागें कथिला ॥ याउपरी पाहिजे ऐकिला ॥ अवधान दीजे श्रवणाला ॥ काय करिता जाला विप्रकुमर ॥ ३ ॥

शोक करितां तयातें ॥ नगरवासी सभोंवते ॥ समजावुनि तयातें ॥ गृह गेले आपुलिया ॥ ४ ॥

याउपरी तो विप्रकुमर ॥ नित्य सारीतसे गृहाचार ॥ तक्र विक्रय करून उदर ॥ निज हातें संपादितसे ॥ ५ ॥

तो येरीकडे नारायण ॥ यात्रा क्रमी वर्षे तीन ॥ म्हणे जावें माघारें परतोन ॥ लेंकुरें अज्ञान श्रीगुरूचीं ॥ ६ ॥

गुरुकन्या वेश्येने नेली जाणा ॥ हे वार्ता विदित नाहीं नारायणा ॥ परी अंतरसाक्ष जनार्दना ॥ फिरलें मन नारायणाचें ॥ ७ ॥

म्हणे गुरुगृहीं जावें आतां ॥ कवण तेथें सुखाची वार्ता ॥ हे तो सांगोन गेली देवता ॥ यक्षिणीदेवी पूर्वीच ॥ ८ ॥

एके तक्र विक्रय करावा ॥ एका जारत्वें निर्वाह व्हावा ॥ हा सौख्याचा तेथील ठेवा ॥ न देखवे देवा माझेनी ॥ ९ ॥

म्हणोन येत येत परतला ॥ पुनः मागुता तीर्था गेला ॥ वर्षे द्वादश क्रमिता झाला ॥ परी नाहीं मनाला स्थिरता ॥ १० ॥

कोमळ ह्रदय ब्राह्मणाचें ॥ वरी पुण्यवान शरीर त्याचें ॥ विशेष पुण्य गुरुसेवेचें ॥ म्हणोन नवनीताचें ह्रदय पैं ॥ ११ ॥

असो द्वादशवर्षा परतोनी ॥ नारायण पातला गुरुआश्रमस्थानीं ॥ येतां देखिला गुरुसुतें नयनीं ॥ परी त्याची वोळखी मनीं न पुरें ॥ १२ ॥

मग नारायणें हास्य केलें ॥ म्हणे आम्ही तुवा वोळखिलें ॥ ऐसें वदतां तेचि वेळे ॥ पायीं ठेविलें मस्तक ॥ १३ ॥

आरडोनी पडिलासे गळा ॥ रडों लागला खळखळां ॥

म्हणे वनीं टाकुनी वत्सला ॥ आपण गेला यात्रेतें ॥ १४ ॥

म्हणे मज नाहीं माता पिता ॥ नाही बंधुभगिनी चुलता ॥ नाहीं कोणी पाळिता पोशिता ॥ अहा अनंता हें काय केलें ॥ १५ ॥

एक होती भगिनी मजलागुनी ॥ तेही वेश्येनें नेली चाळवूनी ॥ नेणों असे कवणे स्थानीं ॥ ते मजलागुनी ॥ विदित नसे ॥ १६ ॥

ऐसा साकल्य समाचार ऐकिला ॥ नारायण ह्रदयीं थकित झाला ॥ मग तयातें आश्वासिता झाला ॥ मधुरवचनें करूनीं ॥ १७ ॥

म्हणे बापा ऐक आतां ॥ होणार तें न चुके तत्वतां ॥ कोण टाळूं शके ब्रह्मलिखिता ॥ तयाची वार्ता अनुपम्य ॥ १८ ॥

ऐसें तयातें अश्वासुनी ॥ बैसता जाला निजआसनीं ॥ येरें मांडिलीसे साजणीं ॥ परवडी तया भोजनाची ॥ १९ ॥

गृहीं तो पदार्थ अनकूळ नाहीं ॥ म्हणोन कुसुमुसी ठायींचे ठायीं ॥ आहा देवा माझे दैवीं नाहीं ॥ आलिया

समयीं अतिता ॥ २० ॥

हे नारायणें जाणितलें ॥ म्हणे बापा तुवां काय आरंभिलें ॥ माझे भोजन तंव असे जालें ॥ नाहीं उरली अपेक्षा कांहीं ॥ २१ ॥

मनीं विचारी नारायण ॥ रसविक्रयाचें न स्वीकारावें अन्न ॥ म्हणोनि मांडिलें निर्वाण ॥ वारिला जाण या हेतु ॥ २२ ॥

मग येरें गोदोहने केलें ॥ कांहीं उपहारातें सारिलें ॥ मग शयनातें आरंभिलें ॥ पाय चुरिलें तयातें ॥ २३ ॥

तंव नारायण विचारिता जाला ॥ म्हणे आजवरी द्रव्यार्थ काय सांचिला ॥ तो सत्य निवेदीं मजला ॥ शंका या बोला न मानीं ॥ २४ ॥

येरू परमलज्जें करूनीं ॥ सांगता झाला तये क्षणीं ॥ म्हणे एकदशक रौप्य नाणें साचुनीं ॥ ठेविलें सदनीं आजवरी ॥ २५ ॥

या विरहित कांहीं नसे जाण ॥ पात्र तो मृन्मय भोजन ॥ वाहतों तव चरणाची आण ॥ सत्य जाण महाराजा ॥ २६ ॥

निर्मळ ह्रदयींचा पाहून ॥ चित्तीं द्रवला नारायण ॥ कांहीं उपाय करून ॥ लावावें साधन यालागीं ॥ २७ ॥

मग तयातें मधुर वचनीं ॥ बोलता जाला तत्क्षणीं ॥ म्हणे मी सांगेन जी करणी ॥ ते तूं निजमनीं धरसी कीं ॥ २८ ॥

येरू म्हणेजी तत्वतां ॥ असत्य न करीं वचनार्था ॥ सांगाल तें स्वीकारीन आतां ॥ नव्हे अन्यथा स्वामिया ॥ २९ ॥

मग श्लोकाधारें करून ॥ बोलता जाला वचन ॥ तोचि अवगत हों जाण ॥ तुम्हांलागून समस्ता ॥ ३० ॥

गोदाने नभवेल्लोको गवांलोम्नांहि संख्यया ॥ कल्पांतं ब्रह्मणोलोकः पापनाशप्रभावतः ॥ १ ॥

म्हणे या मलमासी निःशेष ॥ गोदान परम विशेष ॥ जे आचरती निर्दोष ॥ त्या पुण्यास पार नाहीं ॥ ३१ ॥

जितुके रोम धेनू आंगीं असती ॥ तितुके कल्प ब्रह्मलोकीं वस्ती ॥ समूळ होय पापाची शांति ॥ आचरे तयाप्रती हें पुण्य ॥ ३२ ॥

तरीं उदईक करून प्रातःस्नान ॥ ही धेनू करीं

कृष्णार्पण ॥ वरी दक्षिणा संचित जें रौप्यनाणें ॥ करी अर्पण द्विजातें ॥ ३३ ॥

इतुकें वचन जरी मानिसी ॥ तरीं तूं अक्षयी सुखी राहासी ॥ येरु वदे त्या समयासी ॥ तथास्तु ऐसी अक्षरें ॥ ३४ ॥

परी विश्वास न वाटे नारायणा ॥ करील न करील गोदाना ॥ येवढीच तयातें उदरपोषणा ॥ म्हणोनि मना संशयो ॥ ३५ ॥

परी विप्रकुमर तो द्रवला ॥ आधींच होता तो त्रासला ॥ त्याहीवरी सद्गुरु भेटला ॥ उपदेश केला परमार्था ॥ ३६ ॥

मग भावार्था धरूनी सद्गुरुवचनी ॥ प्रातःकाळीं आला स्नान करूनीं ॥ एका विप्रातें बोलावूनीं ॥ गोपूजनीं अनुसरला ॥ ३७ ॥

दाना तें जो विप्र पाचारिला ॥ तो परम आश्चर्य मानिता झाला ॥ म्हणे आज काय आठवलें याला ॥ पुढें निर्वाहाला केविं होय ॥ ३८ ॥

असो आपणासीं काय कारण ॥ सांप्रत धेनु येतसे दान ॥ म्हणोन विधियुक्त संकल्प सांगून ॥ करी पूजन

धेनूचें ॥ ३९ ॥

उपरि विप्रपूजा स्वयें करून ॥ ते धेनु असे दिधली दान ॥ मनीं भावार्थ गुरुवचनीं पूर्ण ॥ नसे जाण अन्य कांहीं ॥ ४० ॥

एका सद्भावावांचून कांहीं ॥ सद्‌गुरुची भेटी होणार नाहीं ॥ तयाविण सुटे न संदेहो ॥ जाणा सर्वही भाविकहो ॥ ४१ ॥

आधींच विप्रकुमर दरिद्री पाहीं ॥ मातापिता पाळिता दुजा नाहीं ॥ उदर निर्वाहाची धेनू तेही ॥ दिधली पाहीं दानाते ॥ ४२ ॥

एक दिनीचें भक्षावया अन्न ॥ तेंहीं किंचित गृहीं नसे जाण ॥ यापरी सर्वस्वें घडले दान ॥ तया विप्रकुमरा लागून ॥ ४३ ॥

ऐसें जालें ते दिवसी जाण ॥ परी प्राप्त झाला माध्यान ॥ विप्रकुमर तळमळें तेणें करून ॥ अन्न भक्षावया ॥ ४४ ॥

अंतरींच आपुल्या कुसमुसी ॥ कांहीच न बोले सद्‌गुरूसी ॥ ऐसें करितां अस्तमानासी ॥ संधी आपैसी होऊं आली ॥ ४५ ॥

तंव नारायणें काय केलें ॥ निवांत मनीं आसनीं बैसले ॥ स्नान संध्येतें मांडिलें ॥ आरंभिलें पूजानातें ॥ ४६ ॥

त्रैलोक्यनाथ चक्रपाणी ॥ उपोषित राहुं नेदीच कोणी ॥ कीटकपक्षी आदीकरूनी ॥ जो त्रिभुवनीं पाळीतसे ॥ ४७ ॥

तेथें विप्रकुमर क्षुधेनें पीडित ॥ हे तयातें न साहवेची मात ॥ तंव तो नारदमुनी अकस्मात् ॥ देखिलें तेथें कौतुकातें ॥ ४८ ॥

मग तैसाच त्वरे चालिला ॥ मुनी ब्रह्मलोकाप्रती आला ॥ सद्भावें नमस्कारिला पिता आपुला ॥ आणी समग्र निवेदिला वृत्तांतु ॥ ४९ ॥

म्हणे नवल देखिलें आजी स्वामि ॥ विप्रकुमराचीं अक्षरें लिहिली तुम्ही ॥ जे तक्रविक्रयें निर्वाह व्योमीं ॥ प्रतिदिनीं करावा ॥ ५०॥

ऐसें अक्षर स्वामीचें ॥ तें असत्य जालें साचे ॥ तयाने दान केले धेनूचे ॥ पुढे निर्वाहाचे कसे काय ॥ ५१ ॥

अस्ता होऊं आला दिनमान ॥ पुढे तयाची गती कवण ॥ असत्य जाले वचन ॥ ब्रह्म अक्षरे पूर्ण स्वामिया ॥

५२ ॥

ऐकून नारदमुनीची वाणी ॥ चतुरानन दचकला मनीं ॥ निरखितां जाला जंव ध्यानीं ॥ तंव सत्यवाणी सर्वही ॥ ५३ ॥

म्हणे हे तो विपरीत जाले ॥ तयाते सर्वस्व दान घडले ॥ आतां उपायाते पाहिजे केले ॥ तरीच भले कर्म हे पैं ॥ ५४ ॥

येथे जे जे अर्पावे ॥ तया दशगुणी लागे पावावे ॥ हे जाणुनी ब्रह्मदेवे ॥ काय मांडिले विंदान ॥ ५५ ॥

सत्वर ब्राह्मण वेष नटला ॥ सवे दश गाईंचा मेळा ॥ घेऊन भूलोकीं आला ॥ त्वरे पावला विप्रसदन ॥ ५६ ॥

गाई उभ्या करून द्वारी ॥ विप्रकुमराते हाका मारी ॥ येरू पातला झडकरी ॥ सद्भावे नमस्कारी तयाते ॥ ५७ ॥

तंव चतुरानन बोले तयासी ॥ तुझियां पितरे आम्हापाशीं ॥ दश गौतम्या रक्षणासी ॥ ठेविल्या होत्या निर्धारे ॥ ५८ ॥

त्या तूं आपल्या अंगिकारीं आतां ॥ म्हणोनि जाला बोलता ॥ ऐसे वचन ऐकूनी तत्वतां ॥ येरू थांबा म्हणे तयाते ॥ ५९ ॥

मी आपुले गुरूसी पुसोन ॥ माघारा येतो परतुन ॥ ऐसे तयाते वदोन ॥ आला परतुन माघारा ॥ ६० ॥

मग गुरु बंधूतें म्हणे तेव्हां ॥ एक विप्र आलासे सदैवा ॥ तयानें आणिल्या दशधेनुवा ॥ अंगिकार मातें म्हणतसे ॥ ६१ ॥

म्हणे तुझिया बापें ठेविल्या पाहीं ॥ हे तो मातें विदित नाहीं ॥ काय उत्तर असे ते समयीं ॥ कृपा करून देई तयातें ॥ ६२ ॥

ऐसें ऐकून नारायण ॥ किंचित केलें हास्यवदन ॥ कळली अंतरीची खूण ॥ आला घेऊन विधाता ॥ ६३ ॥

येथें जैसे आपण द्यावें ॥ तया दशगुणी लागे पावावें ॥ म्हणोनियां ब्रह्मदेवें ॥ दशधेनू आणिल्या पैं ॥ ६४ ॥

मग तयातें आज्ञा देते अवसरीं ॥ धेनु आणिका गृहाभीतरी ॥ तया विप्रातें नमस्कारी ॥ जोडल्याकरीं सद्भावें ॥ ६५ ॥

येरें जाऊन तैसेंची केले ॥ धेनुका तें अंगिकारिले भले ॥ वरी रौप्य नाणें चांगले ॥ गणित भलें एकदशक ॥ ६६ ॥

ऐसें स्वीकारून ते वेळा ॥ नमस्कारूनि विप्र बोलाविला ॥ नारायणातें निवेदिता झाला ॥ वाडा भरला गोधनीं ॥ ६७ ॥

तंव तयाते वदे नारायण ॥ एक मोडीं आतां रौप्य नाणें ॥ धेनू लागीं घेऊन येई तृण ॥ आणि उदरा लागुनि तुझिया ॥ ६८ ॥

जे इच्छा असेल अंतरीं ॥ तेची तूं आजी स्वीकारी ॥ अर्ध नाणें तया माझारी ॥ असों दे पदरीं तुझीयां ॥ ६९ ॥

ऐसें आज्ञापितां तयातें ॥ येरू आज्ञा तैसीच वर्तत ॥ रौप्य नाणें नेऊन बाजारांत ॥ तृण आणित धेनुलागीं ॥ ७० ॥

मग गौ आणि आपली वासना ॥ तोची पदार्थ घेत आपणा ॥ अर्ध रौप्य नाणें समग्रहीं जाणा ॥ ठेविता झाला विप्रकुमार ॥ ७१ ॥

धेनुवेतें घालुनियां तृण ॥ स्वयें सारिलेंसे भोजन ॥ मग

गुरुसेवेलागून ॥ तत्पर झाला यामिनीं ॥ ७२ ॥

तंव शिकवण देतसे नारायण ॥ म्हणे बापा ऐक एकवचन ॥ प्रातःकाळीं उठोन गंगास्नान ॥ येई करून झडकरी ॥ ७३ ॥

मग बोलावून विप्रमेळा ॥ दान देई धेनूसकळा ॥ स्वयें होई तूं तंव निराळा ॥ पाहिजे कशाला खटाटोप ॥ ७४ ॥

रौप्य नाणें तुझिया पदरीं ॥ गणती असे नऊद्वारीं ॥ एक अर्धरौप्य नाणें वरी ॥ असो साचारी जाणतां ॥ ७५ ॥

तरी दहा विप्र बोलावून ॥ दक्षिणे सहित देई गोदान ॥ झणी करिसी अनुमान ॥ वचना जाण माझिया ॥ ७६ ॥

ऐेशी शिकवण देतां तयातें ॥ येरू अवश्य म्हणे त्यातें ॥ अमान्य स्वामी वचनातें ॥ न करीं जाण स्वामियां ॥ ७७ ॥

नंतर प्रातःकाळी उठोन ॥ करिता जाला गंगास्नान ॥ पाचारूनिया ब्राह्मण ॥ केलें संपूर्ण गोदान ॥ ७८ ॥

दान केसें सर्वही धन ॥ माध्यन्हिकातें नाहीं धान्य ॥ म्हणे हे भगवन् जनार्दन ॥ केवीं प्राक्तन माझें हें ॥ ७९ ॥

धन देखिलें नाहीं आजवरी ॥ तें चालत आलें निजमंदिरीं ॥ तेंहीं न राहावें कीं पदरीं ॥ जन्मवरी चुकेना ॥ ८० ॥

माझिये प्रारब्धीं हेंची पूर्ण ॥ तक्रविक्रयें उदरपोषण ॥ करावें परी तें धेनुही जाण ॥ दिधली दान गुरु आज्ञें ॥ ८१ ॥

ऐसा कुसमुसीं आपुले मनीं ॥ परी बोलून दाविना वदनीं ॥ तंव संधी प्राप्त जालीया वन्ही ॥ विप्रमनीं क्षुधित पैं ॥ ८२ ॥

तंव चित्रगुप्त वृत्तांतातें ॥ समूळ निवेदिलें ब्रह्मयातें ॥ काल दश धेनुवा दिधल्या ज्यातें ॥ त्यानें त्या द्विजातें अर्पिल्या ॥ ८३ ॥

समग्र धेनूचें केलें दान ॥ पदरीं नाहीं कांहीं अन्न ॥ तक्रविक्रय उदर पोषण ॥ करी उपोषण विप्रकुमार ॥ ८४ ॥

मग शत धेनूचा समुदावो ॥ घेऊन चालिला ब्रह्मदेवो ॥

द्वारदेशीं उभा राहून पहाहो ॥ पाहाता झाला विप्रकुमरा ॥ ८५ ॥

म्हणे महापुरुषा बाहेर येई ॥ हीं गोधनें सांभाळून घेई ॥ तुझिया बापाची हे ठेवी ॥ आजवरी पाहीं पाळिली मी ॥ ८६ ॥

ऐसी ऐकताची मात ॥ येरू आला धांवत धांवत ॥ पोटीं क्षुधानळ अति तप्त ॥ तों नयनीं देखता विप्रावो ॥ ८७ ॥

देदीप्यमान सर्वशरीरीं ॥ भस्में चर्चित वस्त्र पाठारीं ॥ रुद्राक्ष माळां अतिसाजिरी ॥ कंठीं घाली परिपूर्ण ॥ ८८ ॥

सवें गोधनाचा कळप ॥ गणिता एक शत भरी माप ॥ मग परतला अति साक्षेप ॥ गुरुबंधु जवळिके ॥ ८९ ॥

सर्व वृत्तांत निवेदिला ॥ म्हणे द्वारीं एक विप्र असे आला ॥ सवें शत धेनूंचा मेळा सांभाळीं मजला म्हणतसे ॥ ९० ॥

विप्र परम दैदीप्यमान ॥ मुखीं बोलतसे वचन ॥ तुझिया वडिलांचीं हीं गोधनें ॥ वरी रौप्य नाणें शतवरी ॥ ९१ ॥

ऐसें तो वदतसे वचन ॥ सांगा आतां अज्ञाते कवण ॥ येरू बोलतसे हांसून ॥ सांभाळीं गोधन सर्वही ॥ ९२ ॥

गुरु आज्ञेनें तत्वता ॥ गोधनें जाला आणिता ॥ हातीं घेऊन द्रव्यशता ॥ पाहतां विप्र गुप्त झाला ॥ ९३ ॥

परी हें ब्राह्मण नेणें कांहीं ॥ हर्षयुक्त धेनु आणि सर्वही ॥ ही खूण नारायणातें ठावी ॥ इतरा काई अवगत ॥ ९४ ॥

मग गोधनें भरुनि गोठण ॥ घातलें तयालागीं तृण ॥ स्वयें भक्षी श्रेष्ठ अन्न ॥ आवडे पदार्थ तोची पैं ॥ ९५ ॥

ऐसी करूनी सारासारी ॥ मागुती गुरुसेवा अंगिकारी ॥ चरण चुरितां निर्धारी ॥ बोले ते अवसरीं नारायण ॥ ९६ ॥

म्हणे सख्या ऐक वचन ॥ गृहभरी दाटलें गोधन ॥ यासी सांभाळिसी कैसेन ॥ तरी सांगतों वचन तें ऐक ॥ ९७ ॥

एक धेनूतें पोसितां ॥ कंटाळा आलासे तत्वतां ॥ येथें शंभरांची वार्ता ॥ केवीं आतां घडूं शके ॥ ९८ ॥

तरी उदईक स्नान करूनी॥ पाचारी विप्रालागुनी ॥ संपूर्ण गोधनें दक्षिणादानीं ॥ विप्रा लागुनी अर्पावे ॥ ९९ ॥

संग्रहीं न ठेवीं एक अडका ॥ उतुकें कार्य आधीं करीं कां ॥ येरू तैसेंच करी देखा ॥ उठोनियां प्रातःकाळीं ॥ १०० ॥

स्नान सारिलें गंगाजळीं ॥ पाचारिली विप्रमंडळी ॥ समग्र गोधने एकच मेळीं ॥ पूजा केली गंधाक्षतें ॥ १ ॥

मग एक रौप्य गोधन ॥ अर्पिता झाला विप्रालागून ॥ ब्राह्मणाचे मनीं हर्ष पूर्ण ॥ नेता गोधनें बोलती ते ॥ २ ॥

म्हणे प्रतिदिनीं वांटितो गाई ॥ यासी तो एक दिनाचें भक्ष नाहीं ॥ ही तो दिसती अपूर्व नवाई ॥ किंवा शेषशायी तुष्टला ॥ ३ ॥

एक म्हणती कारण काय आपणातें ॥ आणू कोठून तरी परातें ॥ धेनू मिळाली एक आपणातें ॥ दक्षिणेसहीत निर्धारें ॥ ४ ॥

ऐसें बोलतां द्विजवर ॥ समस्त पातले निजमंदीर ॥

इकडे रडे विप्रकुमार ॥ होउनी स्थिर बैसलासे ॥ ५ ॥

म्हणे रात्रीं गृहभरी दाउनी ॥ वाडा भरलासे गोधनीं ॥ कैसी कर्माची काहणी ॥ न देखो नयनी पै एक ॥ ६ ॥

ऐसे म्हणोनि स्वस्थ बैसला ॥ तो दिनअस्त होऊं आला ॥ परी पाहूनिया कौतुकाला ॥ नारद गेला ब्रह्मलोका ॥ ७ ॥

नमुनियां चतुरानन निवेदिता जाला वर्तमान ॥ म्हणे आपण दिधलें गोधन ॥ ते दिधलें दान तयानें ॥ ८ ॥

तक्र विक्रयीं निर्वाहो ॥ ऐसा लिखिताचा भावो ॥ परी एकही धेनूतें न ठेवी हो ॥ पुढें निर्वाहो कैसेनी ॥ ९ ॥

होऊं आला अस्तमान ॥ उपोषित असे तो ब्राह्मण ॥ ऐकतां मुनिश्वराचें वचन ॥ हांस्य केलें कमळासनें॥ १० ॥

मागुती कमळासने उठोन ॥ सवें घेतलें सहस्र गोधन ॥ वरी सहस्र रौप्य नाणें घेऊन ॥ चतुरानन पातला ॥ ११ ॥

उभा राहून द्वारदेशी ॥ हांक मारी विप्रकुमरासी ॥ येरू धांवत आला वचनासरसी ॥ केला विप्रांसी नमस्कार

॥ १२ ॥

ब्रह्मा बोलतसे तेव्हां ॥ ह्या धेनू सांभाळी सदैवा ॥ वरी रौप्य नाणें ठेवा ॥ सहस्त्रवरी पैं असे ॥ १३ ॥

आतां तरी सांभाळीं समग्र पाहीं ॥ वदोन गुप्त जाला तेचि ठायीं ॥ देखतां चाकाटला निजहृदयीं ॥ आला लवलाही भीतरी ॥ १४ ॥

समूळ वृत्तांत निवेदिला ॥ म्हणे सहस्र गोधनाचा मेळा ॥ घेऊनि रौप्य नाण्याला ॥ परी पाहतां गुप्त जाला नेणवे ॥ १५ ॥

ऐकून तोषला नारायण ॥ म्हणे लागलें हें साधन ॥ मग म्हणें तया लागून ॥ सांभाळीं कोण कळपा ॥ १६ ॥

तरी धेनूतें अर्पी तृण ॥ तूंही सारी कां भोजन॥ प्रातःकाळीं करूनियां स्नान ॥ आणी पाचारून विप्रातें ॥ १७ ॥

समस्त धेनु दक्षिणेसी ॥ दान देई कां ब्राह्मणासीं ॥ येरू हर्षयुक्त मानसीं ॥ तथास्तु ॥ वचनासीं बोलतसे ॥ १८ ॥

मग दुसरे दिनीं तैसाच प्रकार ॥ आचरता जाला

विप्रकुमर ॥ पाचारुनियां धरामर ॥ धेनु समग्र वाटिल्या ॥ १९ ॥

दक्षिणेसहीत दिधलें दान ॥ नाहींसें केलें सहस्र नाणें ॥ न उरे दर्शना एकही जाण ॥ धेनु संपूर्ण निजगृहीं ॥ २० ॥

ऐसें करितां तये वेळां ॥ वृत्तांत ब्रह्मयातें कळला ॥ म्हणे सहस्र गोधनें वांटिता जाला ॥ अहारे कपाळा हें काय ॥ २१ ॥

आतां दहा सहस्र नेतां धेनु ॥ त्याही दान देईल ब्राह्मणु ॥ ऐसा प्रत्यही दशगुणित धेनु ॥ कोठुन आणु तयातें ॥ २२ ॥

तयातें आयुष्य शतभरी पूर्ण ॥ तो तंव प्रत्यहीं करील हेंचि कारण ॥ त्याचें रुचेल येथेंची मन ॥ तक्र विकून काय काज ॥ २३ ॥

कोण गुरु तयातें भेटला ॥ माझा मंत्र मज फळला ॥ उणें आणिलें ब्रह्माक्षराला ॥ हें तंव वेदाला विहित नसे ॥ २४ ॥

मग हंस विमान पाचारिलें ॥ तयातें निजमुखें निवेदिलें ॥ भूलोकी जाऊन ये वेळें ॥ घेऊन येई विप्रकुमारा ॥

२५ ॥

मग हंस विमान येऊन ॥ देदीप्यमान केला ब्रह्मनंदन ॥ येरे नारायणातें म्हणून ॥ म्हणे प्रसाद हा जाण पैं तुझा ॥ २६ ॥

पावन केलें गुरुराया ॥ निवारिली जन्म मरणाची छाया ॥ म्हणोन वारंवार लागे पायां ॥ भिती नाहीं भावार्था ॥ २७ ॥

स्तुति वादन करवेची जाण ॥ वाचेसीं पडिलें दृढ मौन ॥ न उगवतां त्रितीय दिन ॥ नेला उद्धरून ब्रह्मलोका ॥ २८ ॥

समग्रजन आश्चर्य करिती ॥ नारायणाचे चरणीं लागती ॥ धन्यधन्य श्रीगुरुमूर्ति ॥ यातायाती निवारिली ॥ २९ ॥

ऐसें हें गोदान प्रकरण ॥ विशद केलें श्रोतियां लागून ॥ न लागता त्रितीय दिन ॥ नेला उद्धरून विप्रकुमर ॥ ३० ॥

म्हणोनियां मळमासीं जाण ॥ अगत्य घडे गोपूजा वरदान ॥ त्याहीवरी संतसेवा पूर्ण ॥ न लागे आन साधन पैं ॥ ३१ ॥

श्रीगुरु चरणीं परम विश्वास ॥ तयाचा चुकें गर्भवास ॥ पुढती न लागेची सायास ॥ जन्मपंक्तीस भोगणें॥ ३२ ॥

प्रत्यय देखिया नयनीं ॥ विप्रकुमर गेला उद्धरोनीं ॥ अक्षई परब्रह्म भुवनीं ॥ नव्हे हानी कालत्रयीं ॥ ३३ ॥

म्हणोन प्रथम श्लोकाचा भावार्थ ॥ निवेदिला तुम्हां तें समस्त ॥ येथें धरूनियां शुद्ध भावार्थ ॥ आचरावें सतत व्रत हे ॥ ३४ ॥

गोदाने नभवेल्लोको गवांलोम्नांहि संख्यया ॥ कल्पांतं ब्रह्मणे लोकः पापनाशः प्रभावतः ॥ २ ॥

ऐसा हा प्रथम श्लोक भला ॥ त्यावरी कथाभाग वर्णिला ॥ जे आचरती गोदानाला ॥ तरी ब्रह्मलोकीं तयाला वास घडे ॥ ३५ ॥

जितुके रोम गौतमी वरी ॥ निवास तितुका कल्पवरी ॥ पापक्षाळण निर्धारी ॥ तात्काळीकें जाण पां ॥ ३६ ॥

विप्रकुमरें पुण्य केलें ॥ परी जन्मांतरीचें पाप गेलें ॥ तक्रविक्रयें ज्याचें खुंटलेलं ॥ गुरुसेवे फळलें भाग्य त्याणें ॥ ३७ ॥

म्हणोनियां भाविकजन ॥ सद्‌गुरूतें जावें अनन्य शरण ॥ गर्भवास चुके जेणें ॥ न लागे साधन आणिक कांहीं ॥ १३८ ॥

स्वस्ति श्रीमलमहात्म ग्रंथ ॥ पद्मपुराण आणि स्कंद पुराणान्त ॥ संमत घेउन मनोहरसुत ॥ त्रयविंशतितमोऽध्याय संपूर्ण ॥ २३ ॥

ओव्या १३८ ॥ श्लोक २ ॥

॥ इति त्रयविंशंतितमोऽध्यायः ॥

------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय चोविसावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ ॐ नमो आदिनारायणा ॥ विश्वचाळका विश्वपाळणा ॥ चराचर जे कां रचना ॥ ते जाण तव सत्तें ॥ १ ॥

तेथें मी नमन कर्ता ॥ ही केउतीं पैं असे वार्ता ॥ म्हणोन मौन्याची वाग्लता ॥ चरणीं माथा ठेवित ॥ २ ॥

कुशळ करावी कविता ॥ हे सकळ तुझी सत्ता ॥

वदता आणि वदविता ॥ मनोरथ पुरविता तूंचि पै ॥ ३ ॥

ऐका श्रोतेहो संतसज्जन ॥ मागें विप्र कुमर गेला उद्धरून ॥ सद्गुरू नारायणें कृपा करून ॥ गोदानें उद्धरिला ॥ ४ ॥

आतां तयाची जे भगिनी ॥ ते तों वेश्येनें नेली चाळवूनी ॥ तयेची काय जाली करणी ॥ नारायणा मनीं ते चिंता ॥ ५ ॥

सद्गुरू ऐसा दयाळु पाहीं ॥ दुजा न देखों कवणे ठायीं ॥ विप्रकन्या बुडतसे पाहीं ॥ पापडोहीं अगम्य ॥ ६ ॥

तरी ते असे कवणे ठायीं ॥ तिये तें लावावें परमार्थ सोई ॥ म्हणोन निघाला लवलाहीं ॥ शोधी सर्वही भूमंडळा ॥ ७ ॥

तंव लक्षुमण नामें एक नगर ॥ असे विस्तीर्ण अग्ने कोणावर ॥ चारी वर्ण अपरंपार ॥ धनदाई सावकार सर्वही ॥ ८ ॥

तेथें ती विप्रकन्या पाहीं ॥ वेश्या घेऊन गेली लवलाही ॥ ठेविती जाली निजगृहीं ॥ अत्यादरें करूनी ॥ ९ ॥

उपवर जाली विप्रदुहिता ॥ सभाग्य तिये तें देखतां ॥ मागितलें धन देती हाता ॥ अतिसुंदरता देखुनी ॥ १० ॥

आधींच ब्राह्मणवर्णी ॥ गौरांगी सुंदरपणीं ॥ गंडस्थळें ठसठसूनी ॥ नासिककर्णी डोळसा ॥ ११ ॥

ऐसियेतें देखूनी शेटे महान ॥ मागितलें द्रव्य देती आणून ॥ येरी ही जालीसे निमग्न ॥ भरला मदन निजांगीं ॥ १२ ॥

तया नगरीं नारायण पाहीं ॥ अवचट पातला तया ठायीं ॥ शोध करितां वेश्यागृहीं ॥ कळला सर्व वृत्तांत ॥ १३ ॥

मग तिचिया गृहा पातला ॥ नयनीं देखिली विप्रबाळा ॥ मनीं म्हणे अहारे कपाळा ॥ हा तंव सोहळा केउता ॥ १४ ॥

गृहीं दासदासी अपार ॥ गजरथ वाजी शकट थोर ॥ नानावस्त्रें अलंकार ॥ तेणें सुंदर शोभली ॥ १५ ॥

ऐसी देखुनी सुंदरी तें ॥ निसंग चढला उपरी वरुतें ॥ येरी अवलोकितां तयातें ॥ असेल कोणी व्यसनी हा ॥ १६ ॥

येरी मनीं चाकाटली मनस्वी ॥ म्हणे हा तंव दिसताहे तपस्वी ॥ नेणों याची पूर्ण उर्मिसी ॥ म्हणोनि धामीं आलासे ॥ १७ ॥

आसन देऊनियां सत्वरा ॥ नमन केलें द्विजवरा ॥ येरू न दे आशीर्वादोत्तर ॥ न घे थारा निजासनीं ॥ १८ ॥

ती म्हणे स्वामी बैसावें येथें ॥ येरु हास्य वदनें बोले तीतें ॥ तुवां वोळखिलें नसे कीं आम्हांते ॥ बोले निरुते शुभानने ॥ १९ ॥

तुझा जन्म कवणे ठायीं ॥ कोठून आलीस या ठायीं ॥ ब्राह्मणकुळीं उपजोन पाहीं ॥ काय केलें सार्थक ॥ २० ॥

तुझी मातापिता पुण्यवान् ॥ तुझिया बंधूची दशा कवण ॥ येथें विषयीं आसक्त होऊन ॥ काय कर्माचरण आचरलीसी ॥ २१ ॥

उत्तम हा नरदेह पाहीं ॥ वारंवार लाधणार नाहीं ॥ याचें सार्थक करी कांहीं ॥ न पडे प्रवाहीं अनेक ॥ २२ ॥

पुढे नरकवास अति दारुण ॥ कुंभपाकीं घाली सूर्यनंदन ॥ तेथे सोडविता तूंते कोण ॥ असे तो

सांगणे मजलागीं ॥ २३ ॥

हा तुझा समग्र परिवार ॥ दासदासी अपार ॥ हस्तीवाजी रथवर ॥ धन अपार गाठिसी ॥ २४ ॥

हे तंव राहील जेथील तेथे ॥ अंती एकले जाणे लागे तूते ॥ विचारून पाहे पुरते ॥ सांगतो सत्य तुजलागीं ॥ २५ ॥

ऐसी उपदेशयुक्त वोळखण ॥ तियेते देता जाला नारायण ॥ येरी पाहाती जाली निरखून ॥ तों ओळखिला पूर्ण निजमनीं ॥ २६ ॥

हा तंव माझा गुरुबंधु ॥ म्हणोन चाकाटली ते वधु ॥ काहीं न बोलेची अनुवादु ॥ मौनेची वंदिले तयातें ॥ २७ ॥

सद्गदीत परम अंतरीं ॥ होऊन तयाचे चरण धरी ॥ बोलती जाली ते सुंदरी ॥ अतिआदरें तयातें ॥ २८ ॥

मग मुळापासून समग्र ॥ तयातें सांगती जाली समाचार ॥ म्हणे माझें तंव कर्म अघोर ॥ भोगिल्याविण सुटेना ॥ २९ ॥

आतां कवण उपायातें करूं ॥ केवीं उतरेल पैलपारु ॥

कवण भेटेल ऐसा सद्गुरु ॥ नरक घोरु चुके जेणें ॥ ३० ॥

हा नरदेह अती उत्तम पाहीं ॥ तया उपरी ब्राह्मण वर्णदेहो ॥ आहा रे जनार्दना शेषशाई ॥ काय हे दैवीं महाराजा ॥ ३१ ॥

ऐसे म्हणोन ते वेळीं ॥ ढळढळा अशु गाळी ॥ चरणीचें मस्तक मौळी ॥ विप्रबाळी न सोडीच ॥ ३२ ॥

परम गहिंवर दाटला ॥ मग कंठ करूनिया मोकळा ॥ रडों लागलीं ते अबळा ॥ पडली गळां विप्राच्या ॥ ३३ ॥

म्हणे मायबापें सर्व गोत ॥ माझा तूं तंव परम आप्त ॥ नेणो बुद्धीची कोण गत ॥ माझी मात केउती घडे ॥ ३४ ॥

आम्हीं उभयतां भावंडें जाण ॥ दोघांच्या गती जाल्या दोन ॥ केउता कोपला नारायण ॥ कैसें प्राक्तन माझें हें ॥ ३५ ॥

आहा देवा केले काई ॥ माता-पित्याची सेवा घडली नाहीं ॥ बंधु तोही अवलोकिला नाहीं ॥ पडलें अपाई काळाच्या ॥ ३६ ॥

दानधर्म नेणेची वार्ता ॥ भजन पूजन न घडे सर्वथा ॥ विप्रभोजन न जाणें तत्वता ॥ नाहीं वार्ता पुण्याची ॥ ३७ ॥

संतसेवा घडली नाहीं जाण ॥ नायकों कथा पुराण श्रवण ॥ वृथा आलें जन्मा लागून ॥ केउता भगवान् कोपला ॥ ३८ ॥

अहारें दुष्टा चतुरानना ॥ हें काय वोढवलें माझिया प्राक्तना ॥ हे केशवाहे जनार्दना ॥ यमयातना निवारि हे ॥ ३९ ॥

ऐसी सद्गदीत अंतरीं ॥ परम घाबरली सुंदरी ॥ टपटप अश्रु गाळी नेत्रीं ॥ द्रवला अंतरी नारायण ॥ ४० ॥

मग तियेतें धरून ह्रदयीं ॥ संबोखिता जाला ते समयीं ॥ म्हणे चिंता न करीं काहीं ॥ शेषशाई निवारील ॥ ४१ ॥

ऐसें आश्वासुनी तिजला ॥ आपण निजासनीं बैसला ॥ मग म्हणे सांगेन जे ये वेळा ॥ ऐकसी कीं राजसे ॥ ४२ ॥

येरी वदे ते समयीं स्वामियां ॥ अमान्य नोहे वचना तुझिया ॥ सांगाल तेच क्रिया ॥ स्वयें आचरेन निर्धारें

॥ ४३ ॥

मग वदे तेव्हां नारायण ॥ म्हणे करीं सर्वस्व गृहदान ॥ राहें निराळी होऊन ॥ पुढें महिमान देखसी ॥ ४४ ॥

आप्त सेवक सर्वांतें ॥ निरोप देई सकळातें ॥ देऊन त्याचियां द्रव्यातें ॥ अर्पी ब्राह्मणातें सर्वही ॥ ४५ ॥

स्वयें करूनिया स्नान ॥ मग पाचारी ब्राह्मण ॥ समग्रही पूजा करून ॥ देई लुटुन भामिनिये ॥ ४६ ॥

तुळसीपत्र ठेवी गृहास ॥ कांहीं न धरीं मनीं आस ॥ होई सर्वस्व उदास ॥ सोडी आस सकळही ॥ ४७ ॥

ऐसें आचरता तुजलागीं ॥ नुपेक्षुनि क्षीराब्धिजायोगी ॥ उडी घालूनि निजांगीं ॥ होईल भयभंगीं दयाळु ॥ ४८ ॥

विश्वास मानिसी वचनीं ॥ तरीं मुक्त होसी येच क्षणीं ॥ पापद्रव्य देई टाकुनी ॥ चक्रपाणी तुष्टेल ॥ ४९ ॥

ऐसें वदतां तियेलागून ॥ येरी तैसेंच करिती जाली आपण ॥ तत्क्षणीं आली स्नान करुन ॥ पाचारी ब्राह्मण नगरीचे ॥ ५० ॥

मग संकल्प करूनि सकळ ॥ गृहावरी ठेविले

तुळशीदल ॥ गाई म्हशी वाजी कल्होळ ॥ विप्र सकळ नेते जाले ॥ ५१ ॥

दास आणि दासी पाहीं ॥ द्रव्य देऊनी मुक्त केले तेही ॥ एकाकी एक वस्त्रानिशी पाहीं ॥ ऐसी नवाई जालीसे ॥ ५२ ॥

इतुकें कर्म सरेतो परियंत ॥ नारायणही होता तेथ ॥ मागुता वदे तियेते ॥ जातो बिराडाते पैं आम्हीं ॥ ५३ ॥

आतां तुवा एक करावे ॥ एका नेमाते स्वीकारावे ॥ तीन सहस्त्र द्रव्य घ्यावे ॥ तरीच आतळूं द्यावे शरीर ॥ ५४ ॥

तीन सहस्र अर्पील जो द्रव्य तूंतें ॥ तरींच पुरविजे तयाच्या मनोरथातें ॥ नाहीं तरी स्वस्थ बैसे निवांतें ॥ मानी वचनार्थ इतुका ॥ ५५ ॥

आम्ही येऊं प्रात:काळी ॥ आकर्णून तुझी नव्हाळी ॥ कृपाळू तो चंद्रमौळी ॥ संकटीं सांभाळी दासातें ॥ ५६ ॥

ऐसें वदोन चालता जाला ॥ येरीनें नमस्कारूनी बोळविला ॥ म्हणे अमान्य करीं वचनाला ॥ जो

सांगितला धर्म पैं ॥ ५७ ॥

सूर्य अस्त पावला झाला ॥ तंव जार आलें ते वेळां ॥ तीन सहस्रांचा नेम ऐकिला ॥ परतळा मेळा सर्वही ॥ ५८ ॥

कोणाते न देववे इतकें द्रव्य ॥ मग परतते जाले सर्व ॥ येरी उपोषित असे पाहाहो ॥ तंव काय अपूर्व वर्तलें तेथे ॥ ५९ ॥

अंतरिक्ष जातां नारदमुनी ॥ कौतुक पाहिलें तेणें नयनीं॥ तैसेच येते जाले ब्रह्मभुवनीं ॥ ब्रह्मया लागुनि नमियेलें ॥ ६० ॥

स्वागत पुसतां ब्रह्मदेवें ॥ काय देखिलेजी अपूर्व ॥ मग हास्य करूनि मुनिपुंगव ॥ काय पाहाहो बोलतु ॥ ६१ ॥

काय तुमचिया लिखितार्था ॥ दिसो न आलि असें ताता ॥ मग समूळ निवेदिली वार्ता ॥ होय देखता जेथें पैं ॥ ६२ ॥

म्हणे विप्र कन्या सुंदर ॥ तियेने आचरावे कर्मजार ॥ तयायोग भरावे उदर ॥ हे तंव अक्षरस्वामीचे ॥ ६३ ॥

तरी तियेने सर्वस्व दान केले ॥ अलोट नेमाते स्वीकारिले ॥ तीन सहस्र द्रव्य देता भले ॥ तरींच घडे रती त्यासी ॥ ६४ ॥

ऐशा द्रव्याच्या नेमा लागुनी ॥ न देतां उपोषित कामिनी ॥ हे मी देखून नयनीं ॥ याठाया आलो असे ॥ ६५ ॥

ऐसे ऐकतां उत्तर ॥ मनी विचारी चतुर्वक्र ॥ म्हणे हे तों कर्म अघोर ॥ घडू आले दिसताहे ॥ ६६ ॥

मग उठोनियां झडकरी ॥ तीनसहस्र द्रव्य घेतले पदरीं ॥ त्वरे पातला त्या नगरीं ॥ अकस्मात द्वारीं उभा ठेला ॥ ६७ ॥

सौदागराचा वेष धरिला ॥ सत्वर उपरिवरी वेधला ॥ बोलतां जालासे बोला ॥ नेम ऐकिला निजकर्णी ॥ ६८ ॥

नेमयुक्त द्रव्य दिधलें ॥ म्हणें मी परतून येतो येवेळे ॥ सिद्धता असोंदे सकळ ॥ म्हणोन तात्काळ चालिला ॥ ६९ ॥

ऐसी करून नवाई ॥ गुप्त जाला ठाईंचे ठायीं ॥ येरी मार्ग लक्षीत बैसली पाहीं ॥ सूर्योदया पावेतो ॥ ७० ॥

परी येतां न देखे तयातें ॥ उपोषित बैसली तेथें ॥ नसिबेची द्रव्यातें ॥ कांहीं केलिया जाण पां ॥ ७१ ॥

तंव सूर्योदयो जाला ॥ आणि नारायण पातला ॥ येरीने वृत्तांत निवेदिला ॥ जो वर्तला निशीते ॥ ७२ ॥

म्हणे येऊन सौदागर ॥ द्र्व्य दिधले तीनसहस्र ॥ न देखो अद्यापवर ॥ पुढे प्रकार केउता ॥ ७३ ॥

ऐसे ऐकतांची उत्तर ॥ येरु हर्षला निर्भर ॥ म्हणे बोलावी धरामर ॥ वाटीं सर्व धन हे ॥ ७४ ॥

स्नान करून येई आतां ॥ बोलावूनि विप्रा समस्तां ॥ द्रव्य वेची हे तत्वतां ॥ नसे वार्ता अन्य कांहीं ॥ ७५ ॥

तथास्तु म्हणोन निज वाचा ॥ स्नान करून भावे साचा ॥ पाचारून मेळा विप्रांचा ॥ केला द्रव्याचा भणाणा ॥ ७६ ॥

मुष्टी आणि वोंजळ भरुनी ॥ द्रव्य वाटिती जाली कामिनी ॥ आश्चर्य करिती सकळजनी ॥ देखें नयनी नारायण ॥ ७७ ॥

दुसरे दिवसा लागुन ॥ नामुष्टी भरी अन्न ॥ तंव दिनमान झाला अस्तमान ॥ जाले कथन ब्रह्मदेवा ॥

७८ ॥

पुनः नारदें जाऊनीं वार्ता निवेदिली ब्रह्मया कर्णी ॥ म्हणे तीन सहस्र ते कामिनी ॥ केवी हाणी द्रव्यतें ॥ ७९ ॥

काल तुह्मीं जें द्रव्य दिधलें ॥ तें तो सर्वही दानातें दिधलें ॥ पुढे पाहिजे विचारिलें ॥ उपोषित अबला ती ॥ ८० ॥

आजिचा तो दुसरा दिन ॥ उपोषित ते अंगना ॥ जार न येती कोणी सदना ॥ पुढें विचारण केउती ॥ ८१ ॥

जारत्वें उदर भरावें ॥ हें तो असत्य जाले आघवें ॥ ऐसें ऐकून ब्रह्मदेवें ॥ म्हणे हें तो बरवें दिसेना ॥ ८२ ॥

मग उठोनी लवलाही ॥ तीस सहस्र द्रव्य घेतलें पाहीं ॥ तात्काळ पातले निजगृहीं ॥ असे ज्या ठायीं वेशा ते ॥ ८३ ॥

जितुकें द्रव्य दान दिधलें ॥ तयाच्या दशगुणीत अर्पिले ॥ पाहिजे म्हणोनि शास्त्र बोलिले ॥ यदर्थी घेतले तीस सहस्र ॥ ८४ ॥

आपण जातसे सावकार ॥ जुंपोनियां रहंवर ॥ बरी

द्रव्य तीस सहस्र ॥ पातला मंदीर लवलाहें ॥ ८५ ॥

समग्र द्रव्य पुढे ठेविले ॥ म्हणे हें ठेविजे गृहमेळें ॥ आम्हांतें व्यापिलें कामानळें ॥ येऊं भोगवेळ लक्षुनी ॥ ८६ ॥

आपण असो सावकार ॥ पाहून तूं तें स्वरूप सुंदर ॥ अंगीं दाटला कामज्वर ॥ म्हणोन सत्वर पातलों ॥ ८७ ॥

तरीं जें मागसी तेची देईन ॥ न करी कदां अनमान ॥ हें द्रव्य ठेवी सांठवून ॥ आम्हीं परतून येतसों ॥ ८८ ॥

पाहूनियां सुंदर कांती ॥ येरी चाकाटली चित्तीं ॥ मस्तक ठेवी चरणावरुती ॥ म्हणे विनंति परिसीजे ॥ ८९ ॥

अलोट असे नेम माझा ॥ तोचि परिसिजे महाराजा ॥ काल द्रव्यार्थ घेतलें वोजा ॥ जाल्यें भाता तयाची ॥ ९० ॥

तरी तो अद्याप देखिला नाहीं ॥ हें द्रव्य मी तो न सेवीं ॥ तयाचा मनोरथ पुरतांही ॥ सेवा तुमची स्वीकारूं ॥ ९१ ॥

ऐसें नेमोत्तर नारीचे जाण ॥ आकर्णून चतुरानन ॥ थकीत जाला निजमन ॥ हे तो कठीण दिसता हे ॥ ९२ ॥

मग तीते बोलतसे वचना ॥ तरी पुरवी तयाची कामना ॥ तोवरी हे द्रव्य ठेवीं साठवून ॥ येऊं परतून मागुती ॥ ९३ ॥

ऐसे तिये देवदूत ॥ गुप्त झाला तत्क्षण ॥ येरी चाकाटली मन ॥ केउती करती विपरीत ॥ ९४ ॥

ऐसे वर्तमान जालेते ठायीं ॥ तंव भाग्योदय झाला पाहीं ॥ नारायण आला लवलाहीं ॥ येरी ठेवीं पायीं मस्तक ॥ ९५ ॥

येरीनें वार्ता निवेदिली सकळ ॥ म्हणे देऊन द्रव्य तात्काळ ॥ गुप्त जाला न लागता वेळ ॥ नेणो खेळ कैसा हा ॥ ९६ ॥

येरु म्हणे बहुत जालें निकें ॥ तरी आतां एक ऐकें ॥ स्नान करूनियां निकें ॥ द्रव्य वाटीं विप्रातें ॥ ९७ ॥

मग बोलेते भामिनी ॥ केउती आचरूं हे करणी ॥ द्रव्य तो दिधलें दोघांनी ॥ न देखों नयनीं एक तो ॥ ९८ ॥

उत्तर देतसे नारायण ॥ तूंतें सांगतों तें करीं कारण ॥ तिनें तात्काळ स्नान करून ॥ विप्रवर्या हांकारिलें ॥ ९९ ॥

मग द्रव्याची भरून झोळी ॥ नेती जाली विप्रमंडळी ॥ येरी राहिलीसे निराळी ॥ नेत्रकमळी अवलोकित ॥ १०० ॥

ऐसा सर्व धनाचा व्यय केला ॥ त्रिरात्र उपोषित ते बाळा ॥ तंव दिनमान अस्तास गेला ॥ समाचार कळला ब्रह्मदेवा ॥ १ ॥

नारदे निवेदिलें समग्र ॥ घाबरला चतुर्वक्र ॥ म्हणे आतां केउता प्रकार ॥ न सुचे विचार कांहीं आतां ॥ २ ॥

ऐसें द्रव्य न्यावें कोठवरी ॥ तीतें आयुष्य तों शतवरी ॥ प्रतिदिनीं आचरतां सुंदरी ॥ दशपत द्यावें लागे पैं ॥ ३ ॥

सांप्रत द्यावें लागे तीनलक्ष ॥ ऐसें वाढतां दिवसोदिवस ॥ गणती वर्षे शतास ॥ तरी द्रव्य नाश कुबेराचा ॥ ४ ॥

ऐसें जाणून अंतरीं ॥ हंस विमान धाडिले झडकरी ॥

म्हणे घेऊन यावी ते सुंदरी ॥ आचरे परी ऐसी हे ॥ ५ ॥

आज्ञा होतां तात्काळीं ॥ विमान उतरले भूतळीं ॥ तात्काळ दिव्यरूप केली ॥ परी विमानी न बैसे ते ॥ ६ ॥

म्हणे सद्गुरु नारायण ॥ न देखतां न येतां जाण ॥ न सेवीं मी विमान ॥ जावे परतून माघारें ॥ ७ ॥

मग विमान करून स्थिर ॥ दूत गेले सत्वर ॥ नमूनियां चतुर्वक्र ॥ समाचार सांगितला ॥ ८ ॥

विना नारायणावांचूनी ॥ विमानी न बैसे भामिनी ॥ मग वदे कमळासनीं ॥ हे ही काहाणी अपूर्व ॥ ९ ॥

नारायणाते ठेवितां ॥ हे ही बरी न दिसे वार्ता ॥ तो ऐसेचि वारंवार करितां ॥ विपरीत वार्ता हो पावे ॥ १० ॥

ऐसे जाणूनि निजमनीं ॥ उभयतां आणिविली ते क्षणीं ॥ वाहूनियां हंसविमानीं ॥ निजवनीं आणिले ॥ ११ ॥

ऐसी ते शतायुषी जारीण ॥ उद्धरिली सद्गुरु वचने ॥ म्हणोनि अनन्य होऊन ॥ जावे शरण सद्गुरूते ॥ १२

॥

परी मुख्य भाव असावा ॥ मग पाविजे देवाधि देवा ॥ म्हणोन सांगतों तुम्हां सर्वा ॥ भावार्थे आचरावा मलमास ॥ १३ ॥

जरीं सर्वी सर्वस्वें दान केलें ॥ तरीं तात्काळ पाविजे फळें ॥ संतुष्ट होऊन गोपाळें ॥ पद अढळ तो पावे ॥ ११४ ॥

स्वस्ति श्रीमलमहात्म ग्रंथ ॥ पद्मपुराणीचे संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ चतुर्विंशततमोऽध्याय गोड हा ॥ २४ ॥

ओव्या ११४ ॥

॥ इति चतुर्विंशतितमोऽध्यायः ॥

----------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय पंचविसावा

श्रीगणेशाय नमः ॥ ऐका भाविकजन सकळ ॥ मलमहात्म अतिरसाळ ॥ श्रवण केलिया तात्काळ ॥ झडे कलिमल निजनिष्ठें ॥ १ ॥

साक्षात लक्ष्मी नारायण ॥ तयाचा संवाद जाण ॥ येर लापनिका नव्हे जाण ॥ करा श्रवण भावार्थ ॥ २ ॥

विष्णुरुवाच ॥ श्रुणु सुश्रोणि वक्ष्यामि फलं यन्मलमासजं ॥ सर्वदा सर्व दानोत्थं फलं प्राप्नोति मानवः ॥ १ ॥

सर्वव्रताधिकोमासः सर्वदानाधिकोमतः ॥ सर्वेषामेवमासानमयमेवाधिकोमतः ॥ २ ॥

स्नानं दानं जपो होमः ॥ स्वाध्यायो हरितोषणं ॥ मलिम्लुचे प्रकर्तव्यमनंतं फलमाप्नुयात् ॥ ३ ॥

स्नानेनाथ व्रतेनाथ दीपदाने नवापुनः पूजनेन तु विप्रस्य तथा गोपूजनेनच ॥ ४ ॥

शुष्कार्द पातक घोरं पापसंघात्समुद्भवं ॥ संप्राप्ते मलमासेतु तत्सर्वयाति भस्मसात् ॥ ५ ॥

श्रीविष्णु साक्षात आपण ॥ लक्ष्मी ते म्हणे ऐक वचन ॥ मलमास परम पावन् ॥ करीं श्रवण शुभानने ॥ ३ ॥

सकळ तीर्थामाजी प्रयाग पूर्ण ॥ किंवा शस्त्रामाजी सुदर्शन ॥ वेदामाजी सामवेद जाण ॥ श्रेष्ठपण तयाते ॥ ४ ॥

व्रतामाजी एकादशी ॥ सप्तपुरीमाजी काशी ॥ उत्तम स्नान गंगेसी ॥ भागिरथीसी जेवी घडे ॥ ५ ॥

पुराणामाजी श्रीभागवत ॥ अर्थामाजी भगवद्गीतार्थ ॥ शास्त्रामाजी वेदांत निश्चित ॥ मासांत मलमास हा ॥ ६ ॥

यामाजी उत्तमोत्तम प्रकारीं ॥ संपूर्ण दानातें जो अंगीकारी ॥ सदा सर्वदा मनोच्छाव स्विकारीं ॥ तरीं जन्मफेरी निवारे ॥ ७ ॥

स्नान दान होम जप ॥ स्वाध्याय ऐसें जें तप ॥ मलमासीं करितां अमुप ॥ तरीं नासे पाप तयाचें ॥ ८ ॥

दीपदानादि विप्रसेवन ॥ भावें कीजे ब्राह्मण संतर्पण ॥ दानवस्तु कीजे दान ॥ तरीं पावे सदन तो माझे ॥ ९ ॥

तयाचे शुष्क अथवा घोर ॥ पातकाचा मी न करीं विचार ॥ भस्म करीं मी समग्र सत्वर ॥ नाहीं उशीर मजलागीं ॥ १० ॥

ऐसें वचन नारायणाचें ॥ आकर्णूनी लक्ष्मी वदे साचें ॥ स्वामिया महिमान याचें ॥ अधिकाधिक ऐकिलें ॥ ११ ॥

लक्ष्मीरुवाच ॥ हे स्वामी जनार्दन सर्वेश ॥ यथाशक्ति आचेरे जो दानास ॥ तरीं इतुकें पुण्य प्राप्त होय त्यास ॥ नवल वचनास वाटतसे ॥ १२ ॥

तरीं स्वाभाविक कवणाला ॥ शक्तिनुसार दानधर्म घडला ॥ कोण पावन कोण उद्धरला ॥ पाहिजे कथिला वृत्तांतु ॥ १३ ॥

ऐकूनि ऐसे उत्तर ॥ बोलता झाला सर्वेश्वर ॥ म्हणे कथानक परिकर ॥ श्रवण करीं शुभानने ॥ १४ ॥

ऐक कमळलक्षणे वरदे ॥ पुरातन इतिहास शुभदे ॥ अरुंधती आणि पार्वती संवादे ॥ सुखप्रद श्रवण करी ॥ १५ ॥

एकदा कैलासाप्रती ॥ जाती जाली अरुंधती सती ॥ नमोनियां पार्वती प्रती ॥ अनुवादा संतोषे ॥ १६ ॥

तंव तो मलमासाचा दिवस ॥ प्राप्त होतां त्या समयास ॥ अरुंधती वदे देवीस ॥ ऐक वचनास माझियां ॥ १७ ॥

तूं तंव जगत्रय जननी ॥ साक्षात आदि भवानी ॥ सदा वससी सन्निधानीं ॥ खट्वांगपाणी वश्य केला ॥ १८ ॥

कवण पुण्याचिया कोटी ॥ पूर्वि आचरलीस गोमटी ॥ ते मज निवेदी हातवटी ॥ बोलतां होटीं लाजे मी ॥ १९ ॥

मी तंव ऋषि भार्या सत्य ॥ तुजलागीं सर्व असावें श्रुत ॥ परि नेणतपणे असे पुसत ॥ न यावें कोपाते मजलागीं ॥ २० ॥

मासपक्ष वर्षे दिन ॥ कोठे नव्हे तुझे आगमन ॥ टाकूनियां कैलास भुवन ॥ कोठे न जासी शुभानने ॥ २१ ॥

वृद्ध भ्रतार सदांचा पाहीं ॥ भस्मोद्धारण सदा देहीं ॥ सुगंध द्रव्याची वार्ता नाहीं ॥ लवथवित गजचर्मे ॥ २२ ॥

उदक प्राशना तुंबिनीफळ ॥ भक्षावया पात्र नरकपाळ ॥ ऐसें असें परि त्रैलोक्य पाळ ॥ म्हणती अचळ अविनाशी ॥ २३ ॥

ऐशी अविनाश काशी ॥ कवण पुण्य जोडलें तयासीं ॥ ते कृपा करूनियां मजसीं ॥ संकलित अर्थासीं वदावें ॥ २४ ॥

ऐकून अरुंधतीचे वचन ॥ देवी करी हास्यवदन ॥ मग

वदती जाली आपण ॥ गौरीरमण तोषकजे ॥ २५ ॥

पार्वत्युवाच ॥ अरुंधति यदा मात्रा एवं स्नेहेनतर्जिता ॥ भर्तुः समीपे वासल्याद्विनोदेनावभाषणात् ॥ ६ ॥

मग वदतसे पार्वती सती ॥ ऐके बाई अरुंधती भर्ता आमुचा भोळा पशुपती ॥ स्नेहे मजप्रती पाळीत ॥ २६ ॥

जेवीं पुत्रालागीं कृपाळू माता ॥ स्नेहवृद्धि प्रतिपाळिता ॥ तेवीं मातें भोळानाथ ॥ कृपा करीत स्नेहभरें ॥ २७ ॥

भ्रतारची कृपा परिपूर्ण ॥ असलिया दुजे नाठवे जाण ॥ माहेर नाठवे तिये लागून ॥ भ्रतार पूर्ण स्नेहाळू ॥ २८ ॥

नानापरी विनोदे रीती ॥ समयीं संतोषवी मजप्रती ॥ हे तंव पूर्वीची रीती ॥ तेही पद्धती वेगळीच ॥ २९ ॥

मी असतां पितृगृहीं ॥ कुमारीदशा प्राप्त देहीं ॥ ऐसें असतां एकेसमयीं ॥ दुर्वास आले भेटीसी ॥ ३० ॥

तपिया माजी शिरोमणी ॥ महाराज तो दुर्वासमुनी ॥ तेणें माझिया पितया लागुनी ॥ निवेदिली काहाणी ते

ऐका ॥ ३१ ॥

मलमास महिमा परिकर ॥ मुनिरावो वदला अपार ॥ तेथेंचि मी होऊन तत्पर ॥ श्रवणरंध्री आकर्णिलें ॥ ३२ ॥

मग तेथेची बसला हेत ॥ मीही आचरें नित्यानित्य ॥ संपूर्ण साधिलेंसे व्रत ॥ पिता करवित उद्यापन ॥ ३३ ॥

तया पुण्यें करूनि जाण ॥ प्रसन्न झाला त्रिनयन ॥ अर्धांगी ठाव देई म्हणोन ॥ वदतां तथास्तु ऐसें म्हणे ॥ ३४ ॥

तोची व्रत प्रभावो फळला ॥ शंकरा ऐसा पति प्राप्त जाला ॥ मलमास महिमा परिकर ॥ न भूतो न भविष्यति ॥ ३५ ॥

ऐसें सांगतां पार्वती ॥ बोलती जाली अरुंधती ॥ म्हणे कृपा करून मजप्रती ॥ व्रत पद्धति निवेदी पैं ॥ ३६ ॥

मी व्रत संपादीन ॥ भावार्थे जाण आचरेन ॥ विनाव्रतें दानाविण ॥ निरर्थक जाण जन्म हा ॥ ३७ ॥

ऐसें बोलतां विनयवाणी ॥ ऋषिभार्या शिरोमणी ॥

मग बोलती जाली भवानी ॥ तेंची श्रवणीं परिसवूं ॥ ३८ ॥

पार्वती म्हणे शुभ कल्याणी ॥ ऐकहो माये साध्वी शिरोमणी ॥ मासामाजी प्रतिदिनी ॥ ऐक अरुंधती सुशीळे ॥ ३९ ॥

द्वादशी संक्रांती पाहीं ॥ त्या विभागिल्या मासाच्या ठायीं ॥ प्रतिमासातें पर्वे सर्वही ॥ पुण्यदेही आचरती ॥ ४० ॥

परी या मलमासाच्या ठायीं ॥ संक्रातिये ठावेचि नाहीं ॥ म्हणोन असकृत पाहीं ॥ म्हणती जाण निश्चयेंसी ॥ ४१ ॥

म्हणोन पर्वकाळ उत्तमोत्तम ॥ येथें कीजे दानधर्म ॥ तेणें योगें पार्वतीरमण ॥ निजधाम वैकुंठीं ॥ ४२ ॥

येथें जे जे जैसें दान कीजे ॥ स्नानविधी आचरिजे ॥ तैसें तैसें फळ पाविजे ॥ सायास न करितां अनायासे ॥ ४३ ॥

ऐसे वाक्य वदतां गौरी ॥ येरी मागुती नमस्कारी ॥ मस्तक ठेवी चरणांवरी ॥ म्हणे कृपा करी स्वामिणीये ॥ ४४ ॥

तरी मलमहिमा अनुपम्य ॥ मज निवेदावा संपूर्ण ॥ तुम्हीं केले व्रत तेही जाण ॥ करावे कथन मजलागी ॥ ४५ ॥

स्वये मी अंगिकारीन ॥ तया व्रतालागीं आचरेन ॥ इतुके देई कृपादान ॥ करीं पावन जननीये ॥ ४६ ॥

ऐकोनि ऐसिया वचनाते ॥ उमा निवेदितसे तियेते ॥ म्हणे ऐकें संपूर्ण व्रतातें ॥ जें मी आचरलें भामिनी ॥ ४७ ॥

तेंची कथित्ये तुजलागूनी ॥ प्रात:काळीं स्नानातें सारुनी ॥ चंद्रमौळीतें नमस्कारुनी ॥ बैसे पूजनीं आदरें ॥ ४८ ॥

षोडशोपचारें पूजा समस्त ॥ साहित्येसी यथास्थित ॥ कांही न्यून पदार्थांत ॥ उणे पडो नेदी सर्वथा ॥ ४९ ॥

मग अश्वात्थातळीं आसन ॥ घालून बैसे निवांत मन ॥ तेथें गौरी पंचकाते स्थापून ॥ करी पूजन यथाविधी ॥ ५० ॥

गौरी पंचक माझिये मातेतें ॥ मज आंदण दिधलेसे तियेने ॥ करीतसे तेची मी पूजन ॥ भाव धरूनी अवधारीं ॥ ५१ ॥

पंचामृत पूजा सोपस्कारी ॥ नित्य पूजिती पंचगौरी ॥ धूपदीप पुष्पे नानापरी ॥ अर्पी निर्धारी पूजनी ॥५२ ॥

सौभाग्यादि वस्त्रे कज्जल ॥ अर्पि दक्षिणेसी फल तांबूल ॥ नैवेद्य षड्रस सुपरिमळ ॥ अर्पी निर्मळ भावार्थे ॥ ५३ ॥

ऐसी पूजा संपूर्ण मासवरी ॥ करितसे जाण मी सुंदरी ॥ मग उद्यापनाते स्वीकारी ॥ तेही परी अवधारी ॥ ५४ ॥

पाचारूनि विप्र पंचकाते ॥ सहदंपत्यासी तयाते ॥ वस्त्र अलंकारादि सहिते ॥ भोजनाते षड्रस ॥ ५५ ॥

ऐसे करितां उद्यापन ॥ विप्रे दिधले आशीर्वचन ॥ अक्षयी सौभाग्य नव्हे खंडण ॥ साधिले पूर्ण व्रतासी ॥ ५६ ॥

ऐसे संपूर्ण मासवरी जाण ॥ मौन्येची एकभुक्त करून ॥ व्रत साधिले संपूर्ण ॥ फलपूर्ण प्राप्त झाले ॥ ५७ ॥

ऐसे व्रत माझिया आनंदाचे ॥ तूंते निवेदिले आजी साचे ॥ जरी आचरसी नेमाचे ॥ फल तयाचे प्राप्त होय ॥ ५८ ॥

हे व्रत करिती ज्या नारी ॥ त्या पुत्र प्रसवती संसारी ॥ अक्षयी सौभाग्याची परी ॥ लाहे संसारी परिसा ते ॥ ५९ ॥

संपूर्ण व्रत प्रभावी ऐसा ॥ अरुंधतीने आकर्णिला सौरसा ॥ नमोनि उमेच्या चरणरजसा ॥ पुसोनि गृहा पातलीसे ॥ ६० ॥

स्वगृहीं जाऊनियां त्वरें ॥ व्रतारंभ करितसे आदरें ॥ पूर्ण होतांच निर्धारिं ॥ अखंड सौभाग्या ते पावली ॥ ६१ ॥

ख्याती जिची त्रिभुवनी ॥ पूजिती जीतें सुरवरमुनी ॥ या व्रताची ऐसी करणी ॥ तुजलागुनी कथियेली ॥ ६२ ॥

ऐसा इतिहास पाहीं ॥ लक्ष्मीप्रती वदे शेषशाई ॥ अरुंधती पार्वती संवाद पाहीं ॥ वदला स्वदेही नारायण ॥ ६३ ॥

तोची कथा भाग आघवा ॥ निवेदिला श्रोतिया सर्वां ॥ भावें करूनी आचरावा ॥ मग पहावा प्रत्ययो ॥ ६४ ॥

ऐसे हें गौरीपंचकव्रत ॥ पूजा करावी नेमस्त ॥ तेणें सौभाग्यवर्धन स्त्रियांस ॥ पावे निश्चित आदरेंसी ॥ ६५

॥

आतां अविश्वास अंतरी ॥ ग्रंथी न धरावा निर्धारी ॥ तेची वर्णु आतां परी ॥ कथा बरी उत्तराध्यायी ॥ ६६ ॥

जे विश्वास न मानिती ग्रंथास ॥ तयाची व्यवस्था कैसी असे ॥ तेचि परिसा सावकाश ॥ पुढती प्रसंगास आदरें ॥ ६७ ॥

जें बोलिला स्वयें नारायण ॥ तेची कथूं श्लोकाधारे करून ॥ म्हणोनि न करावा अनुमान ॥ मानावे वचन दासाचे ॥ ६८ ॥

स्वस्ति श्रीमलमहात्म ग्रंथ ॥ पद्मपुराण सारोद्धार संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ पंचविंशतितमोऽध्याय गोड हा ॥ २५ ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ओव्या ६८ ॥ श्लोक ६ ॥

॥ इति पंचविशतितमोऽध्यायः ॥

---------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय सव्विसावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ जयजयाजी अनाथनाथा ॥ सगुणस्वरूपा कृपावंता ॥ ग्रंथारंभीं प्रार्थितों समर्था ॥ चरणीं माथा भावार्थे ॥ १ ॥

दिननाथ म्हणती कीं तुजला ॥ तरी काय नामातें विसरला ॥ षड्रिपु गांजिती मजला ॥ हें काय तुजला उचीत ॥ २ ॥

आम्ही तव अनाथदीन ॥ गांजिले प्रपंचवेदनेनें ॥ हें तव कौतुक पाहून ॥ लाजिरवाणें लौकिकीं ॥ ३ ॥

माता उपेक्षिना बाळातें ॥ तेवि तूं जगदीश जगातें ॥ उपेक्षिता दीनदासातें ॥ केवि हेतूंतें शोभेल ॥ ४ ॥

हरी तूं नाना अवतार धरिसी ॥ दीनदासातें प्रतिपाळिसीं ॥ तेथें मज दीनातें उपेक्षिसी ॥ केवि मिरविसी थोरीव ॥ ५ ॥

आतां श्रोते सज्जन हो ऐका ॥ चित्त करून एकाग्र देखा ॥ भाव धरूनियां निका ॥ संपूर्ण ऐका ग्रंथ हा ॥ ६ ॥

उपेक्षिता निज मनी ग्रंथ ॥ तरी केवि प्राणियांचा प्रांत ॥ यदर्थी इतिहास श्रीअच्युत ॥ अनुवादत लक्ष्मीये ॥ ७ ॥

तोचि भावार्थ संपूर्ण ॥ श्रोतेहो करा श्रवण ॥ लक्ष्मीते वदलासे नारायण ॥ तेचि श्रवण अवधारा ॥ ८ ॥

अत्र ते कथयिष्यामि कथां पापप्रणाशिनीं ॥ यांश्रुत्वा ब्रह्महास्तेनो मुच्यते योनिसंकटात ॥ १ ॥

लक्ष्मीतें वदे नारायण ॥ जे ऐकती भावें करून ॥ तयांचे पाप होय दहन ॥ संकटी जाण न पडती ते ॥ ९ ॥

ऐसें वाक्य तयाचें पाहे ॥ कोण अभागीं उपेक्षूं लाहे ॥ उपेक्षितां कोण दशा होय ॥ तेचि आयकावी सावकाश ॥ १० ॥

वीरबाहुर्नृपः पूर्वमासीभ्दूमितलेखिले ॥ दातायज्वा सुरूपश्च सुभगोजनवल्लभः ॥ २ ॥

पूर्वी वीरबाहु राजेश्वर ॥ महीमंडळीं कीर्ती अपार ॥ परम धार्मिक अति उदार ॥ दानशूर प्रतापी ॥ ११ ॥

सगुणस्वरूप ऐश्वर्यसंपन्न ॥ सर्वरायामाजी श्रेष्ठमान ॥ आप्तवर्ग प्रजानन ॥ चिंतिती कल्याण रायाचें ॥ १२ ॥

ऐसा भूप सर्वांगुणीमंडित ॥ विवेकी जैसा वसिष्ठ सत्य ॥ सेना जयाची अपरिमित ॥ प्रजा पाळित स्वधर्मेसी

॥ १३ ॥

तयाची भार्या रूपवती सती ॥ नाम जाण यशोमती ॥ उभयतांची अत्यंत प्रीति ॥ असें निश्चिती जाण पां ॥ १४ ॥

यौवनगर्वे नसे गर्विष्ठ ॥ लावण्यामाजी असे श्रेष्ठ ॥ प्रधान रायाचा धर्मिष्ठ ॥ अति निकट स्नेहकाजीं ॥ १५ ॥

राज्यभार चालवी नेटका ॥ धाक ज्याचा सर्वांसी देखा ॥ स्वधर्मेसी अतिविवेका न शिवे देखा पापातें ॥ १६ ॥

तया राजयाचा मंत्री चतुर ॥ तेथें यथा न्यायें चाले राज्य भार ॥ तया देशीं अन्य विचार ॥ न घडे साचार निर्धारिसी ॥ १७ ॥

असो ऐसे असतां जाण ॥ राजपत्नी सर्वगुणेमंडन ॥ स्वरूपजाळें पसरून ॥ आकर्षिला मनमीन रायाचा ॥ १८ ॥

सदासर्वदा विषयासक्त पाही ॥ दानधर्म किंचित नेणें काहीं ॥ वपूभूषणातें सर्वकाळ देहीं ॥ सांवरितसे सायासें ॥ १९ ॥

न दानं न व्रतं वपि न देवार्चनसेवनं ॥
भुंक्तेभोगाननेकांश्च वपुभूषणतत्परः ॥ ३ ॥

ऐसि ते राजभार्या जाण ॥ कदांही न करी धर्मदान ॥ नेणे तीर्थपर्वणी गंगास्नान ॥ करी अमान्य सर्वही ॥ २० ॥

पुरोहित सांगतां त्रासले बहुत ॥ कदांही न करी तो दानव्रत ॥ पहा ही अनकूळ असतां त्वरित ॥ नाहीं हेत धर्मावरी ॥ २१ ॥

तयाते पुत्र असती दोन ॥ सुबाहु शतबाहु नामें जाण ॥ तेही स्वरूपेमंडण ॥ गुणसंपन्न आगळे ॥ २२ ॥

एकदा मलमासाचिये संधी ॥ प्रधान स्त्रीकरून अवधी ॥ म्हणे बहुत दिन न घडे विधी ॥ राजस्त्री दर्शनातें ॥ २३ ॥

म्हणूनि साधूनियां वेळ ॥ प्रधानस्त्री निघे तात्काळ ॥ परम जालीसे उतावेळ ॥ राजस्त्रियेचे दर्शनी ॥ २४ ॥

दर्शनाची धरून लालसा ॥ भेटी पातली ते म्हाळसा ॥ सुंदरपणें तिचिया वयसा ॥ शिबिकेमाजी आरूढे ॥ २५ ॥

दूती जाणविति स्वामिणीतें ॥ प्रधानभार्या पातली दर्शनाते ॥ ऐसी ऐकताची मात ॥ सामोरी येत गजगामिनी ॥ २६ ॥

तियेतें धरून निज हस्तकीं ॥ बैसविती जाली निज मंचकीं ॥ येरी स्वभावें तेजा विलोकी ॥ तंव अपूर्वता देखत ॥ २७ ॥

इंद्रभुवना ऐसें रम्य सदन ॥ रत्नें विखुरलीं चहुकडून ॥ सूर्यप्रभेसमान जाण ॥ शोभे सदन तियेचें ॥ २८ ॥

तेही अलंकारयुक्त घवघवीत ॥ सुस्वरूपें असे नटत ॥ पयोधर सर्वदां उघडी झांकित ॥ अचळ सरसावित वेळोवेळा ॥ २९ ॥

अपार तेथें दासदासी ॥ सदां सादरता सेवेसी ॥ काय बोलेल केधवां वचनासी ॥ न हालें नेत्रासी पातिया ॥ ३० ॥

ऐसे देखून ते प्रधानजाया ॥ मंजुळ वचनें राजभार्या ॥ नमूनि तिचिया पायां ॥ काय बोले आदरासी ॥ ३१ ॥

तंव प्रधान भार्य ते गुणवती ॥ ते काय वदतसे सती ॥ म्हणे ऐके बाई यशोमती ॥ वचनाप्रती मान देई ॥ ३२ ॥

हा तव मलमास अतिउत्तम ॥ प्राप्त जाला केशव पुरुषोत्तम ॥ तरी स्नानदान यथानुक्रम ॥ उभयता संपादूं एकमास ॥ ३३ ॥

अघटित तेथींचे महिमान ॥ मागुता साध्य नव्हे ऐसा दिन ॥ नेणो कवण वेळकाळ कठिण ॥ घडो शके नेणवे तें ॥ ३४ ॥

यालागी राजसे पाहीं ॥ आयुष्य तंव आपुलें नाहीं ॥ यदर्थी आपण उभयतांही ॥ आचरो देहीं व्रतातें ॥ ३५ ॥

सकळ पदार्थ अनुकूळ ॥ दानधर्म करूं सर्वकाळ ॥ सौभाग्यवर्धन होय सकळ ॥ पुत्र आणि कलत्रेसी ॥ ३६ ॥

तव आज्ञे माजी भूपती ॥ वरी धार्मिक तयाची रीती ॥ तो कदांही वारिना तुजप्रती ॥ करिता दान पद्धती यथाक्रमें ॥ ३७ ॥

ऐसें ऐकूनि तिचिया उत्तरा ॥ बोले कांहींते राजदारा ॥ अव्हेरुनी वचनामृत सारा ॥ बोले सुंदर ते ऐका ॥ ३८ ॥

म्हणे ऐकहो गुणवंतीबाई ॥ कैचें दान कैचें व्रत पाहीं ॥

कोण कष्ठवी या देहीं ॥ फळ कायी आचरूनीं ॥ ३९ ॥

आतां आचरावें व्रतातें ॥ तें फळ पुढें प्राप्त होतें ॥ देव देईल म्हणोनि संकल्पातें ॥ आशा अंतरातें धरूनी ॥ ४० ॥

ऐसा आचरावा जरी नेम ॥ तरी कवण जाणे पुढील जन्म ॥ काय वोढवेल नेणो कर्म ॥ पाहुनियां धर्म कोण आला ॥ ४१ ॥

दानधर्म करून सर्व जन ॥ मृत्यु पावले ते नाहीं आले परतुन ॥ नेणों स्वर्गी जाचणी कीं सन्मान ॥ पाहुनिया कोण परतले ॥ ४२ ॥

वृथा कष्टवावें शरीरातें ॥ काय उणें केलें भगवंतें ॥ सर्व अनुकूळ आहे आम्हांते ॥ ऐक निरुते भामिनी ॥ ४३ ॥

धन मागावें श्रीहरी ॥ सर्व संपत्ती अनुकूळ घरीं ॥ पुत्र मागो इच्छा अंतरी ॥ तरी असती निर्धारीं पुत्र दोघे ॥ ४४ ॥

तेही सगुणसंपन्न ॥ सर्वगुणमंडित पूर्ण ॥ वर्तती आमुचे वचनाधीन ॥ न मोडिती वचन कदां ते ॥ ४५ ॥

जेवी शिव आणि भवानी ॥ तेवीं मानिती आम्हां उभयतालागुनी ॥ तयांची मान्यता सर्व जनीं ॥ जयविजय सुरलोकींचे ॥ ४६ ॥

मीही स्वरूपें सुंदर अंगना ॥ रूपाभिमानें न मानी कोणा ॥ माझिया ऐश्वर्यपुढें उणा ॥ इंद्र ठेंगणा मी मानीं ॥ ४७ ॥

सदांसर्वदा मजलागीं ॥ नृप संतोषवि स्वअंगी ॥ प्राण वेंचील वचनालागीं ॥ माझियां नृपेंद्र तो ॥ ४८ ॥

परम प्रीती आम्हां उभयतां ॥ ऐसें ऐश्वर्य मज असतां ॥ तेथें व्रत प्रभावाची वार्ता ॥ काय भगवंता मागावें ॥ ४९ ॥

आतां व्रत आचरावें कोणी ॥ तेंही ऐकपां कहाणी ॥ सदा पीडिलें जे दरिद्रेंकरूनी ॥ व्रत तयानें करावें ॥ ५० ॥

अन्नवस्त्र न मिळें किंचित ॥ पोटीं नाही ज्याचिया संतत ॥ त्यानें करावें पै व्रत ॥ आणीक मात अवधारी ॥ ५१ ॥

व्याधियुक्त असतां शरीरीं ॥ तयानें जपावा हरिहरी ॥ किंवा एकचि पुत्र संसारी ॥ तोही नायके पितयाचें ॥

५२ ॥

सदां सर्वकाळ मातापिता ॥ देखों न शकेची सर्वथा ॥ ऐसीं जेथें असे व्यवस्था ॥ तयानें या व्रता आचरावें ॥ ५३ ॥

व्रत आचरतां संपूर्ण ॥ मनीं हेतु हाचि पूर्ण ॥ व्हावें माझें कल्याण ॥ करावें म्हणोन व्रत हें ॥ ५४ ॥

तरी श्रीहरी कृपेकरून पाही ॥ सर्व अनकूळ मजलागीं बाई ॥ मज नसेची वासना कांही ॥ व्रतप्रभावीं साजणीये ॥ ५५ ॥

ऐसी तिचीया वचनाची हेळणा ॥ करिती जाली नृपांगना ॥ कोणी जावें तीर्थाटणा ॥ कष्ट जाणा शरीरातें ॥ ५६ ॥

अमृता ऐसें तिचें वचन ॥ येरी मानी तृणसमान ॥ जेवीं अमृतकुंभ नेऊन ॥ उकरडां ओती अभागी ॥ ५७ ॥

जेवी एकादिया सद्‌बुद्धि सांगता ॥ तो तंव नायकेची तत्वतां ॥ मग तयातें प्रस्तवा होतां ॥ कुसुकुसी मनामाजी ॥ ५८ ॥

तैसा प्रकार येथें जाला ॥ नायके शिकविल्या बोला ॥

अव्हेरूनि सती गुणवतीला ॥ अपायाला वाट केली ॥ ५९ ॥

असो होणार तें कां सुखें ॥ ऐसें मानुनिया निकें ॥ आज्ञा घेऊन तात्काळीकें ॥ गुणवती गृहातें पातली ॥ ६० ॥

तंव ते गुणवती प्रधानकामिनी ॥ आरंभिती जाली व्रता लागुनी ॥ यथापूर्वक भावार्थ मनीं ॥ चक्रपाणी आराधितसे ॥ ६१ ॥

येरीकडे यशोमती सती ॥ भोगसमयीं येतां नृपती ॥ अवघा समाचार तयाप्रती ॥ जाली सांगती आदरेंसी ॥ ६२ ॥

नृपें उत्तर न देतां तयेला ॥ संपादित झाला भोगवळा ॥ तंव अपूर्व जालीसे लीळा ॥ ते सकळांलागीं परिसवूं ॥ ६३ ॥

कठोर शब्द न साहवे मानवियां ते ॥ मग तो तव साक्षांत अनंत ॥ जाणें सर्वांचे ह्रद्गत ॥ दूषण वृथा ठेविलेंस ॥ ६४ ॥

म्हणोनि कोपला नारायण ॥ ज्वर प्राप्त झाला न लागतां क्षण ॥ राजभार्या अत्यंत व्याकुळ जाण ॥

शांत नव्हे जाण ज्वर पैं ॥ ६५ ॥

अत्यंत भूतज्वर आंगीं ॥ प्राण जाऊं पाहे लगबगी ॥ वार्ता फांकतांची जगी ॥ नृप वेगी पातला ॥ ६६ ॥

पुत्र ही धाविन्नलें वेगें ॥ सन्निध पातले निजांगें ॥ दास दासी अपार वेगें ॥ पातलें वेगें त्या ठायी ॥ ६७ ॥

बहुतांपरी उपचार ॥ करविता जाला नृपवर ॥ औषधी देतां नव्हे बरें ॥ अधिकाधिक व्यथा जाची ॥ ६८ ॥

घाबरे जाले नगरवासी ॥ उरस्फोट नृपवरासी ॥ रुदित शब्द न फुटे पुत्रासी ॥ दासदासी आकांत ॥ ६९ ॥

तंव तो मंडन प्रधान पाहीं ॥ स्त्रीसहीत धांवत आला, लाहीं ॥ तंव तेथें दुःखाते पारच नाही ॥ समजावित नाही कोणी कोणा ॥ ७० ॥

शांतवितां मंडन प्रधान ॥ उगे न राहती नृपनंदन ॥ राजयाचे अश्रुपूर्ण ॥ देखे प्रधान निजनयनी ॥ ७१ ॥

करपल्लवे समस्तातें ॥ प्रधानें शांत केले तेथें ॥ तंव गुणवती प्रधानभार्या ते ॥ अंतरगृहातें पातली ॥ ७२ ॥

निवारून सकळ स्त्रियांचा मेळा ॥ आपण पातली यशोमतीजवळा ॥ निवारुनि सकळ दुःखकल्लोळा ॥

उपचार केला बहु तेणें ॥ ७३ ॥

तितुकियामाजी काय झालें ॥ राजयोषितेने अवलोकिले ॥ तव गुणवतीचे मुख चांगले ॥ सुशोभित देखिले निजनयनी ॥ ७४ ॥

हरिद्रकुंकुम लेत वदनी ॥ माथा शेंदुरसुशोभिनी ॥ अंजन घालूनिया नयनीं ॥ देखे भामिनी रायाची ॥ ७५ ॥

मुखी तांबूल असे रंगला ॥ अलंकारेमंडित ते अबळा ॥ देखती जाली राजवेल्हाळा ॥ देखूनि कपाळा आठी घाली ॥ ७६ ॥

मग बोले राजयोषिता ॥ कोण काळ श्रृंगारकरिता ॥ सकळिका शोक अवस्था ॥ श्रृंगारिया लज्जा नसे ॥ ७७ ॥

तरी उठे आता येथूनी ॥ जाई आपुल्या सदनी ॥ आली श्रृंगार सावरुनी ॥ दर्शनालागुनी माझिया ॥ ७८ ॥

ऐसे वदता तियेते ॥ येरिचे काय चाले तेथे ॥ स्वामिये निखादितां सेवकाते ॥ न चाले तेथे दुजियाचे ॥ ७९ ॥

राजा कोपला प्रजा ते पाही ॥ सर्व संपत्ति लुटिता होई

॥ तेथे दुजियाचा उपाय नाही ॥ तैसीच नवाईही दिसे ॥ ८० ॥

असो कोपारूढ राजजाया ॥ देखून उठली प्रधानभार्या स्वगृहा पातली लवलाह्या ॥ सखेदयुक्त अंतरी ॥ ८१ ॥

येरीकडे नृपसुंदरी ॥ भ्रूसंकेते ते अवसरी ॥ नृपालागी अत्यादरी ॥ पाचारी जवळीके ॥ ८२ ॥

म्हणे काही पाहिले कौतुक ॥ येरु म्हणे नाही देखिले सम्यक ॥ ती म्हणे तुम्ही भोळे भाविक ॥ नेणा कौतुक स्त्रियांचे ॥ ८३ ॥

मज प्राप्त झाले हे दुःख ॥ तुम्ही सकळ करितसा शोक ॥ प्रधानस्त्री गुणवती देख ॥ आली निःशंक श्रृंगारुनी ॥ ८४ ॥

काही दुःख न वाटे तिचे मनी ॥ विपरीत मनामाजी करणी ॥ म्हणोन आली श्रृंगारुनी ॥ लज्जा मनी न वाटे ॥ ८५ ॥

ती सेवक मी स्वामिणी ॥ हा भाव नसे तिचे मनी ॥ ऐसी ती सेवकाची करणी ॥ नायको कानी स्वामिया ॥ ८६ ॥

ऐसें बोलविले नृपांतरा ॥ दूर त्यजीते राजसुंदरा ॥ ऐकून कांतेच्या उत्तरा ॥ जाला संचार क्रोधाते ॥ ८७ ॥

परम अविवेकी तो भूपती ॥ ऐकून स्त्रियांची वचनोक्ती ॥ अनुसरला अक्रिय गती ॥ तेची पद्धती अवधारा ॥ ८८ ॥

जो स्त्रीबुद्धीते लागला ॥ तो सर्वीसर्वस्वे बुडाला ॥ तो अपायी पडे भला ॥ संशय याला नसेची ॥ ८९ ॥

तव राये क्रोधेकरून ॥ प्रधान कर्षिला तो मंडण ॥ पायी शृंखळा दृढ घालून ॥ गृह लुटून पै नेले ॥ ९० ॥

तयाची सकळ संपत्ति ॥ आणविता जाला भूपती ॥ प्रधान दंडिला हे ख्याती ॥ नगरामाजी प्रगटली ॥ ९१ ॥

पहा प्रभूचे कैसे विंदान ॥ चाले जो सत्क्रियेकरून ॥ तयावरी अपाय कोसळती जाण ॥ परी धैर्य ठाण न सोडावे ॥ ९२ ॥

गुणवती आचरता व्रत बरवे ॥ प्रधान कर्षून ठेविला राये ॥ परी डगमगेना तिचे ह्रदय ॥ न सोडी सोय व्रताची ॥ ९३ ॥

गृहीचे नेले सर्व धन ॥ परी न कंटाळे तिचे मन ॥ म्हणे व्रत न होता पूर्ण ॥ केवी टाकू मध्यंतरी ॥ ९४ ॥

व्रत आचरे सायासी ॥ वृत्तांत कळला रायासी ॥ मग बोलावू पाठविली दासी ॥ पतिव्रते सन्निध ॥ ९५ ॥

नृप जो पाहे विलोकुनी ॥ तंव अलंकारयुक्त कामिनी ॥ कुंकुमयुक्त शोभित वदनी ॥ नृपै मनी जाणिलें ॥ ९६ ॥

म्हणे कांता बोलिली सत्य ॥ सांप्रत नव्हे असत्य ॥ ही तंव जाया सुशोभित ॥ नव्हे दुःख कालत्रयी ॥ ९७ ॥

मग क्रोधयुक्त होऊन पाहीं ॥ तियेतें ठेविलें कारागृहीं ॥ उभयतां तें एकचि ठायी ॥ ठेविलें असे निर्धार ॥ ९८ ॥

परी तेथेंही न सोडी व्रता ॥ नित्य आचरे प्रधानकांता ॥ तंव एके दिनीं प्रधानतत्वता ॥ जाला बोलतां स्त्रियेतें ॥ ९९ ॥

म्हणे आपण उभयतां कारागृही ॥ कवण दुःख अवस्थादेही ॥ व्रत आठवलें कैचें कायी ॥ अपरूप नवाई देखों ॥ १०० ॥

मंडण उवाच ॥ न जाने कर्मण: कस्य
विपाकोयमुपस्थितः ॥ गुणवत्युवाच ॥
देवसेवककवर्गस्य स्वाम्यायत्तं च जीवितं ॥ ४ ॥

तंव वदे तेव्हां गुणवती ॥ बोलतसे पतीप्रती ॥ हे नाथ
जाणत जाणतवृत्ती ॥ केवि निरुती करितसां ॥ १ ॥

आपुला तो सेवक धर्म ॥ तो आपण ये साधिला नेम ॥
नेणो अव कर्माकर्म ॥ हें पुरुषोत्तम सर्व जाणे ॥ २ ॥

मग बोले प्रधान मंडन ॥ हे तो माझी कर्मरेषा पूर्ण ॥
पायी जाल्या श्रृंखळाबंधन ॥ उभयतां आपण दुःख
भोगूं ॥ ३ ॥

मजकरितां तूंतें पाही ॥ दु:ख होतसे ह्रदयी ॥ येरी
उत्तर देतेसमयीं शेषशायी निवारिता ॥ ४ ॥

विष्णुर्विश्वंभराभारधरणैकधुरंधरः ॥ श्रीधरः परमेशानः
सर्व दु:खनिकृंतनः ॥ ५ ॥

म्हणे हे नाथ चूडामणी ॥ चिंता न कीजे निजमनी ॥
विश्वंभर चक्रपाणी ॥ आधार त्रिभुवनीं जयाचा ॥ ५ ॥

तयाची हे सर्वसत्ता ॥ त्रैलोक्य प्रतिपालिता ॥ जाणे
सर्वांचे मनोगता ॥ हिताहिता सर्वही ॥ ६ ॥

तरी दृढ भाव तयाचे पायीं ॥ निवांत राहावेम ह्रदयीं ॥ आठवूनियां शेषशायी ॥ तोची सर्व निवारिल ॥ ७ ॥

ऐसें सतीचें नेमवचन ॥ ऐकून स्वस्थ राहे प्रधान ॥ येरी भावार्थ मनी धरून ॥ करी संपूर्ण व्रतपैं ॥ ॥ ८ ॥

होतां व्रताची संपूर्णता ॥ मग मज आठवूं जाला तत्वतां ॥ उणे येऊं पाहा पैं आतां ॥ न करिती व्रता कोणीही ॥ ९ ॥

ऐसें जाणून अंतरी ॥ स्वप्नीं जागृत केला नृपकेसरी ॥ तयातें बोलता जाला वैखरी ॥ अवधारीं सुंदरी तेची तूं ॥ १० ॥

स्वप्नामाजी रायातें पाही ॥ जागृत केलें ते समयीं ॥ मूर्खा सावध आतां होई ॥ बोलतों काई ते ऐक ॥ ११ ॥

विनाअपराधें तत्वतां ॥ कारागृहीं राखिले उभयतां ॥ प्रधान आणि त्याची कांता ॥ तरी अन्याय कोणता तयांचा ॥ १२ ॥

ते गुणवंती परम सज्ञान ॥ ते प्रबोधी यशमतीलागून ॥ मलमास व्रताचर्ण ॥ आचरूं जाण उभयतां ॥ १३ ॥

तें न आणितां निजमनीं ॥ केली व्रताची हेळणी ॥ तयायोगें ज्वर अद्भुत सदनीं ॥ कष्टी होत तव जाया ॥ १४ ॥

गुणवती भावार्थेकरून ॥ व्रत करिती जाली आपण ॥ भेटीस येता तुझिया कांतेनें ॥ विपरीत मनीं भावलें ॥ १५ ॥

ते तंव सदैव सुवासिनी ॥ संभ्रमें भरित सौभाग्यखाणी ॥ कज्जकुंकुमातें स्वीकारूनी ॥ पातली सदनीं तुझिया ॥ १६ ॥

तें तंव देखता मनीं ॥ क्षोभ पावली कामिनी ॥ तूंतें भासवून विपरीत करणीं ॥ घातलें बंधनीं उभयतां ॥ १७ ॥

तरीं तेथें अन्याय केउता ॥ तुवां विचार न करितां नृपनाथा ॥ गृह लुटून तत्वतां ॥ बंदी उभयतां कारागृहीं ॥ १८ ॥

ते गुणवती सुशीळा ॥ पुण्यलेश तियेतें घडला ॥ तरी मुक्त करीं उभयताला ॥ देऊनि धनाला सर्वही ॥ १९ ॥

इतुकें करीं सत्वर आतां ॥ सन्मानें बोळवीं उभयतां ॥

हें जरी न करिसी नृपनाथा ॥ तरीं आत्मघाता पावशील ॥ २० ॥

ऐसें स्वप्नीं सांगोन शेषशायी ॥ गुप्त जाले ठायींचे ठायीं ॥ रावो जागृत होता ह्रदयीं ॥ मानी नवाईअद्भुत ॥ २१ ॥

मग घाबरेपणें ते वेळीं ॥ स्वप्न सांगे स्त्रियेजवळी ॥ ऐकतां ते ही चाकाटली ॥ अंतरीं कळली निज खूण ॥ २२ ॥

मग म्हणे जी नृपनाथा ॥ तयातें सत्वर मुक्त करा आतां ॥ नाहींतरी बरी न दिसें व्यवस्था ॥ होईल घाता आपुलिया ॥ २३ ॥

ऐसें ऐकतांचि वचन ॥ दचकलें रायाचें मन ॥ मग तैसाच बंदिशाळे येऊन ॥ उभयतांलागून नमियेले ॥ २४ ॥

श्रृंखळाबंधनीं मुक्त केला ॥ कांतेसहि गौरविला ॥ नूतन वस्त्रें देता जाला ॥ कारभार वोपिला मागुती ॥ २५ ॥

वस्तुजात सर्वही तयाचें ॥ तेंही अर्पण केलें साचें ॥ बोलूनियां नम्र वाचें ॥ सर्वस्वातें क्षमा मागें ॥ २६ ॥

गुणवती सती परममंगळा ॥ राव नमस्कारी वेळोवेळा ॥ रावभाजेतेही आराम वाटला ॥ परी कंठ दाटला सद्दीत ॥ २७ ॥

मौन्येंची नमस्कारिली सती ॥ कांहीं न बोलवेंची पुढती ॥ करीं अपराधाची शांती ॥ नवलरीति अनुपम्य ॥ २८ ॥

ऐसें मलमास व्रता ॥ मग त्या आचरती उभयतां सकळ सौभाग्यसरिता ॥ जाली प्राप्तता तयातें ॥ २९ ॥

मग नागरिकवासी सकळ ॥ व्रत करिते जाले अचळ ॥ तयेनगरीं काळवेळ ॥ नोहे दुष्काळ कदांही ॥ ३० ॥

ऐसें हें मलमाहात्म्यआख्यान ॥ अव्हेरितां काय जालें कथन ॥ तेंची तूंतें केलें निवेदन ॥ सत्य जाण भामिनिये ॥ ३१ ॥

तोची अर्थांतरबरवा ॥ श्रोतियतें निवेदिला आघवा ॥ न घडे तरीं न हेळसावा ॥ प्रत्ययो घ्यावा श्लोकांतरीं ॥ ३२ ॥

इतिश्रीमलमाहात्म्यग्रंथ ॥ पद्मपुराणीचें संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ षड्विंशतितमोऽध्याय गोड हा

॥ २६ ॥ ओव्या १३२ ॥ श्लोक ५ ॥

॥ इति षड्विंशतितमोऽध्यायः ॥

----------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय सत्ताविसावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरूभ्यो नमः ॥ जयजयमाते आदिजननी ॥ त्रिपुरसुंदरी त्रैलोक्यपावनी ॥ सर्वदुःखदरिद्रशमनी ॥ विघ्नहरणी महामाये ॥ १ ॥

तुझिया कृपाकटाक्षें जाण ॥ पांगुळ पवनाहूनी करी गमन ॥ मुका तोची वाचाळ होय जाण ॥ कृपेकरून तुझिया ॥ २ ॥

ऐका श्रोते एकाग्रचित्त ॥ मलमहिमा अति अद्भूत ॥ लक्ष्मीतें नारायण सांगत ॥ तोचि संकलितार्थ निवेदूं ॥ ३ ॥

श्रीउवाच ॥ समानफलदादेव सर्वेमस्मलिम्लुचाः ॥ विशेषोत्तर कथं कस्य तदेतद् वदमे प्रभो ॥ १ ॥

लक्ष्मी वदे हो देवादिदेवा ॥ कृपासागरा करुणार्णवा ॥

समान फल व्रत प्रभावा ॥ कैसे निदेवा लाहिजे ॥ ४ ॥

विषद कीजे जी पुरुषोत्तमा ॥ तेणें आचरतां कर्माकर्मा
प्राणी पवती मोक्षधामा ॥ होय अधमा उपरती ॥ ५ ॥

ऐसा शब्द रमेचा ऐकून ॥ बोलता जाला नारायण ॥
तोची श्लोकाधार पूर्ण ॥ करा श्रवणहो ॥ ६ ॥

नारायण उवाच ॥ समानफलदा
देवीसर्वेमासाधिमासका: ॥ विशेषफलदाह्येते
माघवैशाखकार्तिकाः ॥ २ ॥

ऐका सुंदरीये पाहीं ॥ समान फळ सर्वही ॥ परी
उत्तमोत्तमही ॥ प्रकार वेगळा पै ॥ ७ ॥

विशेष महिमा जाण ॥ पूर्णिमा म्हणजे तीन ॥ माघी
वैशाखी कार्तिकी जाण ॥ विशेषहून मलमासीं ॥ ८ ॥

येथें कीजे स्नानदानविधी ॥ विप्रभोजन यथाविधी ॥
होमहवन जपसिद्धि ॥ तरी सर्वसिद्धि तो पावे ॥ ९ ॥

भावे करावे विप्रपूजन ॥ मग यथाशक्त्या दीजे दान ॥
त्रयत्रीणि दशक अपूप अन्न ॥ घृतासहित अर्पावें ॥ १०
॥

याहीवरी जें दान निवेदिले ॥ ते तें पाहिजे प्रत्यही केलें

॥ ऐसें जरी न घडे एक वेळे ॥ पाहिजे केलें पूर्णिमेसी ॥ ११ ॥

मग संपूर्ण मास संपादित व्रत ॥ उद्यापन कीजे यथास्थित ॥ तै संपूर्ण फल होय प्राप्त ॥ जाण सत्य वरानने ॥ १२ ॥

संपूर्ण फलसमानता ॥ प्राप्त होय कैसेनि आतां ॥ तरीं यदर्थी ऐकें तत्वतां ॥ इतिहास शुभानने ॥ १३ ॥

पूर्वी कृत युगाच्या ठायीं ॥ अपूर्व जालीं एक नवाई ॥ तेची श्रवण करवूं ये समयीं ॥ तुज पायीं वरानने ॥ १४ ॥

सुशर्मानामें नृपवर ॥ असे भूपती राज्यधर ॥ धर्मपारंगत अतितत्पर ॥ दानशूर प्रतापि ॥ १५ ॥

सर्वधर्मीं पारंगत पाहीं ॥ हरिभजनीं झिजे देहीं ॥ कथापुराणें कालकर्मीं सर्वही ॥ नीतिन्यायें चालवी राजधर्म ॥ १६ ॥

सत्पात्रीं विन्मुख नव्हे कदां ॥ कधींही न प्रवर्ते वादविवादा ॥ हरिस्मरणीं रत सदा ॥ विप्रसेवा आदरेसी ॥ १७ ॥

भार्या तयाची सुंदर पतिव्रता ॥ सुष्टमती नामें तत्वता ॥ परम प्रीति उभयतां ॥ सदां सादरता पतिसेवे ॥ १८ ॥

तंव पातला मलमास ॥ उभयतां आचरती व्रतास ॥ विप्रभोजनीं अतिहव्यास ॥ दिवसेंदिवस वृद्धिंगत ॥ १९ ॥

दानधर्म नित्य करिती ॥ उणें न पावे कवणे रिती ॥ प्रातःस्नाने उभयता सारिती ॥ आणि मौन्यें सारिती नक्तातें ॥ २० ॥

ऐसें व्रत शास्त्राधारें ॥ आचरती उभयतां वधुवरे ॥ तंव अंगिराऋषी तपी थोरे ॥ राजदर्शना पातला ॥ २१ ॥

दृष्टीं देखतां तपोराशी ॥ उल्हास परम नृपासी ॥ देऊनिया निज आसनासी ॥ भूतळवटासी बैसे राव ॥ २२ ॥

मग आणूनि पूजा प्रकार ॥ उभयतां पूजिते जाले मुनेश्वर ॥ परम हर्षे निर्भर नृपवर ॥ करी सोपस्कार पूजेचा ॥ २३ ॥

ऐसी पूजा करितां तेच क्षणीं ॥ वस्त्रे अलंकारें अर्चिला मुनी ॥ परमहर्षयुक्त अंगिरामुनि ॥ आतिथ्य पाहुनी नृपाचें ॥ २४ ॥

मग बोलता जाला मुनि ॥ भावा आगळा देखिला भूपती ॥ व्रत आचरतां उभयतीं ॥ जाला मातें आनंदु ॥ २५ ॥

उत्तमासनीं बैसविलें आम्हां ॥ भूमीशाई तूं नृपोत्तमा ॥ तुज ऐसा धार्मिक महात्मा ॥ न देखिला अद्यापि ॥ २६ ॥

विप्रातें दिधले अग्रहार ॥ वापीकूप सरोवरें अपार ॥ कीर्ति तुझी नृपवरा थोर ॥ भूधरा आगळी ॥ २७ ॥

ऐसी स्तुतिवादें मुनीची ॥ प्रशंसा ऐकता नृपाची ॥ उद्विग्नता नाही गेली मनाची ॥ बोले काही नृपवर ॥ २८ ॥

तव दर्शनें धन्य जालों आजी ॥ सकळ तीर्थे तव चरणसरोजीं ॥ भाग्यातें पार नाहीं आजी ॥ कृतकृत्य सहजी मज केले ॥ २९ ॥

द्विजसेवे ऐसें नाही देख ॥ साधन दुजें नाहीं आणीक ॥ सदां सेवावें चरणोदक ॥ पावन होती सर्वही ॥ ३० ॥

तुमचिया आशीर्वादे करून ॥ सकळ संपत्ती लाधली पूर्ण ॥ ऐसें तुमचें महिमान ॥ केले पावन मजलागीं ॥

३१ ॥

न पाचारितां आलेति ॥ अवलोकिली सकळसंपत्ति ॥ पुत्रकलत्रादी युवती ॥ मानीं तृप्ति मी सर्व तेणें ॥ ३२ ॥

ऐसा स्तुतिवाद एकमेकांतें ॥ वाक्पुष्पें संतोषविती तेथें ॥ तवं बोलतां जाला नृपनाथ ॥ मुनिवरातें ते काळी ॥ ३३ ॥

म्हणे स्वामिया ऐकावें ॥ जे आश्चर्ये देखिलें स्वभावें ॥ तेंची कथितों सुशोभनाभावें ॥ तथास्तु या भावें बोलें मुनी ॥ ३४ ॥

आम्ही उभयता आचरूं व्रतास ॥ मलमाहात्म्य हें निर्दोष ॥ अपूर्व एक देखिलें असे ॥ तेची परियेसीं मुनिराया ॥ ३५ ॥

अधिमासेपुरा वैश्यो नाम्ना वीर इति श्रुतः ॥ कुमार्गनिरतोनित्यं सर्वलोकहितेरतः ॥ ३ ॥

माझिया नगरामाजी एक ॥ वैश्य नांदतसे देख ॥ वीर ऐसें तयाचें नामांक ॥ परम हिंसक चांडाळ तो ॥ ३६ ॥

चौरकर्म करूनि जाण ॥ पश्वादी आणि गोधन ॥
तयाचा विक्रय करून तेणें ॥ धनही हरित विप्राचें ॥
३७ ॥

जीवमात्रांचा वध करी ॥ प्राणियातें जीवें मारी ॥
वेश्यारत अहोरात्रीं ॥ ऐसा दुराचारी कृतघ्न ॥ ३८ ॥

निष्ठुर भाषणी अनृत वचनी ॥ पापाचे भय न धरी मनी
॥ ऐसा तो वर्तत असतां जनीं ॥ जाली परी ते ऐका ॥
३९ ॥

ऐसा तो परम कृतघ्न ॥ स्त्रीसहित सेविलें अरण्य ॥
सकुटुंबेसी हिंसाधर्म आचरून ॥ उदरपोषण चालविती
॥ ४० ॥

सदां मार्ग रोधूनि जाण ॥ हरितसे पांथस्थाचें धन ॥
वस्त्रें आणीक प्रावर्ण ॥ हरून नग्न सोडितसे ॥ ४१ ॥

ऐसें असतां एके अवसरीं ॥ तृषाक्रांत वीर अंतरी ॥
उदक धुंडिता हिंसाकरी ॥ तंव देखिलें नेत्री अपूर्व ॥
४२ ॥

एक देवालय अतिजीर्ण ॥ श्रीविष्णुदैवत असे जाण ॥
देखतां जाला दुरून ॥ हर्षयुक्त निज मनीं ॥ ४३ ॥

सभोंवते वृक्ष घनदाट ॥ केळीनारळी आचट ॥ आंब्र निंबोनि आणि कवठ ॥ देखता थाट मन भुले ॥ ४४ ॥

नाना पुष्पांचिया जाती ॥ तेथें बिल्वादि वृक्ष शोभती ॥ जाई जुई आणि मालती ॥ केतकी डोलती फुलभारें ॥ ४५ ॥

येथें चातकें मयोरे बदक ॥ चक्रवाकादी कोकिळांक ॥ नाना जातीचे पक्षी अनेक ॥ विचरती देखते ठायीं ॥ ४६ ॥

ऐसे अपूर्व रम्य स्थान ॥ सरोवरीं उदक अमृतसमान ॥ वीरेश्वरें नयनीं देखून ॥ गेला धांवून सरोवरतीरा ॥ ४७ ॥

कांतेसहीत जलपान करूनी ॥ क्षण एक विश्रांती पावला ते स्थानीं ॥ तो तेथें आमुची राजपत्नी ॥ दर्शना लागुनि गेलीसे ॥ ४८ ॥

करूनियां देवदर्शन ॥ नयनीं सभोवतें निरखितसे वन ॥ तंव तेथें स्त्रीपुरुष दोघेजण ॥ बैसले श्रमोन एकांती ॥ ४९ ॥

तंव ते वीरबाहूची भार्या ॥ येऊन लागतसे पायां ॥ स्वदुःखवार्ता निवेदुनियां ॥ रुदित शब्दें करूनी ॥ ५०

॥

म्हणे बाई जन्मवरी ॥ भ्रताराचें सौख्य नाही तिळभरी ॥ हा तंव कृतघ्न दुराचारी ॥ परम हत्यारी निर्दय ॥ ५१ ॥

याचिया संगती करून ॥ नेणें कांहीं पुण्याचरण ॥ दान तप न घडे जाण ॥ पापाचेन सर्वदां ॥ ५२ ॥

नेणों जन्मपंक्ती अनंत ॥ नेणों सार्थक न घडे देहान्त ॥ पुढें यमयातना बहुत ॥ न दिसे प्रांत मज कांहीं ॥ ५३ ॥

ऐसी नाना परी करुणा ॥ भाकिती जाली वीर अंगना ॥ कृपेनें द्रवली ते शुभानना ॥ राजांगना ते वेळीं ॥ ५४ ॥

मग उठोनियां लवलाहीं ॥ नृपाचरणीं ठेविली डोई ॥ म्हणे महाराजा विनंती परिसावी ॥ ही उभयतां अतिदु:खी ॥ ५५ ॥

तरी यातें कवण उपावो ॥ स्वामी कृपा करूनि निवेदाहो ॥ अतिउत्तम नरदेह पाहाहो ॥ केवी गती पुढारी पैं ॥ ५६ ॥

पूर्वकर्माद्भुत हे दोघे ॥ हिंसाधर्म आचरती आंगें ॥ पुण्यसंस्कार आंगीं न लागे ॥ तरीं तरती वेगें कैसेनी ॥ ५७ ॥

यातें पाहूनि ह्रदयीं ॥ दया उपजली माझे जीवीं ॥ तरीं कृपाकरूनीं उपदेशावी ॥ पावे पदवी सायुज्यता ॥ ५८ ॥

ऐकून उभयतांचे वचन ॥ मग मी उभयतांते आश्वासन ॥ फळें भक्षविलीं तया लागून ॥ उपाय जाण सांगितला ॥ ५९ ॥

सहज रीती बोलिलों त्यातें ॥ प्राप्त जाल्या मलमासातें ॥ तरीं सांगतो जें तुम्हांतें ॥ धरा मानसीं निर्धारें ॥ ६० ॥

अंतकालेच संप्राप्ते यन्नामविवशोगृणेन ॥ प्रयाति विष्णुसालोक्यं ॥ पूर्व पुण्यप्रभावतः ॥ ४ ॥

अंतकाळीं जयातें घडे विष्णु स्मरण ॥ तयानें अन्य सेवा न लगे करणें ॥ पापी हो कां सज्ञान-अज्ञान ॥ जाय उद्धरून तात्काळी ॥ ६१ ॥

तरीं तुम्हीं उभयतां स्त्री-पुरुष ॥ मनीं धरूनीं हव्यास ॥

नित्यानित्य विशेषाविशेष ॥ नामघोष पैं करावा ॥ ६२ ॥

नित्य प्रातःकाळीं उठोन ॥ देउळीं कीजे सडासंमार्जन ॥ नंतर सरोवरीं स्नान करून ॥ करा भजन आदरें ॥ ६३ ॥

ऐसें तयातें स्वयें निवेदिलें ॥ तथास्तु म्हणोन तेंही वंदिलें ॥ मग आचारूं लागले ॥ तैसेंची उभयतां ॥ ६४ ॥

नित्य सडासंमार्जन करिती ॥ सरोवरीं स्नानें सारिती ॥ अष्टौप्रहर भजन करिती ॥ न सोडिती दिनरजनीं ॥ ६५ ॥

नित्य होता माध्यानकाळ ॥ मेळवूनि आणिता ती फळें ॥ देवातें अर्पूनि सकळ ॥ शेष भक्षिती उभयतां ॥ ६६ ॥

ऐसें क्रमितां भावार्थे ॥ स्वामिया नवल वर्तलें तेथें ॥ कृपाळू जाला रमानाथ ॥ परम भावार्थ जाणुनी ॥ ६७ ॥

मलमास होता संपूर्ण ॥ तंववरी केले आचरण ॥ प्राप्त झाला शेवटील दिन ॥ जालें विंदान तें ऐका ॥ ६८ ॥

सहजीं जालें प्रातःस्नान ॥ सर्वही पर्वणी साधिली तेणें ॥ व्यतीपात पूर्णिमा जाण ॥ द्वादशी अमावास्या ते ॥ ६९ ॥

कवण पर्वणी कवणें ठायीं ॥ हे तों तयातें ठाउकेंची नाहीं ॥ परी कृपाळू तो शेषशाई ॥ केली नवाई ते ऐका ॥ ७० ॥

सहजी घडले तया उपोषण ॥ करितां वनफळातें भक्षण ॥ जिव्हा रंगली नामेंकरून ॥ जाहलें दहन पापाचें ॥ ७१ ॥

सप्तजन्मांचे गेले पाप ॥ तंव विमान उतरलें आपोआप ॥ करून उभयतां दिव्यरूप ॥ निजस्वरूपी ठेविलें ॥ ७२ ॥

येवढें नाममहिमान आगळें ॥ महापापिये उद्धरिलें ॥ स्वनयनीं आम्ही देखिलें ॥ म्हणोन कथिलें स्वामिया ॥ ७३ ॥

ऐसे इतिहासालागून ॥ अंगिराऋषी तें कथी नृपनंदन ॥ ऋषी वदे पाहिजे भावपूर्ण ॥ तेणें नारायण कृपा करी ॥ ७४ ॥

पुनः रायें ऋषी अर्चिला ॥ नमस्कारोनि बोळविला ॥

रायें संपादोन व्रताला ॥ केलें उद्यापनाला विधिनें ॥ ७५ ॥

मग तो पत्नीसहित भूप ॥ विष्णुलोकीं राहिला सुखरूप ॥ इतिहास हा अपरूप ॥ स्वयें निवेदी नारायण ॥ ७६ ॥

लभते भगवद्भक्तिं भुक्तिमुक्तिप्रदायिनीं ॥ मुहूर्ते वा मुहूर्तार्धंयस्तिठेद्धरिमंदिरे ॥ ५ ॥

ऐसी भगवद्भक्ति करितां ॥ विष्णुलोका पावलीं उभयतां ॥ यालागीं मुहूर्त अथवा अर्धमुहूर्ता ॥ ह्रदयीं अनंता आठविजे ॥ ७७ ॥

पाहातो वीर आणि पत्नी ॥ काय साधन केलें तयांनी ॥ सहजीं सहज संमार्जनीं ॥ नेलें उद्धरोनीं भगवंतें ॥ ७८ ॥

यालागीं भावार्थे करून ॥ वश्य राहो जनार्दन ॥ चुकेल तुमची यमयातना ॥ सत्य माना वचनातें ॥ ७९ ॥

ऐसा संवाद लक्ष्मीनारायणीं ॥ तोची विस्तारिला श्रोतियांकरणीं ॥ जोडुनियां बद्धपाणी ॥ अनुसरा दिनयामिनी पैं ॥ ८० ॥

इति श्रीमलमाहात्म्यग्रंथ ॥ पद्मपुराणींचे संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ सप्तविंशतितमोऽध्याय रसाळ हा ॥ २७ ॥ ओव्या ॥ ८० ॥ श्लोक ५ ॥

॥ इति सप्तविंशतितमोऽध्यायः ॥

-------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय अठ्ठाविसावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरवे नमः ॥ जयजयाजी करुणामूर्ती ॥ विश्वंभरा विश्वस्फूर्ती ॥ करुणासमुद्रा कृपामुर्ती ॥ निवारीं अधोगती पैं माझी ॥ १ ॥

मी तंव अनाथदीन ॥ प्रार्थितों करुणावचन दयाळुवा कृपाघन ॥ रक्षावे कृपेनें दासातें ॥ २ ॥

मलमाहात्म्य अति पावन ॥ ऐकोत श्रोते भाविक जन ॥ लक्ष्मीनारायण संवाद पूर्ण ॥ परिसा सज्जन आदरें ॥ ३ ॥

लक्ष्मीरुवाच ॥ देव देव ऋषीकेश भक्तानामभयप्रद स्त्रीणां केनोपचारेण तुष्टोसि त्वं जनार्दन ॥ १ ॥

लक्ष्मी वदे हो जनार्दना ॥ भक्तप्रतिपाळ अघहरणा ॥ परिसा माझी विज्ञापना ॥ हे नारायणा करुणासिंधो ॥ ४ ॥

तरी स्त्रियांनीं काय करावें ॥ कवण व्रत आचरावें ॥ केवीं मोक्षातें पावावें ॥ देवदेवा सांगावें सर्वही ॥ ५ ॥

स्त्री देहाची आकृती असे जाण ॥ शरीरीं अमंगळता पूर्ण ॥ हरेल कैसें तें कृपाकरून ॥ वदावें जाण स्वामियां ॥ ६ ॥

दुःशीलोर्दुभगोवृद्धो जडोरोगयुतोपिवा ॥ पतिःस्त्रीभिर्नहातव्योलोकेप्सुभिरपातकी ॥ २ ॥

मलीनता प्राप्त झालिया देहीं ॥ स्पर्श न करिती कोणीहीं ॥ जयाच्या कुशी जन्मे देहीं ॥ ते तंव पाई न स्पर्शती ॥ ७ ॥

देवब्राह्मण आणि अग्नि ॥ हे साक्षी ठेऊन पिता अर्पि दानीं ॥ दान घेतलें तोचि भ्रतारधनी ॥ परि देहा लागुनी स्पर्शेना ॥ ८ ॥

ऐसें ऐकूनिया उत्तर ॥ बोलता जाला सर्वेश्वर ॥ श्रृणु सुंदरी ये सोपस्कार ॥ ऐकें उत्तर प्रश्नाचें ॥ ९ ॥

श्रीनारायण उवाच ॥ नारीणां परमोधर्मो भर्तृसेवासमोनहि ॥ पतिशुश्रुषणादेवागताः स्वर्वीतकल्मषः ॥ ३ ॥

सकळ धर्मामाजी उत्तम धर्म जाण ॥ स्त्रियांतें दैवत भ्रतारची पूर्ण ॥ तया वेगळें दैवत आन ॥ केलें साधन जन्मवरी ॥ १० ॥

जन्मवर साधन केलें ॥ शास्त्रपुराणें दैवत पूजिलें ॥ तें तितुकेंहि वाया गेलें ॥ जे नाचरले पतिआज्ञे पैं ॥ ११ ॥

जे पतिवचनातें न मानी ॥ वंचनार्थ करी पतिलागोनि ॥ अनृतसदां असत्यवचनी ॥ तरी निदानीं सुटेना ॥ १२ ॥

याव्यतिरिक्त अनंत पापराशी ॥ त्या हो घडती स्त्रियासीं ॥ काही सायासी किंवा अनयासीं ॥ तरी सुटका तियेसि असेना ॥ १३ ॥

म्हणोनि सर्वीसर्वेश्वर ॥ स्त्रियांते दैवत आपुला भ्रतार ॥ हा तंव वेदेची केला निर्धार ॥ आन विचार नसेची ॥ १४ ॥

पतीची आज्ञा तेचि मान्य ॥ तेंचि दैवत पतिव्रते लागून

॥ पतिवाचून इतर सर्व शीण ॥ नसे कारण अन्य कांहीं ॥ १५ ॥

पहा वाराणसी माजी जाण ॥ लोपामुद्रा पतिव्रता धन्य ॥ जियेचें नाम घेतां पूर्ण ॥ होय क्षाळण महापापा ॥ १६ ॥

ऐसिया धर्मे तेची पतिव्रता ॥ नाहीतरी इतरही कांता ॥ तयांची किंचित वार्ता ॥ तेही सर्वथा निवेदूं ॥ १७ ॥

भ्रतारें मागतां उदक ॥ येरी कूप दावीतसे देख ॥ म्हणे पात्र घेऊनी आणा सम्यक ॥ नाहीं उदक गृहामाजी ॥ १८ ॥

तत्रापि उदक असलिया कोडें ॥ पात्र आणुनि आपटी तयापुढें ॥ क्षुधानळें पीडिता निवाडें ॥ करी बडबड वाउगी ॥ १९ ॥

भलतेंचि करूनी निमित्य ॥ सक्रोधें अन्न पचवीत ॥ खारट आळणी म्हणता तेथ ॥ म्हणे करावे हस्तें आपुलिया ॥ २० ॥

जन्म गेला नाव ठेवितां ॥ रसनेची चवी का सया पाहिजे आतां ॥ कैसि या प्रकारें कीजे क्षुधाशांतता ॥ असे अवगत स्वभावहा ॥ २१ ॥

ऐसिया स्त्रियांतें तत्वतां ॥ त्या म्हणो नये ती पतिव्रता ॥ ऐसियेसी संसारकरितां ॥ जन्म वृथा प्राणियासी ॥ २२ ॥

तरी पतीव्रताधर्मरीती ॥ इतिहास वदे रमापती ॥ तेचि वदों श्रोतियांप्रती ॥ अनुपम्यस्थिती आगळी ॥ २३ ॥

तरी काश्मीरदेशी प्रबळ ॥ धर्मपुरी प्रख्यात प्रज्वळ ॥ तेथील विप्र एक परमसुशील ॥ नाम जाण धर्मशर्मा ॥ २४ ॥

स्नानसंध्याशीळ सत्पात्र ॥ धर्मपरायण अग्निहोत्र ॥ पोटीं नसे पुत्र आणुमात्र ॥ सत्पात्र तयाची ॥ २५ ॥

नामें जाणा ते सुशीळा ॥ पतिव्रता परम मंगळा ॥ उभयतां क्रमित काळा ॥ असे निर्मळा ह्रदयीची ॥ २६ ॥

वयसा उभयतांची समान ॥ साठिची जालीसे गणना ॥ तंव धर्मशर्मा बोले तिये लागून ॥ ऐक वचन भामिनिये ॥ २७ ॥

वसंत ऋतु उष्ण मास ॥ गंगेस चलावें स्नानास ॥ येरी अवश्य म्हणोन तयास ॥ निघती जाली तात्काळी ॥ २८ ॥

पाहूनि गंगोदक निर्मळ ॥ दुजें कोणी नसेचि अढळ ॥
जळी रिघूनियां ते वेळें ॥ स्नान करी तांतडी ॥ २९ ॥

परी बुद्धि कर्मानुसार ॥ ह्रदयीं उदेला कामविकार ॥
विप्र जाला कामातुर ॥ बोले उत्तर स्त्रियेतें ॥ ३० ॥

म्हणे नग्न जलक्रिडा करावी ॥ रति सुखातें विश्रांति द्यावी ॥ ऐसें वाटे माझ्या जीवीं ॥ तरीं आचरावी क्रिया हे ॥ ३१ ॥

तंव येरी वदतसे उत्तरा ॥ म्हणे हें केउतें उदेलें अंतरा ॥ माध्यान पातला भास्करा ॥ वरी गंगातीर हें पवित्र ॥ ३२ ॥

त्याही वय नसे आपुलें ॥ हे तों केवीं मनी उद्भवले ॥ मज तो वचन मोडितां नये वहिलें ॥ बोल लागेल पतिव्रतेसी ॥ ३३ ॥

तरी स्वगृहीं चला निधी ॥ मग सारावी हे विधि ॥ येरु म्हणे हें तो न घडे कधीं ॥ नाहीं अवघी कामातें ॥ ३४ ॥

ऐसें तियेतें वदोन ॥ जळक्रीडा करिती जाली नग्न ॥
द्रवो लागलें रेत पूर्ण ॥ ह्रदयीं मदन धुसधुसी ॥ ३५ ॥

मग सारिते जाले रती ॥ शांत केले ते वेळीं सती ॥ धन्य ते पतिव्रता सती ॥ वचन न मोडी भ्रताराचें ॥ ३६ ॥

परी चमत्कार जाला अद्भुत ॥ पोटीं धरिती जाली गर्भातें ॥ नवमास भरतांचि तयेतें ॥ जाली प्रसूत कामिनी ॥ ३७ ॥

आश्चर्य करिती सकळजन ॥ म्हणती पहा नवल कोण ॥ वृद्धापकाळीं पुत्रनिधान ॥ देखे कामिनी आदरेंसीं ॥ ३८ ॥

कोणी निंदिती कोणी स्तविती ॥ तंव दोन पुत्र जाले तिजप्रति ॥ शारदा आणि शांती म्हणती ॥ नामें उभयतां ते साजिरी ॥ ३९ ॥

पुत्र उभयतां दोघेजण ॥ दिवसेंदिवस वृद्धिंगत जाण ॥ पंच वर्षे जालिया पूर्ण ॥ पुढें कथन अवधारा ॥ ४० ॥

गंगाजळी जलक्रीडा केली ॥ ते नग्न आणि रति संपादिली ॥ त्याची पापें फळा आलीं तात्काळीं ॥ तनु भाजली उभयतांची ॥ ४१ ॥

उभयतां विप्रकुमारातें ॥ सदासर्वकाळात तप्तता देहांतें ॥ चैन पडेना तयातें ॥ न सुचे अन्नउदक कांहीं

॥ ४२ ॥

लाहें लाहें संतप्त गात्र ॥ उपाय करिती नाना प्रकार ॥ मोह धरून मातापितर ॥ करितां उपचार त्रासले ॥ ४३ ॥

नाना परी उपाय केले ॥ परि व्यथा अधिक प्रबळें ॥ कुमार चरफडती बाळें ॥ दीन वदनें करूनिया ॥ ४४ ॥

शोक करिती मातापिता ॥ केउतें उदेलें हें अनंता ॥ वृद्धापकाळीं पुत्राची वार्ता ॥ देखिली सत्ता तुझिया ॥ ४५ ॥

तेथें ही दशा उद्भवली ॥ बाळकष्टी न देखती या काली ॥ महादेवाधिदेवा चंद्रमौळी ॥ वेळ आली मृत्याची ॥ ४६ ॥

ऐसा नानापरी विलाप ॥ करिती उभयतां मायबाप ॥ मग तयातें लाविती लेप ॥ शीतळता चंदनाची ॥ ४७ ॥

उत्तम चंदन आणुनी ॥ मर्दन करिती पुत्रालागुनी ॥ परी सीतळता नव्हेची नयनीं ॥ यथाभूत बाळक तें ॥ ४८ ॥

वार्ता फाकली नगरांत ॥ जनसमुदाय निरखू येत ॥ जे जे उपचार सांगत ॥ ते ते करिती मातापिता ॥ ४९ ॥

परी कांहीं केल्या नव्हें बरें ॥ अधिकच चरफडती कुमारें ॥ वृत्तांत ऐकता नृपवरें ॥ तोही येत धांवूनियां ॥ ५० ॥

नृप धार्मिक पाहीं ॥ देखून आश्चर्य करिती ह्रदयीं ॥ म्हणे माझिया राष्ट्री ऐसा नाहीं ॥ धन्वंतरी आगळा ॥ ५१ ॥

मग रायें शोध केला बहुत ॥ कोणी धन्वंतरी न मिळें तेथ ॥ नाहीं पंचाक्षरी महंत ॥ उपाव न चालत कवणाचा ॥ ५२ ॥

तव एक अपूर्व वर्तलें ॥ गालव ऋषी येतां देखिले ॥ रायें निजासनी बैसविले ॥ पूजन केले यथाविधी ॥ ५३ ॥

मग ऋषीते साद्यंत समाचार ॥ कथिता जाला साचार ॥ म्हणें न चालेची उपचार ॥ विप्रकुमर कष्टताती ॥ ५४ ॥

तें तंव न देखवे माझेनीं ॥ उपाव केला बहुतजनीं ॥ परी शांत नव्हे ज्याचेनीं ॥ कष्टती दोन्हीं मातापितरें ॥

५५ ॥

ऐसें नृपाचें वाक्य ऐकुनी ॥ बोलता जाला गालवमुनी ॥ म्हणे ऐक नृप चक्रचूडामणी ॥ उपाया लागुनी सांगतो ॥ ५६ ॥

असेल जरी कोणी पतिव्रता ॥ तिचिया हस्तें उदक सिंचिता ॥ तरीं या ज्वरा तें होय शांतता ॥ सौख्यवार्ता बाळकातें ॥ ५७ ॥

ऐसें ऐकता नि उत्तरा ॥ रायें नगरीं पिटिला डांगोरा ॥ जी असेल पतिव्रता सुंदरा ॥ या त्वरा या ठायी ॥ ५८ ॥

नगरीं प्रगट जाली मात ॥ परी कोणी न बोले पतिव्रता सत्य ॥ राजभार्येसहित ग्रामवासी न येत ॥ किशोर उदक स्पर्शावया ॥ ५९ ॥

तंव नृप चाकाटला अंतरीं ॥ म्हणे कोणीही पतिव्रता सुंदरीं ॥ न देखोंची माझिया नगरी ॥ केउता पुढारी परिणाम ॥ ६० ॥

तरीं समग्रांची पापवार्ता ॥ ग्रामवासी राजकांता ॥ आहा हे केउते अनंता ॥ होऊ पाहे घाता बाळकासी ॥ ६१ ॥

आणि सत्वही गेलें नगरीचें ॥ हांसणे जालें सकळिकांचें ॥ ते तंव लांछन जालें जन्माचें ॥ बोलतां वाचें न बोलवे ॥ ६२ ॥

ऐसी चिंता करितां नृपनाथ ॥ तंव आश्चर्य वर्तले अद्भुत ॥ एक निषादी त्या समयांत ॥ आली तेथें अवचिता ॥ ६३ ॥

जातीची ते भिल्लिणी ॥ मस्तकीं काष्ठभारा घेउनि ॥ जात असे आपुले मार्गानीं ॥ तंव देखिलें नयनीं अपूर्व ॥ ६४ ॥

ग्रामवासी जनांचा मेळा ॥ अवलोकितसे अबळा ॥ मग मस्तकीचा भारा आपटिला ॥ आली तेथें जनसमुदावो ॥ ६५ ॥

वार्ता ऐकतां कर्णोकर्णी ॥ जे पतिव्रतेमाजी शिरोमणी ॥ असलिया भेटावें नृपालागोनी ॥ जिववावयाही बाळका ॥ ६६ ॥

ऐकत ऐसिया वचनातें ॥ येरी पतिव्रता धर्मातें ॥ ते ठाऊके नसेचि तियेतें ॥ कैसा आचार तोही न कळे ॥ ६७ ॥

परी तियेच नेम असे एक ॥ पतिवचनीं नसे वंचक ॥

सदांसर्वकाळ देख ॥ पति अवज्ञा नसेची ॥ ६८ ॥

स्वप्नीं नेणें परद्वाराते ॥ भाषणही करूं शके कवणातें ॥ ऐसें असतांती तेथे ॥ राजा जवळिकें पातली ॥ ६९ ॥

म्हणे कवण संकट तुम्हां ॥ तें निवेदी नृपसत्तमा ॥ रायें निवेदिलें सर्वही कर्मा ॥ तंव बोले भामानिषदाची ॥ ७० ॥

म्हणे उदक आण लवलाही ॥ मी तव पतिव्रता धर्म नेणें कांहीं ॥ परी कर्ता सर्व शेषशाई ॥ पाहे नवाई नृपवरा ॥ ७१ ॥

उदक घेऊनियां करीं ॥ काय बोले ते अवसरीं ॥ पतिअवज्ञा जन्मवरी ॥ केली नसे जाणपां ॥ ७२ ॥

नेणें परपुरुषाची वार्ता ॥ हे तंव ठाऊक असे जगन्नाथा ॥ ऐसें वदोनियां तत्वता ॥ उदक शिंपी बाळातें ॥ ७३ ॥

तव चमत्कार जाला अद्भुत ॥ तात्काळ ताप जाला शांत ॥ बाळ खडबडून उठत ॥ चरण वंदीत निषादीचे ॥ ७४ ॥

ऐसा चमत्कार पाहून जयजयकार करिती सर्वजन ॥ मग रायें वस्त्रालंकारें करून ॥ निषादीला लागून गौरविलें ॥ ७५ ॥

वरी एकग्राम तत्वता ॥ देता जाला नृपनाथा ॥ ऐसी निषादी पतिव्रता ॥ देखून समस्तां आश्चर्य ॥ ७६ ॥

ऐसें पतिव्रतेचें कथन ॥ लक्ष्मी तें वदे नारायण ॥ तेंचि तुम्हां कथिले संपूर्ण ॥ आचरा सर्वज्ञ सर्वतें ॥ ७७ ॥

म्हणोन सकळ धर्मामाजी धर्म ॥ स्त्रियेतें भ्रतारसेवेचा नेम ॥ तयाच्या वचनीं प्रेम ॥ धरूनि वर्ते सर्वदा ॥ ७८ ॥

मग तियेतें करणें नलगे आन ॥ कांही एक जपतपसाधन ॥ आपुला भ्रतार तोची नारायण ॥ पावे मोक्ष सदनतें पैं ॥ ७९ ॥

यालागीं सकळजनीं ॥ वर्तावें भावार्थ धरूनी ॥ मग तयातें उपेक्षिना कोणी ॥ यम पायधुनी माथा वंदी ॥ ८० ॥

स्वस्ति श्रीमलमहात्म्य ग्रंथ पद्मपुराणींचें संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ अष्टविंशतितमो ऽ ध्याय गोड हा ॥ २८ ॥ ओव्या: ८० ॥ श्लोक ३ ॥

॥ इति अष्टविंशतितमोऽध्यायः ॥

---------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय एकोणतिसावा

श्रीगणेशाय नमः ॥ ओम् नमोजी अपरिमिता ॥ आदिअनादी मायातीता ॥ षड्विकार गुणरहिता ॥ सर्वनिरंजना ॥ १ ॥

तूं तंव सकळचाळक हृदयस्था ॥ अप्रमेय अद्वैत अवस्था ॥ चरणीं तव माझा माथा ॥ अनाथनाथा दीनबंधो ॥ २ ॥

अनाथांचा तू नाथ ॥ हें तों ब्रीद त्रिभुवनीं विख्यात ॥ ऐसें असतां घडे विपरीत ॥ हें तें मात अनुपम्य देवा ॥ ३ ॥

संसारीं आमुची आपदा ॥ रोगेंव्याप्त सकळसंपदा ॥ कौतुक पाहसी गोविंदा ॥ हें तव ब्रीदा विलक्षण ॥ ४ ॥

दुर्जनीं आम्हांतें गांजावें ॥ निरापराधें छळावें ॥ हें तंव तुवां अवलोकावें ॥ उचित केशवा न शोभे ॥ ५ ॥

असो आमुचाची भोग पाहीं ॥ तुजवरी बोल ठेवूनि काई ॥ जैसें असेल माझे दैवीं ॥ तेची पदवी सुखें भोगूं ॥ ६ ॥

ऐका श्रोतेहो समस्त ॥ श्रीकृपाबळें हा ग्रंथ ॥ संपूर्ण होऊं आला तेथ ॥ असो अवगत इत्थंभूत ॥ तरीं फलश्रुती अवधारा ॥ ७ ॥

नारायण ॥ श्रृणुसुंदरिवक्ष्यामि व्रतानमुत्तमं व्रतं ॥ कथितं त्वद्धितार्थाय सर्वलोकोपकारकं ॥ १ ॥

यदा भवेद्व्रतं पूर्णं तदोद्यपनमाचरेत् ॥ विनोद्यापनयोगेन तस्य सर्वं विनश्यति ॥ २ ॥

लक्ष्मीप्रती वदे नारायण ॥ जे हें व्रत आचरण पूर्ण ॥ तरीं बरवें की जे उद्यापन ॥ न घडे तरी निर्फळ जाणिजे ॥ ८ ॥

उद्यापन केलिया सकळ ॥ लाभे तयाचें पूर्णफळ ॥ जैसें बीज पेरितां कृषीवळ ॥ फळ लाभे राशीवर ॥ ९ ॥

मग लक्ष्मी वदे हो जी स्वामी ॥ कैसे उद्यापन कीजे आम्ही ॥ ते सकळ निवेदावें तुम्ही ॥ कैसा विधि ते समग्र ॥ १० ॥

ऐकून लक्ष्मीचें वचन ॥ बोलता झाला जनार्दन ॥ म्हणे ऐकाहो एकाग्र मन ॥ अत्यादरें सुंदरी ॥ ११ ॥

तुवां जें जें आम्हा प्रश्निलें ॥ तें तें सर्वही निवेदिलें ॥ परम उपकारणीये भले ॥ बोल चांगले तुझे हे ॥ १२ ॥

संपूर्ण मासवरी हें व्रत ॥ अथवा द्विरात्री त्रिरात्री आचरत ॥ किंवा एके दिनीं अर्चिल तें ॥ तरी उद्यापन नेमस्त करावें ॥ १३ ॥

आतां उद्यापन तें कैसें कीजे ॥ तेही सांगतों ऐकिजे ॥ संपूर्ण मास भरतां जाणिजे ॥ उद्यापनविधियुक्त ॥ १४ ॥

प्रातः काळी उठोनियां ॥ स्नानविधि नित्यनेम करूनियां ॥ देवदेवतार्चन सारूनियां ॥ उपहरी हे क्रिया आचरिजे ॥ १५ ॥

आणूनियां कर्दळी स्तंभ ॥ मंडप उभविजे सुप्रभ ॥ गुडियातोरणें उभवी नभ ॥ आणिक नानाविध वाद्ये पैं ॥ १६ ॥

स्थापूनियां सर्वतो भद्र ॥ रंगमाळा चित्रविचित्र ॥ घालून कीजे यंत्र विचित्र ॥ अतिसुंदर मध्यभागी ॥ १७ ॥

तयावरी कलश स्थापूनी ॥ सुवर्ण प्रतिमा करूनी ॥ पुरुषोत्तम देवता म्हणूनी ॥ स्थापिजे ते स्थानीं आदरें ॥ १८ ॥

मग यथासांग षोडशोपचारी ॥ पूजा कीजे अति आदरीं ॥ गंधाक्षता पुष्प सुवासित वरी ॥ परिमळ धूसुरी अर्पावे ॥ १९ ॥

नाना नैवेद्य पक्वान्न ॥ तांबुल दक्षिणा निरांजन ॥ वस्त्रे अलंकार अर्पून ॥ मंगळ आरती पै कीजे ॥ २० ॥

मग पाचारूनि ब्राह्मण ॥ सहदंपत्यें असावी जाण ॥ तया पूजा करून ॥ वस्त्रालंकार अर्पावे ॥ २१ ॥

ऐसे दंपत्य त्रयत्रीणिद्शक ॥ अक्षरे असावी तेही देख ॥ तयातें वायनादी जे प्रत्येक ॥ नाना प्रकारेंसीं जाण पां ॥ २२ ॥

तोही प्रकार सांगतों ऐक ॥ वंशपात्र सुपलें प्रत्येक ॥ वस्त्रे तोरे फणी करंडक ॥ असावी देख गरसोळी ॥ २३ ॥

ऐसें वाय विस्तारुनी ॥ दंपत्यें पूजावीं वस्त्रालंकारें करूनी ॥ सुवासीत पुष्पमाळिका देऊनि ॥ अर्पावीं दानीं वायनें ॥ २४ ॥

मग यथासांग ब्राह्मन संतर्पण ॥ दंपत्यसहीत करावें जाण ॥ षड्रस अन्न निर्मून ॥ द्यावें भोजन ब्राह्मणातें ॥ २५ ॥

संतुष्ट झालिया ब्राह्मण ॥ मी संतुष्टें नारायण ॥ ते तंव माझें मुख जाण ॥ म्हणोन आधीं पूजावें ॥ २६ ॥

वस्तुमात्र जितुकी ॥ विप्रातें अर्पाल तितकी ॥ ते तो पावे मजनिकी ॥ जाण लतिके शुभानने ॥ २७ ॥

भोजन जालियावरी ॥ बरवे अलंकार भूसुरीं ॥ देऊन दक्षिणा सहपरिवारी ॥ आशीर्वचना ते घेइजे ॥ २८ ॥

आतां ज्यांणीं जो धरिला नेम ॥ त्याचा ऐकें अनुक्रम ॥ प्रातःस्नानें करिती जे सप्रेम ॥ तेणें गंगापूजन करावें ॥ २९ ॥

वायनदान अर्पावें गंगेसी ॥ धेनुदान दीजे ब्राह्मणासीं ॥ सालंकार सवत्सेसी ॥ दोहन पात्रेंसी अर्पावें ॥ ३० ॥

जे प्रतिदिनी अर्पिती कुंभदान ॥ तयानें घातुकुंभ आणून ॥ तयाची पूजा करून ॥ द्यावें दान ब्राह्मणातें ॥ ३१ ॥

जे प्रत्यही करिती नक्त भोजन ॥ तयातें दीजे

पोंवळीदान ॥ तयाते मुक्ती मी देत पूर्ण ॥ अक्षई भुवन प्राप्त होय ॥ ३२ ॥

आतां जे मौन्य करिती भोजनातें ॥ तयानें मौक्तिक दीजे दानातें ॥ वरी एक घंटा देवालयी बांधोन ते ॥ करितां पुण्य अगम्य ॥ ३३ ॥

प्रत्यहीं अर्पितां दीपदानतें ॥ रौप्यपात्रीं सुवर्ण वातितें ॥ आज्येंसी प्रतिपाद्य यथानिगुतें ॥ पूजोनीं विप्रातें अर्पिजे ॥ ३४ ॥

अथवा विस्तीर्ण समई ॥ धातूची असावी बरवी ॥ सघृतेसी पाजळोनि पूजावी ॥ मग अर्पावी ब्राह्मणातें ॥ ३५ ॥

आता मासवरी पुराण ॥ श्रवण करितां संपूर्ण ॥ अथवा पंचत्रय दिन ॥ घडे श्रवण शेवटीं ॥ ३६ ॥

जरी संपूर्ण मासवरी जाण ॥ जया तें घडलें नाही श्रवण ॥ तयानें शेवटील अध्याय ऐकतां पूर्ण ॥ लाभे संपूर्ण फळ तयातें ॥ ३७ ॥

मग वाचकाची पूजा बरवी ॥ यथा निगुती करावी ॥ वस्त्रालंकारें अर्पावी ॥ दक्षिणा द्यावी यथोचित ॥ ३८ ॥

व्यासस्वरूपी तयातें जाणून ॥ आदरें कीजे हो पूजन ॥ व्यासरूपी नारायण ॥ तें पूजन मज पावें ॥ ३९ ॥

जें जें कांहीं अर्पित वाचक ॥ तें तें मज प्रीत्यर्थ देखा ॥ मग मी तया भाविका ॥ स्वपदी देखा स्थापीत ॥ ४० ॥

नारा० ॥ वाचकः पूजितः श्रुत्वार्यैर्वस्त्रादिभिरादरात् ॥ मलमासाधिदेवोहं तेषांतुष्टोनसंशयः ॥ ३ ॥

ऐसें जे करिती वाचकाचें पूजन ॥ तयावरि संतुष्टे मी नारायण ॥ व्याधीपीडारोग तया लागून ॥ न बाधी जाण तया लागीं ॥ ४१ ॥

आधीव्याधी जरामृत्यु ॥ न बाधी तया आघात ॥ तया कुळी वैधव्याची मात ॥ बोलूच नये सर्वथा ॥ ४२ ॥

स्त्रियांतें सौभाग्यवर्धन ॥ इच्छिला भ्रतार पावे पूर्ण ॥ पोटी होय पुत्रसंतान ॥ अतिसुलक्षण पूर्णयुषी ॥ ४३ ॥

दरिद्री होय भाग्यवंत ॥ ऋणार्थियाचें ऋणमुक्त ॥ धनार्थियातें धनप्राप्त ॥ पुत्रार्थियातें पुत्र होई ॥ ४४ ॥

एवं संपूर्ण व्रत आचरता ॥ तयाचे पूर्ण करितां मनोरथा

॥ इच्छिलें फल दे समर्था ॥ स्वयें अनंत मी तयातें ॥ ४५ ॥

ऐसें लक्ष्मीप्रती कथन ॥ स्वयें वदला नारायण ॥ तेंची तुम्हा श्रोतियां लागून ॥ केलें निवेदन सर्वही ॥ ४६ ॥

यालागीं भावार्थ धरूनी ॥ व्रत आचरावें सज्जनीं ॥ आचरतां न सोडी हो भामिनी ॥ मध्यंतरी व्रतातें ॥ ४७ ॥

व्रत संपूर्ण न होतां ॥ मध्येंच न सोडीजे तत्वतां ॥ हीन आयुष्यीं क्षीणता ॥ प्राप्त होय जाणिजे ॥ ४८ ॥

व्रत संपुर्ण एकमास ॥ अथवा आचरावें पांच दिवस ॥ अथवा आचरतां तीन दिवस ॥ अथवा दिवस एक पैं ॥ ४९ ॥

परि संपूर्ण लाभे फळसिद्धि ॥ आणि केलि पाहिजे यथाविधी ॥ उद्यापनें नानाविधि ॥ करितां सिद्धि लाभेल ॥ ५० ॥

ते संसारी न भोगिती आपदा ॥ प्राप्त होय सकळ संपदा ॥ स्त्रियांतें वैधव्याची बाधा ॥ झगटेना कालत्रयीं ॥ ५१ ॥

इति श्रीमलमाहात्म्यग्रंथ ॥ पद्मपुराणींचे संमत ॥ मनोहरसुत विरचित ॥ एकोनत्रिंशत्तमोऽध्याय गोड हा ॥ २९ ॥ ओव्या ५१ ॥ श्लोक ३ ॥

॥ इति एकोनत्रिंशत्तमोऽध्यायः ॥

--------------------------

## अधिकमास माहात्म्य - अध्याय तिसावा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ जयजयाजी श्रीरामा ॥ अनुपम्य तुझा महिमा ॥ तव कृपा बळें माझिया नेमा ॥ सिद्धि पावविलें दातारा ॥ १ ॥

मार्गे कवी थोर थोर झाले ॥ तयांनी अपार ग्रंथ केले ॥ तूं तें गीतीं आळवीत गेले ॥ तुवा धावणें केलें तात्काळीं ॥ २ ॥

तयाची येथें न साजे उपमा ॥ मी तंव अधमामाजी अधम ॥ नाहीं क्रिया दानधर्म ॥ नाही सुगम उपाव ठावा ॥ ३ ॥

वाचेसही नाहीं मधुरता ॥ किती आळवावे रघुनाथा ॥

त्याही वरी दरिद्र अवस्था ॥ सदा वाहे चिंता हळहळ ॥ ४ ॥

तेथें मी काळ कैसा क्रमावा ॥ म्हणोन उद्दार जाला जिवा ॥ बुद्धि दाता तू राघवा ॥ तुझिया भावा अगम्य ॥ ५ ॥

हे माझी नव्हे स्वबुद्धि कविता ॥ अवघी ही तुझी सर्व सत्ता ॥ वाचेसि नाही मधुरता ॥ परि संपूर्णता तुवां केली ॥ ६ ॥

मागील कवींचे जे जे बोल ॥ ते तंव सुवासिकपुष्पें केवळ ॥ तेथें माझी वाणी केवळ ॥ धत्तुतपुष्पें जाण पां ॥ ७ ॥

समर्थे मौक्तिकांची लाखोली ॥ तुजलागीं रामा अर्पिली ॥ तेथें माझी हे वाग्वल्ली ॥ तुलसी दल समर्पिलेंसे ॥ ८ ॥

आतां कळसाध्याय तिसावा ॥ तो कृपाबळें सिद्धीते न्यावा ॥ संपूर्ण मलमहत्म्याचा ठेवा ॥ तुजप्रती देवा पावों दे ॥ ९ ॥

संपूर्ण व्रताचे जें फळ ॥ माझें तव हेंचि सकळ ॥ तुज प्रीत्यर्थ अळूमाळ ॥ पावो सकळ देवराया ॥ १० ॥

आता परिसाहो सादर ॥ श्रोते सज्ञान चतुर ॥ संपूर्ण कथिला प्रसर ॥ लक्ष्मीनारायण संवाद ॥ ११ ॥

संपूर्ण भरतां एक मास ॥ तयाची गणती तीस दिवस ॥ म्हणोनी अध्याय हे तीस ॥ जाले असती निर्धारें ॥ १२ ॥

ह्या तीस मौक्तिकांच्या माळा ॥ सभाग्य श्रोतीं घालाव्या गळां ॥ भावें अर्चिजे धनसावळा ॥ घाला गळां त्याचिया ॥ १३ ॥

किंवा हे तीस दीप उजळा ॥ भावार्थे घृत वाति घाला ॥ अंतरज्योत पे पाजळा ॥ तेणें वोवाळा लक्ष्मीरमण ॥ १४ ॥

अथवा हे तीस कुंभ जाण ॥ श्रवण जीवनें भरि जे पूर्ण ॥ भावबळें दीजे हो दान ॥ तेणें नारायण संतोषे ॥ १५ ॥

वादविवाद टाकून ॥ मूकवत करावे श्रवण ॥ तेंचि तुम्हा घडे मौन्य ॥ तेणें नारायण संतुष्टे पैं ॥ १६ ॥

ऐसिया संपूर्ण नेम ॥ अर्चिजे हो पुरुषोत्तमा ॥ तयायोगें कर्मीकर्मा ॥ मुक्त होती प्राणी पैं ॥ १७ ॥

ऐसे हे तीस अध्याय पूर्ण ॥ ग्रंथ जालासो निर्माण ॥ तुजप्रती पावो नारायण हें वाकपुष्प चरणीं अर्पिलें ॥ १८ ॥

संपूर्ण ग्रंथ जरी न हो श्रवण ॥ तरी शेवटील अध्याय हा पूर्ण ॥ श्रवण फलप्राप्ति जाण ॥ समग्र कथन ग्रंथ गर्भी ॥ १९ ॥

म्हणोन तीस अध्यायांची ॥ वेगळालीं फळे तयांची ॥ परिसवू तुम्हां तैसेची ॥ एकाग्र मन असों द्या ॥ २० ॥

मिळोन समग्र ऋषींचा मेळा ॥ सूताप्रती तयांनी प्रश्न केला ॥ सूत तयातें वदता जाला ॥ लक्ष्मीनारायण संवाद ॥ २१ ॥

मलमासाची उत्पत्ती ॥ कथिता जाला निगुती ॥ ब्राह्मणसेवा दानपद्धती ॥ सांगोन प्रथमोध्याय संपविला ॥ २२ ॥

द्वितीयोध्यायीं गोसेवा वर्णन ॥ कमलासनाचा गर्वहरण ॥ केतकी आणि धेनू तें जाण ॥ असत्य वदता पंचवदनें शापिलें ॥ २३ ॥

गोसेवाविशेष पाही ॥ निवेदिली त्रितीयोध्यायी ॥ पौलव्यऋषीतें छळितां वासवीं ॥ नवल पदवी ऐकिली

॥ २४ ॥

वासवासहीत तिन्ही देव ॥ शापावया ऋषिपुंगव ॥ उदक घेता धेनू अंगी सर्व ॥ देखतां जाला ऋषी तो ॥ २५ ॥

मग उदक टाकिता झाला ॥ विवेकें क्रोध शांतविला ॥ प्रसन्न होऊन देवतामेळा ॥ ऋषि बैसविला विमानी ॥ २६ ॥

चतुर्थोध्यायी कथा बरवी ॥ ब्राह्मणसेवा निवेदिली आघवी उपरि दृष्टांती कथा लाघवी ॥ शूद्रें नेले पाही द्रव्यातें ॥ २७ ॥

नृगराज झाला सरड ॥ ब्रह्म शाप अतिप्रचंड ॥ तो कृष्णदर्शनें उद्धरिला वितंड ॥ पंचमोध्यायीं कथाही ॥ २८ ॥

सहावियामाजी कथा ॥ दानमहिमा वर्णिला तत्वतां ॥ आणि दीपदान विप्रस्त्री करितां ॥ उद्धरिला मार्जार ॥ २९ ॥

सातव्यामाजी कथा बरवी ॥ शांकली विप्र सामवेदी पाही ॥ त्यातें भार्या उभयतांही ॥ एकी अधोगती एकी उद्धारू ॥ ३० ॥

दीपदान करितां ज्येष्ठकांता ॥ धाकुटी सवत मत्सरें विध्वंसितां ॥ त्रयपुत्र नष्ट होऊन अधोगतिता ॥ प्राप्त जाली तयेतें ॥ ३१ ॥

अष्टमोध्यायीं कथानक ॥ उत्तर देशी नर्मदातीरी एक ॥ ज्योतिषी ब्राह्मण एक ॥ अतिकृपण धनवान तो ॥ ३२ ॥

कांतेनें उदक म्हणोन पय दिधले ॥ त्या योगें शेष प्रसन्नवदनें बोलें ॥ संचित द्रव्य कांतेचे बोलें ॥ देऊनि लाविलें साधनासी ॥ ३३ ॥

दक्षिण देशीं महीस्मृती नगरी ॥ विप्रस्त्री वैधव्य वृद्धाचारी ॥ तें व्रत करितां शूद्रनारी ॥ तात्काळ उद्धरी पुण्योदकें ॥ ३४ ॥

सप्तदिवसांचे स्नानोदक ॥ ती ते करीं अर्पिले देख ॥ उद्धरगती तात्काळिक ॥ वाराणसी देख जन्म झाला ॥ ३५ ॥

काशीनाथ नामाभिधान ॥ उभयता वृद्धासहीत विमान ॥ नवव्यामाजी हेचि कथन ॥ जालें संपूर्ण निर्धारें ॥ ३६ ॥

दशमामाजी कथा पाहीं ॥ अवंती नगरीचा ब्राह्मण

दरिद्री ॥ मौन्य व्रत करितांना होई ॥ उद्धार तयाचा ॥ ३७ ॥

अकराव्यामाजी कथा अव्यग्र ॥ पंचपर्वे सांगितलीं साचार ॥ व्यतीपात वैधृती अमावास्या थोर ॥ पूर्णिमा आणी द्वादशी ॥ ३८ ॥

द्वादशामाजी तेची कथा ॥ सांगितली पर्वाची कथा ॥ पूर्णिमा-अमावास्या तत्वता ॥ महिमा निरुता वर्णिला ॥ ३९ ॥

त्रयोदशामाजी कथा ॥ निवेदिलें त्रिरात्रीचे व्रता ॥ दशमी एकादशी सहिता ॥ द्वादशी महिमा वर्णिला ॥ ४० ॥

आणि अंबरीष नृपराणा ॥ दुर्वासें केली छळणा ॥ तात्काळ पावला नारायण ॥ चौदावा जाण असे हा ॥ ४१ ॥

श्रीरामेंव्रत करितां द्वादशी ॥ तेची व्रतें शतमुख रावणासी ॥ मुक्ति दिधली तयासी ॥ पंधराव्यासी हे कथा ॥ ४२ ॥

इंद्राची अप्सरा स्मितविलासिनी ॥ दुर्वासें शापिलें तियेलागुनी ॥ ते पिशाच्च होऊन याज्ञवल्कीची

मैत्रिणी ॥ सोळाव्या माजी उद्धरिली ॥ ४३ ॥

धर्म शर्म स्वस्त्रियेसी प्रतिष्ठानता ॥ व्रत करी त्रिरात्री नेमस्ता ॥ पिशाच्य उद्धरून तत्वता ॥ सत्राव्यांत हे कथा ॥ ४४ ॥

विंध्याद्री पाठारीं जाण ॥ गर्गनामें नगरी पूर्ण ॥ तेथील एक भृगुगोत्री ब्राह्मण ॥ कन्या जाण तयाची ॥ ४५ ॥

तियेतें वैधव्य प्राप्त होतां ॥ व्रतप्रभावें अक्षयीं सौभाग्यता ॥ नामे मंगळागौरी तत्वता ॥ वाराणसीये ॥ ४६ ॥

अठराव्यामाजी हे कथा ॥ आतां एकुणिसावा तत्वता ॥ विप्रदास नामें शूद्र होता ॥ आचरे व्रता कांतेसहित ॥ ४७॥

तयानें उद्धरला राक्षस ॥ देऊनि त्रिदिनी पुण्यास ॥ आतां विसाव्या माजी विशेष ॥ कथानक परिसिजे ॥ ४८ ॥

सौराष्ट्र देशीं प्रभासनगरीं ॥ तेथील सोमशर्मा विप्र निर्धारी ॥ स्नानास जातां गंगातीरीं ॥ पिशाच्य निर्धारीं उद्धरिला ॥ ४९ ॥

सौराष्ट्र देशीं अतिसुशीळ ॥ प्रभास क्षेत्र परमविशाळ ॥ तेथील ब्राह्मण पुण्यशीळ ॥ नामें जाण सोमशर्मा ॥ ५० ॥

तयानें आचरतां व्रतास ॥ स्नाना जातां उद्धरिला राक्षस ॥ त्रिरात्री देऊनि व्रत पुण्यास ॥ विसावा निर्दोष जाणिजे ॥ ५१ ॥

विराट देशाचिये ठायीं ॥ माहुरनामें नगरी पाही ॥ रेणुक दैवत तये ठायीं ॥ अनुसूया परम पतिव्रता ॥ ५२ ॥

तेथील एक शूद्र भावार्थी ॥ विप्रसेवा करितसे दिनराती ॥ कुष्ठ भरतांच तयाप्रती ॥ गंगास्नानें उद्धरागती तो गेला ॥ ५३ ॥

असे कथानक एकविसावा ॥ आता परिसा बाविसावा ॥ नाना दानाचा वेगळा ठेवा ॥ सांगितला आदरेसी ॥ ५४ ॥

तेथें महीस्मृती नगरीं ॥ एक ब्राह्मण सदाचारी अग्निहोत्री ॥ तेथें नारायण राहून मंदिरीं ॥ विपरीत परी पैं केली ॥ ५५ ॥

तक्रविक्री तयाचा कुमर ॥ तात्काळ केला तयाचा

उद्धार ॥ विप्रदुहिता होती जार ॥ तेहि उद्धार पावली ॥ ५६ ॥

ऐसा कथानक बरवा ॥ बावीसापासून चोविसावा ॥ आतां ऐकिजे पंचविसावा ॥ प्रेमभावा आदरेंसी ॥ ५७ ॥

मासामाजि मलमस उत्तम ॥ स्वयें वदला पुरुषोत्तम ॥ अरुंधती पार्वती संवाद परम ॥ अखंड सौभाग्य लाधले ॥ ५८ ॥

वीरबाहु नृपाची कांता ॥ तीतें प्रबोधि प्रधानवनिता ॥ ते तंव व्रताते हेळणा करितां ॥ शरिरीं अवस्था भोगिली ॥ ५९ ॥

मग मंडण प्रधान कांतेसि ॥ कारागृहीं ठेविले नृपवर त्यासीं ॥ स्वप्नामाजी येऊन ह्रषीकेशी मुक्त तयासी करविले ॥ ६० ॥

इतुका कथानक सव्विसावा ॥ पुढें ऐकिजे सत्ताविसावा ॥ समान फळव्रत प्रभावा ॥ पुसे माधव लक्ष्मीतें ॥ ६१ ॥

साधारणें करितां व्रतास ॥ कांही न लागता सायास ॥ ऐशा अधमी स्त्री पुरुषास ॥ पावली निःशेष मोक्षातें ॥

६२ ॥

ऐसा कथानक सुशर्म नृपवर ॥ कथितसे अंगिरा ऋषेश्वर ॥ सत्ताविसाव्या माजी प्रकार ॥ जाला साचार इतुका ॥ ६३ ॥

आतां अष्टविंशति कथा ॥ पतिव्रताधर्म वदलासे तत्वता ॥ काश्मीर देशी धर्मशर्मा द्विज होता ॥ तयाची कांता पतिव्रता निःसीमा ॥ ६४ ॥

तिये तें पुत्र जाले दोन पाही ॥ ते उद्धरिले निषादियें लवलाही ॥ ऐसी तेथील पदवी आघवी ॥ अठ्ठाविसामाजी आणिजे ॥ ६५ ॥

व्रत उद्यापनाची सविस्तर ॥ कथिता जाला शारंगधर ॥ एकूणतिसाव्यामाजी समग्र ॥ हाचि प्रकार सांगितला ॥ ६६ ॥

उद्यापनावाचून व्रतसिद्धि ॥ प्राप्त होय कदाचि कधीं॥ म्हणोन उद्याचनातें आधीं ॥ आचराहो भावार्थे ॥ ६७ ॥

आतां कळस अध्याय तिसावा ॥ तो भावबळें परिसावा ॥ म्हणजे संपूर्ण ग्रंथगर्भठेवा ॥ हाता चढे अनयासेंसी ॥ ६८ ॥

जरि नित्य न घडे पुराण श्रवण ॥ तरी शेवटील अध्याय पूर्ण ॥ ऐकिजे एकाग्र मन करुन ॥ फळ संपूर्ण तो लाहे ॥ ६९ ॥

ऐसी हे तीस कमळ पुष्पमाल ॥ सभाग्य श्रोती घालिजे गळां ॥ जोडूनिया करकमळा ॥ प्रार्थितों सकळा बद्धहस्तें ॥ ७० ॥

एवं तीस अध्याय संपूर्ण ग्रंथ ॥ तुज अर्पिला श्रीरघुनाथा ॥ वदता आणि वदविता ॥ सकळसत्ता पैं तुझी ॥ ७१ ॥

मी तंव मतिमंद आळसी ॥ प्रापंच धंदा अहर्निशी ॥ नेणो कांहींच साधनासी ॥ दान धर्मासी नसें धन ॥ ७२ ॥

ऐसा मी दरिद्री अकिंचन ॥ तुझी सेवा करू नेणेजाण ॥ यालागीं कळेल तैसेम कृपादान ॥ करी रघुनंदना तूचि एक ॥ ७३ ॥

अवघ्या ग्रंथाची रचना बरी ॥ संपूर्ण जाली सागराचे तीरी ॥ तेथें पश्चिमेसी मुमुक्षुपुरी ॥ असे राजधानी सांप्रत ॥ ७४ ॥

तेथें ग्रंथ पावला सिद्धीतें ॥ नमूनिया श्रीगुरुमोरेश्वरातें

॥ तयाचेनि वरदहस्तें ॥ ग्रंथसिद्धि ते पावला ॥ ७५ ॥

उमा नामें माझी माता ॥ साध्वी ते परम पतिव्रता ॥ मनोहरनामे आमुचा पिता ॥ तया उभयतां वंदिलेंसे ॥ ७६ ॥

जैसी शिव आणि भवानी ॥ तेवीं उभयता मज लागुनी ॥ भाव धरून तयांचें चरणीं ॥ ग्रंथ कथनीं संपविला ॥ ७७ ॥

शके सत्राशे बहात्तरी ॥ साधारण नाम संवत्सरीं ॥ पश्चिमेसी समुद्रपुरीं ॥ ग्रंथ निर्धारीं संपविला ॥ ७८ ॥

ग्रंथकर्ता नामाभिधान ॥ गोपिनाथ बाहाती सर्वजन ॥ मनोहरसुत म्हणोन ॥ अभंगीं नाम जाणतें ॥ ७९ ॥

गोपिनाथ तोचि नारायण ॥ जो गोइंद्रियांचें करी पाळण ॥ तोची ह्रदयस्थ श्रीभगवान ॥ ग्रंथ जाण वदला तोची ॥ ८० ॥

म्हणोनि हा मास उत्तम ॥ नाम जाणा पुरुषोत्तम ॥ एकादशी पर्व उत्तमोत्तम ॥ कृष्णपक्ष निर्धारिंसी ॥ ८१ ॥

सौम्यवार असे ते दिनीं ॥ सौख्य दे सकळांलागुनी ॥

परम पर्वकाळ हरिदिनी ॥ ग्रंथकथनीं संपविला ॥ ८२ ॥

श्रोता आणि वक्ता यातें ॥ श्रवण करिती जे भावार्थे ॥
आयुरारोग्य ऐश्वर्यातें ॥ पुत्रपौत्राते तो पावे ॥ ८३ ॥

आधिव्याधि नाहीं दरिद्र ॥ मनेच्छा पुरवी रघुवीर ॥
ऐसा वदला सर्वेश्वर ॥ लक्ष्मीतें आदरेंसी ॥ ८४ ॥

इति श्रीमलमाहात्मय ग्रंथ पद्मपुराणासारोद्धारसंमत ॥
मनोहरसुत विरचित ॥ त्रिंशतितमोऽध्याय गोड हा ॥
३० ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ इति मलमासमाहात्म्य संपूर्णम् ॥

॥ श्री अधिकमास माहात्म्यं संपूर्णम् ॥

--------------------------------------------

## आरती अधिकमासाची

या अधिकमासी श्रीपुरुषोत्तम पाही ।

करू मंगल आरती सर्व मिळूनिया ठाई ॥ ध्रु ० ॥

देहबुद्धी कापुस पिंजुन घेऊ सारा ।

तीस-तीन सुतांचा एकेक वातीस फेरा ।
स्नेह तुपात भिजवून सप्रेमे करी घेई ।
करू मंगल आरती सर्व मिळुनिया ठाई ॥ १ ॥
मन शुद्ध निरांजन निर्गुण तबकी ठेवा ।
षड्विकार जाळुन कापुर वडी मग लावा ।
मनभक्ति गुंफुनी हार फुलांचा वाही ।
करू मंगल आरती सर्व मिळुनिया ठाई ॥ २ ॥
गुरूब्रह्म सनातन पाहुन ब्राह्मण ऐसे ।
करू अपूपवायन दान तयाला खासे ।
अहंभाव दक्षणा देऊनी कृतार्थ होई ।
करू मंगल आरती सर्व मिळुनिया ठाई ॥ ३ ॥
त्र्यय वर्षा त्रिंपुटी साधुनी संधी आला ।
मलमास अधिक मग म्हणती कोणी याला ।
मनु साधुनी संधी गुरुपदी तरुनी जाई ॥
करू मंगल आरती सर्व मिळुनिया ठाई ॥ ४ ॥
-------------------------------

## आरती अधिकमासाची

ओवाळू आरती । आता पुरुषोत्तम प्रभुला ।

नियम व्रते पाळिती । पावतो सत्वर भक्ताला ॥ ध्रु. ॥

दरवर्षाचा । दशदिवसांचा । मळ काढुन केला ।

अधीक महिना । तीस दिनांचा । काळ मेळ बसविला ।

मंगल कार्ये । वर्ज्य त्यामधी । पुण्यकर्म करिती ।

मलमासाला । कृष्णकृपेने । पुरुषोत्तम मानिती ।

अंधाराचा नाश कराया । दिव्य दीप लाविला ।

नियम व्रते पाळिती । पावतो सत्वर भक्ताला ॥

ओवाळू आरती. ॥ १ ॥

गुणसुंदरीला । द्रौपदिला अन् । चंद्रकलाराणिला ।

अधिकमासव्रत । पुण्याईने । प्रसन्न प्रभु झाला ।

स्नान, दान, जप, । मौनभोजने । कुबुद्धि सारावी ।

दुर्व्यसनांचा त्याग करावा । चैन सर्व सोडावी ।

निर्मळगुरुजी पुण्यप्रद हा । मार्ग दावि सकला ।

नियम, व्रते पाळिती । पावतो सत्वर भक्ताला ॥

ओवाळू आरती ॥ २ ॥

-------------------------------------

अशोककाका कुलकर्णी

९०९६३४२४५१